जगद्विख्यात रशियन कादंबरीकार टुर्गेनिव्ह यांच्या Fathers and Sons या, जगांतील दहा सर्वश्रेष्ठ कादंबऱ्यांपैकीं एका आंतरराष्ट्रीय लोकप्रियता लाभलेल्या अमर कादंबरीची मराठी प्रतिकृति

# बाप-लेक

संपादक

विठ्ठल वामन हडप

एकोणिसाव्या शतकांत रशियांतील गुलामगिरी--भूदास पद्धति नष्ट झाल्यामुळें पालटलेल्या समाजजीवनाची रशियन जमीनदार वर्गावर व शेतकरी वर्गावर प्रभावी प्रतिक्रिया झाली. त्यांतच आगामी रशियन लोकक्रांतीचीं बीजें कशीं अंकुरत होतीं या पार्श्वभूमीवर उभारलेली पाषाणालाही पाझर फोडणारी दोन पिढ्यांची वास्तववादी जीवनकथा. छापत आहे

**जानेवारी १९४७ अखेर प्रसिद्ध होईल**

प्राप्तिस्थानः

**ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर**

**गोरेगांवकर चाळ क्र २, मुंबई नं. ४**

# कादंबरीमय आंग्लशाही

लेखक :—**विठ्ठल वामन हडप**

सत्तावन सालच्या भीषण बंडापासून भारतमातेच्या गळ्यासभोंवतीं इंग्र- साम्राज्यशाहीचा फांस अधिक बळकट आंवळला गेला. परंतु हिंदुस्थान खड- खडबडून जागा झाला तो तेव्हांच. तेव्हांपासूनच हिंदी जनता हिंदुस्थानांतील आंग्लशाही नष्ट करून आपली हिंदवी हिंदुस्थानांत स्थापन करण्यासाठीं परोपरीनें झगडूं लागली. कॉंग्रेसचा जन्म, देशीं व परदेशीं. फोफावलेली दहशतवादी चळवळ, टिळक युग, गांधी युग, हिंदी जनतेच्या क्रांतिकारक चळवळी, त्यांतून निर्माण झालेल्या जालियनवाला बागेसारख्या निरपराध हिंदी जनतेच्या रक्तानें रंगलेल्या घटना, हजारों देशभक्तांचें झालेलें बलिदान, नऊ ऑगस्ट क्रांति, इंग्रज राज्यकर्त्यांची अमानुष दडपशाही, अशा अतिशय रोमहर्षण प्रसंगांनीं भरलेल्या सत्तावन सालच्या बंडापासून अगदीं आज- उद्यांचा आपला हिंदुस्थान स्वतंत्र होईपावेतोंच्या काळावर 'कादंबरीमय आंग्लशाही' मालेंतून कादंबरीकार हडप हे सुमारें पंधरा क्रांतिकारक ऐतिहासिक कादंबऱ्या गुंफणार आहेत. या मालेंतील त्यांची पहिली कादंबरी

## भारतमाते, ऊठ!

**पुढें पाडव्याला प्रसिद्ध होईल. अधिक माहितीसाठीं**
**विस्तृत परिचयपत्रक मागवा.**

**आदर्श वाङ्मय प्रकाशन**
खासबाग, कोल्हापूर : पुणें २.

**एकमेव विक्रेते :**

**ग. पां. परचुरे-प्रकाशन-मंदिर,**
**गोरेगांवकर चाळ, क्र २, गिरगांव, मुंबई ४.**

आदर्श वाङ्मय प्रकाशन

# शिवशाहीचा शुभशकून

शिवजन्मपूर्वकालीन ऐतिहासिक कादंबरी

विठ्ठल वामन हडप

आदर्श वाङ्मय प्रकाशन
पुणें २ : कोल्हापूर

द्वितीयावृत्ति : १९४६
किंमत ३ रुपये



या आवृत्तीचे एकमेव विक्रेते
स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर.

प्रकाशनाच्या मार्गावर

**मॅक्झिम गॉर्की**
चरित्र व वाङ्मयविवेचन

*

**महाराष्ट्राचा बुद्धिसागर**
ख्यातनाम मराठी साहित्यिकांच्या साहित्याचें
सर्वदर्शी मूल्यमापन



Printed by N. V Sardeshpande at Adarsha Mudranalaya, 395/5 Sadashiv, Poona 2. and published by V. V. Hadap for Adarsha Wangmaya Prakashan, 395/5 Sadashiv, Poona 2.

● मराठी साम्राज्याचा इतिहास कादंबरीरूपानें कथन करण्याचा माझा संकल्प होता; तो ' कादंबरीमय पेशवाई ' मालेच्या रूपानें प्रथम मूर्त स्वरूपाला येऊं लागला. हा मराठी साम्राज्याचा इतिहास म्हणजे थोड्याशा पर्यायानें त्यांतील प्रांतीय वैशिष्ट्य वजा करतां साऱ्या हिंदुस्थानचाच अर्वाचीन इतिहास होय. या इतिहासाचे शिवशाही, पेशवाई, व आंग्लशाही असे तीन कालखंड कल्पून ह्या तीन कालखंडांवर तत्त्वतः एकच पण सकृद्दर्शनीं निरनिराळ्या तीन अशा ' कादंबरीमय शिवशाही ' ' कादंबरीमय पेशवाई ' व ' कादंबरीमय आंग्लशाही ' या तीन कादंबरी-मालांतून कादंबऱ्या मला गुंफायच्या होत्या व आहेत. केवळ प्रकाशन कार्याच्या सोईसाठीं मीं ' कादंबरीमय पेशवाई ' प्रथम हातीं घेतली इतकेंच. ती माला नियमितपणें चालूं लागली तेव्हां त्या दरम्यान ' कादंबरीमय शिवशाही ' दुसऱ्या एका प्रकाशकांच्या आग्रहावरून मीं हातीं घेतली, व त्या मालेंतील ' शिवशाहीचा शुभशकून ' ही पहिली कादंबरी दीड तपापूर्वीं प्रसिद्धही झाली. पेशवाईवरील कादंबऱ्यांप्रमाणेंच याही कादंबरीचें जनतेकडून उत्साहानें स्वागतही झालें. परंतु त्यानंतर प्रकाशकांच्या अडचणींमुळें व माझ्या कार्यबाहुल्यामुळें ' शिवशाही ' माला पुढें गुंफणें आजपावेतों मला शक्य झालें नाहीं. आतां येथील स्कूल व कॉलेज बुकस्टॉलचे सुविद्य चालक व मालक श्री. दा. ना. मोघे यांनीं तें कार्य पत्करलें आहे. त्याप्रमाणें ' शिवशाहीची पहांट ' ही पहिली कादंबरी याच सुमाराला प्रसिद्ध होत आहे.

' शिवशाहीचा शुभशकून ' ही कादंबरी मीं दीड तपापूर्वीं या मालेंतील पहिली कादंबरी म्हणून लिहिली; तरी तिचा समावेश

आतां ' कादंबरीमय शिवशाहीमध्यें ' केलेला नाहीं. याचें कारण, आज शिवशाहीवरील विपुल ऐतिहासिक पुरावा उपलब्ध आहे व त्याचा मीं ' कादंबरीमय शिवशाही ' मालेमधील कादंबरीलेखनांत भरपूर उपयोगही करून घेत आहें. विशेषतः शिवजन्म व तत्कालीन परिस्थिति यांवर आज उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक पुराव्यानें शिव-जन्मतिथीच नव्हे तर त्या सबंध इतिहासाचा ओघच बदलला आहे. हीं साधनें ' शिवशाहीचा शुभशकून ' लिहितांना मला उपलब्ध नव्हतीं. त्यामुळें तेव्हां उपलब्ध असलेल्या अपुऱ्या ऐतिहासिक साधनांच्या आधारें त्या कथानकाची गुंफण झाली आहे. या कादंबरीची प्रथमावृत्ति संपून बरींच वर्षें झालीं. तिला मागणी असतांही मध्यंतरीं युद्धकाल व मुद्रणसाहित्यावरील नियंत्रणें, यामुळें दुसरी आवृत्ति प्रकाशांत आणणें आजवर शक्य झालें नाहीं. आणि आजदेखील, ' कादंबरीमय शिवशाही ' चें प्रकाशन मार्गस्थ झाल्यामुळेंच , त्या सांखळीचा अकल्पितपणें अलग पडलेला हा पहिला दुवा तिला प्रथमच जोडून देणें अवश्य होतें म्हणूनच केवळ ही प्रस्तुत कादं-बरीची दुसरी आवृत्ति तिच्यांतील अगदीं अवश्य त्या चुका दुरुस्त करून मी प्रकाशांत आणीत आहें. या कादंबरींत शहाजीराजांच्या बाल्यकालापासून शिवजन्मापावेतोंचें कथानक आहे; व ' कादंबरी-मय शिवशाही 'च्या ' शिवशाहीची पहांट ' या पहिल्या कादं-बरींत शिवाजीचा बाल्यकाळ हा कथानकाचा पाया समजण्यांत आला आहे.

वास्तविक ' कादंबरीमय शिवशाही ' माला सुयांत्रितपणें प्रका-शनाच्या मार्गाला लागण्याच्या पूर्वींच ' कादंबरीमय पेशवाई ' माला पूर्ण व्हायला हवी होती. ' कादंबरीमय पेशवाई ' माला एकूण सुमारें पंचवीस कादंबऱ्यांत पूर्ण व्हावयाची होती, तिच्यापैकीं सतरा

कादंबऱ्या आजवर प्रसिद्ध झाल्या आहेत. ही माला व्यवस्थितपण प्रकाशनाच्या मार्गाला लागली, म्हणून मीं आजवर लिहिली; व त्या प्रकाशनाची जबाबदारी त्या प्रकाशन संस्थेचे तेव्हांचे एक प्रमुख चालक कै. बळवंत विष्णु परचुरे यांनीं संस्थेच्या वतीनें आश्वासनपूर्वक शिरावर घेऊन शक्य तितक्या समर्थपणें पार पाडली. पण युद्धजन्य परिस्थितीमुळें दरम्यान मालेंतील कादंबऱ्यांच्या प्रकाशनाची गति मंद झाली. युद्धाचा शेवट होऊन परिस्थिति निवळण्याच्या पूर्वींच श्री. परचुरे यांचा त्या प्रकाशन संस्थेशीं संबंध तुटल्यामुळें व नंतर ते इहलोक सोडून गेल्यामुळें एक प्रकारें 'कादंबरीमय पेशवाई 'मधील प्राण निघून गेल्यासारखी तिची अवस्था, लेखक या नात्यानें माझ्यापुरती तरी झाली. सदर मालेचें अपूर्ण प्रकाशन पूर्ण करण्याचे अधिकार प्रकाशकांशीं झालेल्या कायदेशीर करारमदारानुसार माझ्याकडे नाहींत. त्यामुळें व अशाच माझ्या आवाक्याबाहेरील तज्जन्य परिस्थितीमुळें मालेच्या वाचकांना विश्वासांत घेऊन तूर्त मी कर्तव्य म्हणून एवढेंच सांगूं शकतों कीं सदर 'कादंबरीमय पेशवाई' माला आतां पूर्वसंकल्पानुसार माझ्या हातून पूर्ण होण्याची फारशी शक्यता दिसत नाहीं.

परंतु अनपेक्षित अशा अन्य रीतीनें हें अपूर्ण राहिलेलें कार्य पूर्ण होण्याचीही शक्यता मात्र दिसते आहे. पेशवाईच्या ऐतिहासिक कालखंडावर आजपावेतों उपलब्ध झालेलें इतिहाससंशोधन जमेला धरून व अधिक व्यापक दृष्टिकोण ठेवून एक ऐतिहासिक कादंबरीमाला गुंफण्यासाठीं नवे नवे तरुण व समर्थ असे उदयोन्मुख लेखक पुढें येण्याच्या मार्गावर आहेत असें मला कळतें. त्यांना मी मनःपूर्वक सुयश चिंतितों. मला यांत आनंद वाटण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण असें कीं 'कादंबरीमय पेशवाई 'चा संकल्प करतांना

माझा इतिहासाकडे पाहण्याचा दृष्टिकोन केवळ पारंपरिक, मर्यादित व विभूतिपूजात्मक होता. तो आतां पूर्ण बदलला आहे. याविषयींचें स्पष्ट निवेदन मीं 'पेशवाई' वरील चौदाव्या कादंबरींत केलेंही आहे. या बदललेल्या व्यापक, वास्तव व यथावत् सत्यदर्शी दृष्टिकोणांतून पेशवाईच्या इतिहासाचें परिशीलन करून तो इतिहास कथारूपानें पेशवाईच्या राहिलेल्या कादंबऱ्यांतून निवेदन करणें 'कादंबरीमय पेशवाईच्या' प्रस्थापित प्रथेशीं विसंगत दिसलें असतें, ही माझी अडचणही पूर्वोक्त निवेदनांतून वाचकांच्या ध्यानीं आलेली आहे. अशा स्थितींत जें कार्य मला कर्तव्य म्हणून करायला हवेंहवेंसें वाटत होतें, व जें करायला मी अनेक अडचणींमुळें 'पेशवाई' मालेपुरता असमर्थ ठरलों होतों, तें कार्य कोणा कार्यक्षम उदयोन्मुख कथालेखकाकडून पूर्ण झाल्यास अनायासें माझ्याकडून अपूर्ण राहिलेल्या कार्याची वेगळ्या स्वरूपांत का होईना पण पूर्तता होणार आहे. त्यांत मी आनंद कां न मानावा ?

'कादंबरीमय शिवशाही' चा संकल्पित ऐतिहासिक कालखंड शिवजन्मापासून (सन १६३०) स्थूलतः छत्रपति राजारामाच्या मृत्यूपावेतोंचा. 'कादंबरीमय पेशवाई 'चा ऐतिहासिक कालखंड बाळाजी विश्वनाथ पेशव्यांच्या उदयापासून पेशवाई बुडेपावेतोंचा. आणि त्यानंतर सन १८५७ च्या बंडापासून हिंदुस्थानांतून इंग्रजी सत्ता समूळ नष्ट होईपावेतोंचा काळ हा 'कादंबरीमय आंग्लशाही 'चा. ह्या शेवटच्या कालखंडावर कादंबरीमय आंग्लशाही 'मालेंतून सुमारें बारा ते पंधरा कादंबऱ्या मला गुंफायच्या आहेत. त्यांतील पहिली कादंबरी आज प्रकाशनाचा मार्ग चालत आहे.

**विठ्ठल वामन हडप**

# शिवशाहीचा शुभशकून

## प्रकरण पहिलें

## रंगपंचमी

आज रंगपंचमी! त्यानिमित्त शिंदखेडचे लखुजी जाधवराव यांच्या वाड्यांत आज फार टोलेजंग उत्सव साजरा होत होता. ह्या उत्सवानिमित्त जाधवरावांनीं आपल्या सर्व आश्रितांना व आप्तेष्टांना मुद्दाम पाचारण केलें होतें, त्यांत जाधवरावांच्या शिफारसीनें अहमदनगरच्या निजामशाहींत हळुहळु नांवारूपाला येऊं पाहाणारे वेरुळचे मालोजी भोंसले पाटील यांनाही आमंत्रण होतें. मालोजी पाटील कुठेंही गेले, तरी त्यांचा नवानवसाचा झालेला पुत्र शहाजी त्यांच्याबरोबर असायचाच. मालोजी पाटील जाधवरावांच्याच आश्रयानें निजामशाहींत वैभव-गिरीचें शिखर पायरी-पायरीनें चढूं लागल्यामुळें त्यांचा व जाधवरावांचा घरोबा फार. इतका घरोबा कीं, परक्या माणसांना वाटावें, यांची जणूं सोयरीकच आहे. वास्तविक जाधवराव तेव्हां निजामशाहींतील दसहजारी सरदार, प्रतिभूपालाप्रमाणें त्यांचें अपार वैभव व दांडगा दरारा; व मालोजी एक साधा पाटील! पण जाधवराव मालोजीच्या पराक्रमावर प्रसन्न असल्यानें त्यांनीं त्याच्याशीं वागतांना हा उच्च नीच भाव मनांत मुळींच आणूं नये. बहुधा प्रत्येक सणावारीं जाधवरावांच्या घरीं मालोजीला घरोब्याचें आमंत्रण असायचें व मालोजीनेंही घरोब्यानें तें अवश्य स्वीकारायचें. तसाच आजही मालोजी रंगपंचमीच्या उत्सवानिमित्त आला होता.

जाधवरावांना मालोजी भोंसले जितका आवडे तितकाच त्याचा पुत्र शहाजीही आवडे. अगदीं लहानपणापासून हरएक सणावारीं मालोजीबरोबर शहाजी जाधवरावांच्या घरीं यायचा, त्यामुळें त्याची व जाधवरावांची चांगलीच दोस्ती जमली होती. अगदीं प्रथम मालोजी शहाजीला असाच रंगपंच-

मीच्या सणासाठीं बरोबर घेऊन आला होता तेव्हां शहाजी पांचसहा वर्षांचा होता. तेव्हांपासूनच तो जाधवरावांचा आवडता झाला होता. जाधवरावांनाच काय, कोणालाही सहज आवडण्यासारखी, कोणालाही भुरळ पाडण्यासारखी अजब जादू शहाजीच्या सौंदर्यांत व चाणाक्षपणांत वसत होती. जाधवरावांनीं तेव्हां लहानग्या शहाजीकडे पाहून हर्षभरित अंतःकरणानें मालोजीला वारंवार उत्तेजन द्यावें कीं, हा मुलगा पुढें मोठें नशीब काढील. तेव्हां तें ऐकून मालोजीला आनंदानें आकाश ठेंगणें व्हावें. त्यानें सद्गदित कंठानें उद्गार काढावे, "जाधवराव ! माझा पुत्र पराक्रमी निपजून नशीब काढूं शकला तर त्यांत जसें मला भूषण आहे तसेंच आपणांलाही भूषण आहे. जग म्हणेल, मालोजी भोंसल्यांचा पुत्र पराक्रमी झाला. पण मालोजी भोंसला कृतज्ञपणें साऱ्या जगाला सांगेल, मालोजीला नांवारूपाला जाधवरावांनीं आणलें; या शहाजीचाही पिंड पोसला तो जाधवरावांच्या अन्नावर पोसला. शहाजीच्या पराक्रमाचें सारें श्रेय जाधवरावांना आहे."

असो. इतका जाधवराव व मालोजी यांचा दृढतर स्नेहसंबंध असल्यानें आज रंगपंचमीच्या दरबारांत मालोजी शहाजीला घेऊन येतांच जाधवरावांनीं शहाजीला वात्सल्यप्रेमानें हांक मारून जवळ घेतलें. एका मांडीवर त्यांची तीन वर्षांची जिजा बसली होती, तिच्याबरोबर त्याला दुसऱ्या मांडीवर बसविलें. तें दृश्य पाहून सर्व दरबारी लोकांना वाटलें कीं, 'मालोजीचा पोरगा केवढा भाग्यवान ! कुठें सामान्य मालोजी भोंसला व कुठें जाधवराव ! कुठें इंद्राचा ऐरावत व कुठें शामभटाचें तट्टू ! पण नशीब जोरावर असलें कीं तें असें आपला प्रभाव दाखवितें.'

मालोजीला मात्र तें मनोरम दृश्य पाहून कांहीं निराळेंच वाटलें. त्याला वाटलें, माझ्या शहाजीशीं जर जाधवरावांच्या देवकीची सोयरीक जमेल तर काय बहार होईल ! पण आपली गरिबी मालोजी विसरला नव्हता. आपण एक यःकश्चित दरिद्री सामान्य पाटील, व जाधवराव पडले बडे मनसबदार ! पण ह्या सांपत्तिक विषमतेचा विषय तेवढा सोडून दिला तर बाकीच्या कुलशीलाच्या व पराक्रमाच्या दृष्टीनें आपण जाधवरावांहून कोणत्याही प्रकारें हलके नाहीं, याविषयीं मालोजीची मनोदेवता त्याला स्पष्ट साक्ष देत होती. जाधवही मोठेच होते; ते भगवान् श्रीकृष्णाच्या यादव वंशांतील यादव होते.

ह्या वंशाच्या थोरवीचा त्यांना अभिमान वाटत होता. तो सार्थच होता. ती त्यांची थोरवी शहाजीलाही मान्य होती. पण तो मनांत म्हणे, माझी थोरवी याहूनही थोर आहे. किंबहुना वंशाच्या दृष्टीनें पाहतां माझे पूर्वज यादवांच्या पूर्वजांपूर्वीपासून अतुल पराक्रमी व धर्मशील पृथ्वीपति म्हणून गाजलेले आहेत. जाधवरावांचा वंश प्राचीन खरा; पण माझा वंश त्यांच्या वंशापेक्षांही प्राचीन आहे. जाधवरावांना आपले पूर्वज कृष्णावतारापासून मोजावे लागतात तर माझा पूर्वज कृष्णावताराच्याही पूर्वीचा दाशरथी राम होता. अर्थात् कुलाच्या दृष्टीनें मी जाधवरावांहून श्रेष्ठ आहे. आणि पराक्रम!—त्याविषयीं मालोजीनें स्वतःच आपल्याविषयीं निर्वाळा देण्याचें तेव्हां कांहींच कारण नव्हतें. कारण प्रत्यक्ष जाधवरावदेखील मालोजीला पराक्रमी पुरुष समजत, व तत्कालीन जनसमाजही—जाधवरावांना एक बडे मनसबदार म्हणून ओळखीत असला तरी—मालोजीला पराक्रमी पुरुष म्हणून ओळखी. याचा अर्थ जाधवराव कमी पराक्रमी होते असें नव्हे. पण समाजानें त्यांच्या दौलतीचें जेवढें कौतुक करावें, तेवढेंच—किंबहुना त्याहूनही जास्त मालोजीच्या पराक्रमाचें कौतुक करावें. मालोजीनें निजामशाहींत नोकरीपेशा पत्करल्यापासून निजामशाहच्या धन्यालाही आपल्या पराक्रमाची साक्ष पटवून दिली होती. व हा मर्द मराठा गडी दिवसेंदिवस अधिकाधिक नांवारूपाला येणार याविषयीं कोणाला शंका नव्हती. 'इतकें सारें जरी खरें, तरी जनतेचा आपल्या पराक्रमावर असलेला विश्वास आपणाला जाधवरावांशीं सोयरीक करणाच्या कामीं पुरा पडायचा नाहीं. तद्वतच आपण जोंपर्यंत पराक्रम गाजवून जाधवरावांच्या तोडीचे किंवा त्याहून थोर सरदार झालों नाहीं, तोंवर आपणाला त्यांच्याशीं बरोबरी कशी करतां येणार?' असा विवेक करून मालोजीनें ' जाधवरावांशीं आपली सोयरीक होईल तर फार उत्तम होईल ' हा विचार कांहींसा कष्टानें मनांतल्या मनांतच जिरू दिला, व आज आपला—एका सामान्य पाटलाचा—मुलगा एवढ्या मोठ्या मनसबदाराच्या मांडीवर बसून त्याच्या मुलीशीं रंग खेळतो आहे, यांतच तात्पुरतें समाधान मानून घेतलें.

दरबारांत उत्सव चालला होता, त्याचें वर्णन कोठवर करावें! एवढ्या मोठ्या वैभवशाली जाधवरावांच्या वाड्यांतील उत्सव तो! पण सामान्य वैभव-देखाव्यांच्याही थोबाडींत मारील असें एक मनोरम दृश्य तेथें पाहून जाधवरावांना देखील क्षणभर त्या महोत्सवाचा विसर पडला व त्या दृश्याकडेच पाहात रहावेंसें

वाटलें. जसें त्यांना वाटलें तसेंच मालोजीलाही वाटलें, व तसेंच दरबारांतील इतर सर्व लोकांनाही वाटलें. अप्सरांसारख्या सुंदर नर्तकी आपल्या कोकिल-कंठाहूनही कोमल व गोड अशा आवाजानें बैठकखान्याच्या मध्यभागीं अत्यंत मनोरम अभिनययुक्त असें गायन—नर्तन करीत होत्या; पण त्यादेखील मधून मधून त्या मनोरम दृश्याकडे पाहात. सभेनें त्यांच्या सौंदर्यावर—त्यांच्या अभि-नयावर--त्यांच्या कोकिलकंठी गायनावर-त्यांच्या आलापांवर भुलून डोलूं लागावें; पण त्यांनीं त्या दृश्याकडे पाहून डोलावें! सुंदर रमणींचें लावण्य--दर्शन, त्यांचें मधुर गायन, आणि त्यांचा अत्युत्कृष्ट अभिनय यांसारखें रंगेल लोकांच्या नयनांचें पारणें फेडणारें, त्यांना भुलविणारें, त्यांना झुलविणारें, त्यांना डोल-विणारें, आणि तें अशा रंगपंचमीच्या महोत्सवांत—रमणीयत्व दुसरें काय असणार! पण त्या रमणीयत्वाचा रंग मनमुराद लुटीत असतांनाही त्या मनोरम दृश्यानें तमाम दरबारी लोकांचें लक्ष आपल्याकडे खेंचून घेतलें होतें.

असें तें दृश्य तरी कोणतें? साखरेहून अधिक गोड असा तो पदार्थ तरी कोणता? सभेंतील नाचरंग, आमोदप्रमोद, या सर्वांवर तेथल्या तेथें सभें-तल्या सभेंत मात करणारी अशी ती रमणीय वस्तु कोणती बरें असेल?

तें दृश्य जाधवरावांच्या मांडीवर खेळणाऱ्या दोघां बालकांचें होतें.

जसा शहाजी मदनासारखा सुंदर होता, तशीच जाधवरावांची लेंक जिजाही रतिसारखी सुंदर होती. मुलेंच तीं; त्यांना जगाची काय पर्वा! सारा दरबार त्यांच्या लीला पाहाण्यांत रंगून राहिला होता, तर तीं एकमेकांशीं खेळण्यांत रंगून राहिलीं होतीं. खेळतां खेळतां जाधवरावांच्या पुढ्यांत एक सोन्याचें ताट गुलालानें भरलेलें होतें तिकडे त्यांचें लक्ष गेलें. दरबारची शिस्त अशी कीं, प्रथम खाशा स्वारीनें गुलाल उधळण्याला व रंग खेळण्याला सुरुवात करावयाची, व मग इतरांनीं खेळायचें. पण त्या मुलांना ह्या दरबारी शिस्तीची काय पर्वा! तीं दोघेंही जाधवरावांच्या मांडीवरून खालीं उतरलीं व ताटांतील गुलाल मुठी भरभरून एकमेकांवर उधळूं लागलीं. त्यांनीं जाधवरावांवरही बेदरकारपणें हंसत हंसत रंग उधळला. खाशांनीं अजून रंग उधळायचा होता; पण ती सुरुवात ह्या मुलांनीं केली. जाधवराव, मालोजी व इतर मंडळी तो देखावा पाहात होती. शहाजी जिजाहून वयानें तीन वर्षांनीं मोठा, अर्थात् कोण कोणावर जास्त रंग उधळतें अशा बालिश अहमहमिकेंत

जिजाच हरली. शहाजीनें तिच्यावर रंग उधळून उधळून इतकें हैराण केलें कीं, अखेर ती हंसत खिदळत त्या रंगाचा मारा चुकविण्यासाठीं डोळे चोळीत चोळीत जाधवरावांच्या मांडीवर येऊन बसली. लगेच शहाजीही चटकन् तिच्यावर रंगाच्या मुठी फेंकीत जाधवरावांच्या दुसऱ्या मांडीवर जाऊन बसला.

जाधवराव अपत्यवात्सल्यानें जिजाच्या हनुवटीला हात लावून म्हणाले, " जिजा ! तुला शहाजी नवरा पाहिजे का ? "

जिजा चटकन् उत्तरली, " हो ! "

तिचें उत्तर ऐकून जाधवरावांना मनापासून हंसूं आलें. त्यांनीं लगेच शहाजीच्या पाठीवरून हात फिरवीत त्याला विचारलें, " काय रे ! तुला ही बायको पाहिजे काय ? "

शहाजी उत्तरला, " हो ! "

हीं प्रश्नोत्तरें ऐकून सर्व मंडळीला मोठी मौज वाटली. व जाधवरावांनाही मौज वाटली. जवळच मालोजी बसला होता, त्याच्याकडे व सर्व मंडळीकडे वळून ते म्हणाले, " हा जोडा फार छान शोभतो नाहीं ? "

सर्वजण आनंदानें उत्तरले, " हो ! जोडा फार छान शोभतो. "

जो विचार थोड्या वेळापूर्वी मालोजीच्या मनांत आला होता, तोच विचार जाधवरावांनीं सहज बोलून दाखविला. त्यांनीं पूर्ण विचार करून ते शब्द उच्चारले नसतील, सहज ओघानें विनोदाच्या भरांत त्यांच्या तोंडून शब्द निघून गेले असतील. पण मालोजीला वाटलें, " साक्षात् परमेश्वरच जाधवरावांच्या मुखानें भविष्यकाळांतील योगायोगाविषयीं बोलला. आपण आतांच मनांत जें इच्छिलें, त्याला परमेश्वरानें मान्यता दिली, अर्थात् आपली ती इच्छा अन्यथा नव्हती." अशी स्वतःच्या मनाशीं खूणगांठ बांधून मालोजी उठून उभा राहिला व दरबारांतील सर्व लोकांना उद्देशून म्हणाला, " मंडळी हो ! जाधवरावांचें बोलणें तुम्ही सर्वांनीं ऐकलेंच आहे. आज जाधवराव व आम्ही भोसले व्याही व्याही झालों, याला तुम्ही सर्वजण साक्षी आहां. "

मालोजीचे बोल ऐकून दरबारांत जमलेल्या सर्व लोकांनीं संमतिदर्शक मान डोलवली.

पण जाधवराव मात्र कांहीं बोलले नाहींत.

तो रंगपंचमीचा दरबार मोठ्या थाटामाटानें पार पडला. ‘ आतां भोजन-समारंभ उदयीक व्हायचा, त्याला सर्वांनीं यावें ’ असें जाधवरावांनीं भर दरबारांत सर्व मंडळींना आमंत्रण दिलें व तें सर्वांनीं मान्य केलें. पण मालोजी मात्र उत्तरला, “ जाधवराव ! तुम्ही, आम्ही व्याही झालों, आतां आमचा एकत्र भोजनसमारंभ आपल्या मुलांच्या लग्नावेळीं होईल. ”

प्रकरण दुसरें

## रंगाचा बेरंग

हुत्त्या लोकांत जाधवराव व मालोजी यांचे जे सवालजबाब झाले ते गुप्त थोडेच राहातात ! जेव्हांची तेव्हां ती बातमी जाधवरावांच्या घरांत कळली. ती ऐकून म्हाळसाबाईंना—जाधवरावांच्या पत्नीला—राग आला. जाधवराव घरीं येतांच तिनें त्यांना विचारलें, “ जिजाचें लग्न ठरविलें काय ? ”

“ नाहीं. ” जाधवराव उत्तरले.

“ नाहीं कसें ? आज दरबारांत काय काय गोष्टी घडल्या त्या माझ्या कानीं आल्या नाहींत अशी आपली कल्पना आहे कीं काय ? मला कळलें, मालोजी तर भर दरबारांत ‘ आम्ही व्याही व्याही झालों ’ असें बोलूनही मोकळे झाले. लोकांनीं त्यांच्या म्हणण्याला मान डोलविली, व आपण तें शांतपणानें ऐकून घेतलें. त्या अर्थी आपणांला ती गोष्ट आवडली असाच अर्थ झाला नाहीं का ? ”

“ असें कसें होईल ? अशा थट्टेतल्या गोष्टी कोणी गृहीत धरल्या आहेत का ? ”

“ तेंच मी तरी म्हणत्यें, पण मालोजींचा मानस निराळा दिसतो. उगाच त्यांनीं उद्यां आपल्याकडे जेवायला यायचें आमंत्रण नाकारलें का ? आपला खरोखरच तसा मानस नाहीं ना ? ”

" नाहीं " जाधवराव म्हणाले, " म्हाळसे ! मी इतका का वेडा आहे ? "

" तेंच मी तरी म्हणतें, कुठें जाधवराव, कुठें भोंसले ! आपण त्यांना अन्नाला लावले म्हणून मालोजींना आजचे दिवस तरी दिसले. आमच्या बरोबरीचे निंबाळकर, शिरके, महाडीक वगैरे मातबर पादशाही नोकरांच्या घरीं मुलगे आहेत, ते सोडून असल्या दरिद्याच्या घरीं कोण मुलगी देईल ? मालोजींना तरी कांहीं विचार पाहिजे होता. भर दरबारांत ' आम्ही व्याही व्याही झालों ' म्हणतात याचा अर्थ काय ? झालें तें झालें, पण आतां तरी मी सांगतें तसें आपण कराल का ? "

" काय करूं ? "

" आतांच्या आतां मालोजींना बोलावून आणून त्यांची नीट समजूत घालायला हवी. "

" ठीक आहे. " असें म्हणून जाधवरावांनीं तिथल्या तिथें मालोजीला बोलावणें पाठविलें.

" जाधवराव कशाला बोलावीत आहेत " असें नोकरानें वर्दी आणली तेव्हां मालोजीनें त्याला विचारलें. नोकरानें कानांवर हात ठेवले. पण दरबारांत आपण 'जाधव व भोंसले आज व्याही व्याही झाले' असें जाहीर केलें तेव्हां ज्या-अर्थी जाधवराव कांहीं बोलले नाहींत, त्याअर्थी जिजा व शहाजी यांच्या विवाहाला मान्यता देण्याची त्यांची इच्छा नसावी असा मालोजीला संशय आला होताच. शिवाय म्हाळसाबाईचा मानी व घमेंडखोर स्वभावही त्याच्या पूर्ण परिचयाचा असल्यानें वेळीं जाधवरावांनीं ही सोयरीक मान्य केली तरी म्हाळसाबाई त्यांत हटकून खो घालणार असें मालोजीला स्वप्नच पडलें होतें. असें झालें तर काय करायचें हा प्रश्न त्याच्यासमोर होताच. " त्याच बाबीचा खुलासा करण्यासाठीं जर आपणाला जाधवरावांनीं बोलावलें असेल, तर त्यांच्यासमोर आपण काय बोलायचें ? आपण माघार घ्यावयाची काय ? जर आपण माघार घेतली तर दरबारांत इतक्या मंडळीसमोर आपण जाधवरावांच्या बरोबरीनें बोललों ते बोल फोल होते असें म्हणून इतके लोक आपल्या तोंडावर पिचिपिचि थुंकतील ! आपली टर करतील ! मग असलें अपमानकारक जिणें आपण कशासाठीं जगावें ? बस्स ! सोयरीक करीन तर जाधवरावांशींच करीन " अशा निग्रहानें मालोजी जाधवरावांच्या भेटीला गेला.

जाधवराव या वेळीं आपल्या बैठकखान्यांत तक्याशीं टेंकून बसले होते. ते मालोजी आलेला पाहतांच नुसतें 'या मालोजीराव! बसा' एवढेंच म्हणाले. शिष्टाचार म्हणून ते आपल्या बसल्या जाग्यावरून उठले नाहींत, बाजूला सरकलेंही नाहींत, किंवा नुसत्या हातानें त्याला गादीवर बसण्यासाठीं सुचविलेंही नाहीं. मालोजीला यांत अपमान वाटला. कारण जाधवरावांचा त्याच्याशीं वागण्याचा नेहमींचा परिपाठ असा नव्हता. मालोजी हा आपणांहून कमी मानाचा किंवा गरीब म्हणून त्याला उणेंदुणें लेखण्याचा दुजाभाव आजवर त्यांच्या मनाला शिवला नव्हता. मालोजी आला म्हणजे ते जरी बरोबरीच्या नात्यानें त्याला मान देण्यासाठीं बसल्या जाग्यावरून उठत नसत, तरी जरा सरकून उठल्यासारखें भासवीत व हातानें त्याला आपल्याजवळ गादीवर बसायला सुचवीत; मालोजी मात्र आपली पायरी ओळखून विनयशीलपणें त्यांच्या बरोबरीनें तक्याला टेंकून न बसतां गादीच्या टोंकाला बसे. पण ती इतर वेळेची गोष्ट झाली. आजची वेळ निराळी होती. आज ते दोघेहि आपापल्या परीनें मानापमानाच्या इरेला पेटले होते. आपल्या तोंडून चुकून सोयरिकीचा शब्द निघून गेला, त्याचा फायदा घेऊन मालोजी आपल्याशीं बरोबरी करायला तयार झाला; हा त्यानें लहान तोंडीं मोठा घांस घेतला. हा त्याचा चढेलपणा आपण यापुढें असाच चालूं दिला तर तो पुढें आपणाला नडेल, म्हणून त्याला त्याच्या पायरीप्रमाणेंच वागविलें पाहिजे, अशा विचारानेंच जाधवरावांनीं हेतुपुरःसर त्याला नेहमींप्रमाणें मान दिला नाहीं. मालोजीला असा संशय अगोदरच आला होता; त्यामुळें त्याच्या मनाला हा अपमान फार झोंबला. हीच दुसरी एखादी वेळ असती तर ती मालोजीच्या ध्यानीं-मनींही आली नसती. पण ही वेळ निराळी होती. आपणाला जाधवराव समान दर्जाचे मानतात कीं नाहीं, हें पाहाण्याची ही वेळ आहे हें मालोजीनें अगोदरच आपल्या मनाशीं ठरविलें होतें. त्यामुळें जाधवरावांच्या बैठकखान्यांत पाऊल ठेवल्यापासून तो ते बोलतात कसे, पाहातात कसे, करतात काय, याचें अत्यंत बारकाईनें निरीक्षण करीत होता. त्यामुळें जाधवरावांची मीपणाची वागणूक त्याच्या तेव्हांच ध्यानीं आली व शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें त्यानें मनोमन ओळखलें कीं, जाधव व भोंसले व्याही व्याही होतील तेव्हां होतील; पण आज ते वैरी वैरी होण्याचा मात्र संभव आहे.

जाधवरावांनीं मालोजीला नुसतें ' या बसा ' म्हटलें तेव्हां मालोजीला पेंच पडला. बसा कुठें ? नेहमींप्रमाणें गादीच्या टोंकाशीं बसावें तर ज्या अर्थी जाधवराव मुद्दाम आपला पाणउतारा करण्यासाठीं गादीवर बसायला सांगत नाहींत, त्या अर्थी आपण तरी नेहमींप्रमाणें तिथें बसून तेवढा तरी मान त्यांना कां द्या ? ते तक्याला टेंकून बसायचे व आपण त्यांच्या गादीच्या टोंकाशीं बसायचें एवढा तरी उणेपणा कां पत्करा ! मान द्यावा व मान घ्यावा. बस्स ! आपण बसूं तर जाधवरावांचे व्याही होऊन त्यांच्या बरोबरीनें तक्याला टेंकून बसूं; तोंपर्यंत त्यांच्या बैठकीवर बसायचें नाहीं.

मालोजीनें उभ्या उभ्याच जाधवरावांना विचारलें, " आपण कशाला बोलावणें पाठविलें होतें ? "

" बोलावणें अशासाठीं पाठविलें " जाधवराव मालोजीच्या प्रश्नांतील कडेपणा ओळखून कांहींसें वरमले व गादीच्या टोंकाकडे—नेहमीं मालोजी जिथें बसे तिकडे—बोट करून म्हणाले, "पण तुम्ही बसा तर खरे अगोदर!"

मालोजीनें जाधवरावांच्या ह्या ' बसा ' म्हणण्यांतील खोंच ओळखली. त्यांचा हात नेहमींप्रमाणें तक्याशीं वळला नाहीं; गादीच्या टोंकाकडे दूर वळला. त्यावरून ' तुमची योग्यता माझ्यासमोर इतक्या मर्यादेनें बसायची आहे ' असें त्यांनीं आढ्यतापूर्वक दर्शविलें. हें पाहून मालोजीला जास्तच चीड आली. प्रथम जाधवराव नुसते ' या बसा ' म्हणाले, त्या त्यांच्या शब्दांत भरलेली आढ्यता गर्भित होती; ती आतां आरशासारखी उघडी झाली. त्या त्यांच्या आढ्यतेला साजेसें उत्तर मालोजीच्या तोंडून ओघानेंच बाहेर पडलें, " आमची योग्यता आपल्याबरोबर गादीवर बसायची नाहीं. ती प्राप्त होईल तेव्हां गादीवर बसूं; तोंपर्यंत असेच उभे राहूं. आपणाला जर आम्ही हलक्या दर्जाचे वाटतों, तर आम्हीं तरी असला लोंचटपणा कां म्हणून करावा ? "

मालोजीच्या ह्या बाणेदारपणाच्या उत्तरानें जाधवराव खजिल झाले. त्यांनीं मालोजीच्या भाषणांतील बांक ओळखून तो विषयच सोडला व मुख्य विषयाला हात घातला.

" मालोजीराव ! तुम्हीं आज दरबारांत व्याही होण्याची गोष्ट काढली—"

" गोष्ट तुम्हीं काढली." मालोजी जाधवरावांना नेमके शब्दांत पकडून

म्हणाला, " तुम्हीं जिजा–शहाजींचा जोडा कसा दिसतो असें मला व सर्वांना विचारलें, जोडा छान दिसतो असें सर्वांचें मत पडलें, व मलाही तो जोडा छान दिसला, म्हणून तुमच्या शब्दाला मीं मान दिला. "

" कबूल ! गोष्ट आम्हीं काढली. पण थट्टेंत आम्ही तसें बोललों. म्हणून तें खरें थोडेंच धरायचें ?"

" थट्टा ? ही थट्टा ? " मालोजी इतका वेळ आपला राग आवरून धरण्याचा प्रयत्न करीत होता; पण आतां तो त्याला आवरेनासा झाला. तो म्हणाला, "जाधवराव ! तुमच्या– आमच्यासारखे कुलीन मराठे लोक जर सोयरिकीच्या बाबतींत असली थट्टा करूं लागले तर तुमच्या–आमच्या अब्रूची देखील थट्टाच होईल कीं ! "

जाधवराव व मालोजी यांचें संभाषण ऐकून म्हाळसाबाई बाहेर आल्या व मालोजीला म्हणाल्या, " मालोजीराव ! तुम्ही तरी कसे असे लहान तोंडीं मोठा घांस घेऊं पाहाता हो ! माणसानें केव्हां झालें तरी आपली पायरी ओळखून वागायला हवें. "

"मग वहिनीसाहेब ! तुमची मुलगी माझी सून व्हावी अशी अपेक्षा मीं धरली यांत मीं माझी पायरी काय सोडली ? तुमची दौलत मोठी व माझी दौलत लहान, म्हणून मी लहान कीं काय ? एरव्हीं माझें कुलशील, माझ्या घराण्याचा लौकिक–"

" तें सारें मला माहीत आहे, पण त्यांनींही सांगितलें व मीही साफ सांगत्यें, आम्ही तुमच्या घरीं मुलगी देणार नाहीं. माझी जिजा जन्माला आली ती कुणा उपऱ्या शिलेदार–बारगिराची बायको व्हायला जन्माला आलेली नाहीं."

वज्राघात ! म्हाळसाबाईच्या बोलांनीं मालोजीच्या मस्तकावर जणूं वज्राघात झाला. अखेर म्हाळसाबाईनीं मालोजीचें दारिद्य हेंच त्याचें उणें काढलें. मालोजीचा पराक्रम, त्याचें कुलशील सर्व कांहीं त्याच्या एका दारिद्यासमोर मातीमोल ठरलें. मालोजीच्या सर्वांगाची लाही लाही झाली. तो जाधवरावांकडे वळून म्हणाला, " जाधवराव ! वहिनीसाहेब बोलल्या त्या बाईलबुद्धि म्हणून बोलल्या. पण तुम्हांला देखील असेंच वाटतें का ? सांगा ? सांगा–तुम्ही पुरुष आहां; पुरुषार्थ म्हणजे काय त्याची तुम्हांला चांगली पारख आहे. पराक्रमी पुरुषाला पुरुषार्थाच्या जोरावर तुमच्याएवढी मनसबदारी च काय पण दुनियेची

दौलतदेखील संपादन करतां येईल. पण पूर्वजांची दौलत कुणा नांवाच्या पुरुषाला पुरुषार्थ मिळवून द्यायला मात्र पुरी पडायची नाहीं. दौलत दौलत ही काय चीज आहे ! ह्या मालोजी भोंसल्याच्या मनगटांत एवढें बळ आहे कीं,–पण जाऊं द्या ! एकूण काय, जाधवराव ! तुम्हांला तुमचा शब्द पाळायचा नाहीं ना ? ”

जाधवराव म्हणाले, “ मालोजीराव ! मी तुम्हांला एकवार सांगितलें ना ! आम्ही काल बोललों तें थट्टेत बोललों. ”

“ पण मी बोललों तें खरें बोललों; आणि तेंच पुन्हां बोलतों. ह्या मालोजीच्या नसांतून जर भोंसल्यांचें खरें रक्त खेळत असेल, तर तो सोयरीक करील ती जाधवरावांशींच करील. इतकेंच काय पण अशी एक वेळ ईश्वर-कृपेंकरून येईल कीं, तेव्हां ह्याच जाधवांना आपला दौलतीचा सारा दिमाख बाजूला ठेवून भोंसल्यासमोर माथा नम्र करावा लागेल. ” एवढें बोलून मालोजी बाणासारखा तिथून निघून गेला.

त्या दिवशीं मालोजीला चैन मुळींच पडलें नाहीं. “ अपमान ! आपण गरीब म्हणून जाधवरावांनीं आपल्या मुलाला मुलगी देऊं केलेली नाकबूल केली; असला अपमान सोसण्यापेक्षां मरण आलेलें काय वाईट ! ”

हा अपमानाचा डाग धुवून कसा काढावा ह्या चिंतेनें मालोजीचें अंतः-करण होरपळलें जात असतां तशाच स्थितींत तो तडक शहाजीला घेऊन ‘ यापुढें जाधवरावांशीं सोयरीक झाली नाहीं, तोंपर्यंत त्यांच्या हद्दींत पाणी देखील प्यायचें नाहीं ’ अशा निर्धारानें दौलताबादेला गेला. पण तो गेला तरी त्याची चिंता त्याचा पाठपुरावा करीत होतीच. ती त्याला स्वस्थ कसें तें जरा देखील बसूं देईना. त्यानें आपल्या मनाशीं कर कर विचार केला कीं, ह्या अपमानाची परतफेड करायला उपाय काय ? पण उपाय कांहीं नाहीं. आपण मोठे पराक्रम करूं, दौलत मिळवूं, पुढें मागें जाधवरावांच्या तोडीचेच काय; त्यांच्याहूनही कांकणभर चढ असे मनसबदार होऊं, सर्व कांहीं होईल. पण त्याला अवधि लागेल. तेवढ्यांत जाधवराव जिजाचें लग्न दुसऱ्या एखाद्या नवऱ्या मुलाशीं लावून देऊन मोकळे होतील व आपलें सर्वत्र हंसें होईल.

जातिवंत वीराला अपमान व अपजय हा मरणाहूनही जास्त तापदायक असतो. मालोजीला जेव्हां या अपमानाचें परिमार्जन करायचा कांहीं उपाय

सुचेना, तेव्हां त्यालाही असल्या जिण्यापेक्षां मरण बरें असेंच वाटलें. आतां मरायचें, अपमानानें काळें झालेलें तोंड जगाला दाखवायचें नाहीं, अशा निश्चयानें तो अस्तमानाच्या समयीं तसाच उठला व तरवार कमेरला लटकवून तडक आपल्या शेतमळयावर भगवतीचें एक लहानसें देवालय होतें तिथें गेला. आपण कुठें व कशासाठीं जातों हें त्यानें घरांत कुणालाही सांगितलें नाहीं.

मालोजीची त्या दैवतावर अतोनात श्रद्धा होती. कोणतीही महत्त्वाची गोष्ट करायची झाली तरी तो त्या आपल्या शेतांतील भगवतीचा कौल घेतल्याशिवाय कधींही करीत नसे, व देवीच्या कौलाचा प्रत्यय त्याला हातोहात पटेही.

पण आज मालोजी जो देवीपाशीं आला, तो देवीला सांकडें घालून रडत बसण्यासाठीं आला नाहीं किंवा आपला जाधवरावांनीं अपमान केला म्हणून त्यांचा सत्यनाश होवो अशी प्रार्थना करण्यासाठींही आला नाहीं. आपला अपमान झाला खरा; पण त्याची भरपाई होण्याची शक्यता त्याला दिसेना. आतां आपण मरायचें तें आपलें शिरकमल आपल्या आराध्यदेवताच्या चरणीं अर्पण करून मरायचें अशा निश्चयानें तो आज येथें आला होता. जें यश आपल्या पराक्रमाच्या आटोक्यांत नाहीं, त्याविषयीं देवीला संकट घालून तिला अपेशी ठरविणें त्याला रुचलें नाहीं. त्यानें देवीसमोर उभा राहून ध्यान करून हात जोडून अनन्य भावानें तिची करुणा भाकली, आपली कर्मकहाणी अनन्यभावानें तिला निवेदन केली, "आई जगदंबे! हा तुझा निस्सीम भक्त अशा अपमानास्पद स्थितींत जगांत जिवंत राहिला तर त्यांत तुझ्या देवपणाची नाचक्की होईल. ही देवी नवसाला पावत नाहीं असें पाहून इतर भक्तजन तुझी भक्ति करण्याला साशंक होतील, हा दोष तुझ्यावर येऊं नये म्हणून मी माझें शिरकमल तुझ्या चरणीं अर्पण करतों." असे निर्वाणीचे बोल बोलून त्याप्रमाणें कृति करण्यासाठीं त्यानें आपल्या कमरेची तरवार उपसली. आतां तो आपल्या मानेवर वार करणार तोंच—मालोजीच्या मानसमंदिरांत भगवतीदेवीच्या पाषाणमूर्तीनें डोळयांचें पातें लवतें व लवतें तोंच चैतन्यमय दैदीप्यमान असें दिव्य स्वरूप धारण केलें. त्या देवीमूर्तीचें अप्रतिम लावण्य, तिनें परिधान केलेलीं दिव्य शुभ्र वस्त्रें, सर्वांगावर बहुमोल रत्नालंकार धारण केलेले, कुंकुमाचा मंगल मळवट भाळीं चर्चिलेला, नासिकीं मनोमय दैदीप्यमान मुक्ताफळें विराजत असलेलीं, असें तें दर्शन घडतांच

मालोजीची शुद्धबुद्ध त्याच क्षणीं लोपली. त्यानें डोळे मिटून घेतले. त्याच्या हातांतील तरवार गळून खालीं पडली.

त्या देवीमूर्तीनें आपल्या निस्सीम भक्ताची ही विमनस्कता ध्यानीं घेऊन अनुकंपापूर्वक त्याच्यापाशीं जाऊन त्याच्या मस्तकावरून हात फिरवून कोमल आल्हाददायक शब्दांनीं त्याला हांक मारली, " मालोजी ! भिऊं नकोस. जिच्या ठायीं तुझी अनन्यसामान्य भक्ति आहे, जिच्या चरणीं तूं आपलें शिरकमल अर्पण करायला तयार झाला आहेस, तीच तुझी आराध्यदेवता देवी भगवती मी आहें. भिऊं नकोस; माझ्याकडे पाहा. "

मालोजीनें कांहींशा भानावर येऊन डोळे उघडले, तेव्हां भगवती देवी त्रिभुवनमंगल असें हास्य करीत प्रसन्न वदनानें आपल्याकडे पाहात उभी आहे असें त्याला दिसलें. त्यानें तात्काळ तिच्या चरणीं मस्तक नम्र करून हांक मारली. " आई !–"

मालोजीला आणखी कांहीं बोलायचें होतें; पण त्याच्या तोंडून शब्दच निघेना. त्याचा कंठ सद्गदित भावनांनीं दाटून आला. त्याच्या अंतःकरणांत आश्चर्य, आनंद व श्रद्धा ह्या तीन पुण्यसरिता जोरानें वाहूं लागून त्यांच्या एकत्रित संगमाचें आऊर उसळलें, व तें अंतःकरणांत सामावेनासें होऊन नेत्रांच्या वाटेनें त्या महापुरांतून आनंदाश्रूंच्या जलधारा वाहूं लागल्या. देवीच्या पायांवर त्यांच्या अश्रूंचा अभिषेक झाला.

देवीनें एखादी आई आपल्या तान्ह्या मुलाला वत्सलतेनें उचलून घेते, त्या प्रमाणेंच मालोजीचे हात आपल्या हातीं धरून त्याला वर उठविलें व आश्वासन दिलें, " मालोजी ! तुझी माझ्या ठायींची अढळ भक्ति पाहून मी प्रसन्न झाल्यें आहें. तूं मागशील तो वर तुला देऊन तुझे इच्छित मनोरथ पूर्ण करायला मी समर्थ आहें. सांग, तुला काय पाहिजे ? "

मालोजीनें आपल्या थोरवीला साजेसें थोर मागणें मागितलें, " आई ! माझ्या पराक्रमाला माझ्या मायदेशांत वाव मिळेल, माझ्या थोर वंशाला साजेसें देशकार्य माझ्या हातून होईल, माझ्या कुळाची इभ्रत टिकावी व वाढावी म्हणून मी सद्भावानें जे जे प्रयत्न करीन त्या त्या प्रयत्नांत मला यश येईल, माझ्या वंशांत गोब्राह्मणप्रतिपालन करणारा थोर अवतारी राजा निर्माण होईल, तो दुष्टांचें निर्दालन व सुष्टांचें संरक्षण करणारा असा परमप्रतापी चक्रवर्ती

नृपति होऊन माझ्या वंशाची कीर्ति दिगंतांत अजरामर करील असा वर मला दे."

"वत्सा! तूं मागितलास तो वर मीं तुला दिला. आज साऱ्या भरतखंडांत अधर्म माजला आहे. ज्या ज्या वेळीं पृथ्वीवर असा अनर्थपात होऊं लागतो, त्या त्या वेळीं साधुसज्जनांच्या परित्राणासाठीं व दुष्कृतांच्या निर्दालनासाठीं तसेंच सद्धर्मांची पुनः संस्थापना करण्यासाठीं परमेश्वराला अवतार घ्यावा लागतो. ती अवतार–वेळा आतां आली आहे तुला माझा असा वर आहे कीं, श्रीशंकर तुझ्या कुळीं अवतार घेऊन हें कार्य करील. तो अवतारी पुरुष शककर्ता होईल. तो धर्माची विस्कळित झालेली घडी पुन्हां नीट बसवून सर्व रयतेला सुखी करील. हें कार्य सुकर होण्यासाठीं तुझ्या पराक्रमाला संपत्तीची जोड पाहिजे; ती तुला तिथें मिळेल." देवस्थानाच्या डाव्या बाजूला एक वारुळ वाढलेलें होतें, तिकडे अंगुलीनिर्देश करून देवी म्हणाली. "त्या वारुळाच्या जागीं भूमि खोद, म्हणजे भूगर्भांत तुला अगणित संपत्ति लाभेल. ती संपदा व ही सत्ता–" देवीनें जवळच मालोजीच्या हातांतील तरवार तिथें गळून पडली होती ती उचलून मालोजीच्या हातीं देऊन सांगितलें, "हें खड्ग तुला सर्वत्र विजयी करील. हा माझा प्रसाद आहे. तो कदापि अन्यथा व्हावयाचा नाहीं."

एवढें बोलून देवी गुप्त झाली, व त्याबरोबरच मालोजी शुद्धीवर आला. त्यानें समोर पाहिलें तों ती त्याला शुभाशीर्वाद देणारी चैतन्यमूर्ति कोठें आहे! नेहमींप्रमाणें जगदंबेची पाषाणमूर्ति मात्र त्याला दिसली. पण आतां पूर्ण जागेपणीं त्याला वाटलें कीं, तें सारें स्वप्न होतें पण तो तरी देवीचा साक्षात्कार नसेल कशावरून? अशा आशापूर्ण भावनेनें त्यानें देवीनें जें वारूळ दाखविलें तें खरोखरच तिथें आहे किंवा नाहीं याचा शोध केला, तेव्हां तिथें वारूळ होतें. आतां त्या वारुळाच्या खालीं भूगर्भांत द्रव्यसंचय आहे किंवा नाहीं हें पाहायचें असें ठरवून तो तावडतोब आपल्या घरीं गेला. चार घरच्याच माणसांना बरोबर घेऊन मध्यरात्रीच्या सुमाराला हिलाल पाजळून तेथें आला.

वारूळ अर्धेंमुर्धें खणून होतें न होतें तों एक मोठा भुजंग फोंफावत जो वारुळांतून बाहेर पडला तो वारुळासभोंवार विळखा घालून वर फणा उभारून बसला. तें अजस्र जनावर पाहातांच सर्वांना भय वाटलें. मालोजीशिवाय

बाकीचीं माणसें ' साप ! साप ! ' करीत तिथून दूर पळालीं. पण मालोजी मात्र पळाला नाहीं. त्याला ऐकून माहीत होतें कीं, जिथें पुरातन काळाचें धन पुरलेलें असतें, तिथें सर्प रक्षक म्हणून वास करीत असतो. तो भलत्याच माणसाला ते धन घेऊं देत नाहीं. आणि इथें ज्या अर्थी हा भुजंग आहे, त्या अर्थी देवीनें सांगितल्याप्रमाणें या ठिकाणीं धन असलेंच पाहिजे व हा भुजंग त्या धनाचा रक्षक असला पाहिजे अशी मालोजीची खातरजमा झाली. आतां कसें करावें हा मालोजीला मोठा पेंच पडला. बरोबर आलेल्या माणसांनीं प्रथम त्याला सल्ला दिली कीं, धनाचा नाद सोडून निघून जावें. पण मालोजीला तें रुचेना. कारण, त्याला साक्षात्काराची प्रचीति पाहायची होती. बरें; प्रयत्न करायचाच तर त्या भुजंगाला ठार करावें असें मंडळी म्हणूं लागली. पण तसें करणेंही मालोजीला धोक्याचें वाटूं लागलें. कारण, असे रक्षक जे असतात, त्यांचा छळ केल्यानें ते आपला छळ करणाराला शापतात, त्या शापामुळें त्यांचा मग निर्वंश होतो व त्या धनाचे कोळसे होतात, असा त्याचा विश्वास होता.

अशा स्थितींत काय करावें याचा मालोजीनें थोडा वेळ विचार केला. लगेच त्याच्या मनांत एक कल्पना आली. तो त्या भुजंगाला हात जोडून म्हणाला, " प्रभुजी ! देवीनें कृपावंत होऊन इथलें धन मला दिलें आहे तें प्रमाण आहे. तरी आपण कृपा करून हें वारूळ सोडून जावें व मला धन घेऊं द्यावें."

मालोजीची प्रार्थना कळली म्हणून असो कीं सहज असो, तो भुजंग तात्काळ तेथून दूर झाडींत निघून गेला व दिसेनासा झाला. तो जातो न जातो तोंच त्या झाडींतून एक तरुण तेजस्वी तापसी मालोजीपाशीं आला. त्याला पाहातांच मालोजीला वाटलें, आतां जो भुजंग गेला, तोच तर ह्या वेषानें आला नसेल! तो तापसी पुढें येतांच मालोजीनें त्याच्या चरणांवर मस्तक नम्र केलें, व त्याची करुणा भाकली, " स्वामिन्! देवीची आज्ञा मला इथलें धन घेण्या-विषयीं झाली आहे. तें निर्विघ्नपणें माझ्या हातीं लागेल असा मला आपला आशीर्वाद असावा."

तापसी मालोजीच्या प्रार्थनेनें प्रसन्न होऊन म्हणाला, " मालोजी ! हें धन तुझेंच आहे व तें तुला देण्यासाठींच मी इथें आलों आहें. पण तें तुझ्या स्वाधीन करण्यापूर्वीं तुला तुझ्या पूर्वजांची, ह्या धनाची व तुझ्या पुढील

कर्तव्याची जाणीव देणें हें माझें कर्तव्य आहे. प्रभुआज्ञेनें तें कर्तव्य पार पाडायला मी इथें आलों आहें. तुझ्याच एका पुरातन पूर्वजानें सांठविलेलें हें धन आहे. तो परमप्रतापी व धर्मशील असा होता पण यावनी सत्तेपुढें त्याचें कांहीं न चालून त्याला अपरिमित छळ सोसावा लागला; तेव्हां तो आपलें राजवैभव सोडून स्वतंत्र हिंदु राज्य स्थापून यावनी अरिष्टापासून देवधर्माचें रक्षण करावें ह्या इच्छेनें गुप्तपणें हें धन घेऊन इथवर आला. पण यवनांनीं येथेंही त्याचा पाठलाग केला. तेव्हां त्यानें आपलें धन येथें गाडून ठेविलें, व ' जो कोणी आपल्या वंशांतील चरित्रवान पुरुष यावनी सत्तेचा नाश करून देवा धर्माचें रक्षण करण्याच्या प्रतिज्ञेनें पुढें येईल त्यानें हें धन घेऊन त्याचा आपल्या प्रतिज्ञापालनाकडे व्यय करावा. त्याला तें लाभेल. इतर कोणीं ह्या धनाचा अभिलाष धरल्यास त्याचा समूळ सत्यानाश होईल व धन त्याच्या हातीं न लागतां कोळसे त्याच्या हातीं लागतील ' असा दंडक घालून यवनाच्या हातून छळ सोसून प्राण सोडला. त्यानंतर आजवर अनेकांनीं हें धन मिळविण्याचा प्रयत्न केला; पण तो निष्फळ झाला. त्या पूर्वजाच्या वंशांत तूं चरित्रवान पुरुष निपजलास म्हणून तुला हें धन लाभेल. पण तत्पूर्वी तूं ह्या धनाच्या निमित्तानें तुझ्यावर पडणारी जबाबदारी ओळखली पाहिजेस."

मालोजी करद्वय जोडून विनम्र भावानें म्हणाला, " स्वामिन्! मी अजाण लेंकरूं ! देवीच्या कृपाप्रसादेंकरून येथें हें धन घ्यावयाला आलों. स्वामींनीं मला माझ्या कर्तव्याची जाणीव करून दिल्यास मी ती आमरण यथामति पार पाडीन."

"ऐक, विधिसंकेत असा आहे कीं, तुझ्या वंशीं शककर्ता धर्मसंस्थापक महान् प्रतापी पुरुष अवतार घेईल व तो सध्यां सर्वत्र धर्मोच्छेद करणाऱ्या यावनी सत्तेला संपुष्टांत आणून स्वतंत्र हिंदुराज्याची संस्थापना करील. त्या अवतारी पुरुषाचें अवतारकार्य सुलभ व्हावें असे प्रयत्न सर्व हिंदूंनीं आजपासून केले पाहिजेत; त्या महापुरुषाच्या अवतारकार्याची भूमिका तयार करण्याच्या उद्योगाला आजपासून लागलें पाहिजे. तुझ्या वंशीं हा अवतार होणार, म्हणून तूं त्याच्या भावी साफल्यासाठीं आजपासून मनोभावानें झटलें पाहिजे. आज तूं यवनांचा ताबेदार आहेस. ही ताबेदारी तुला आजच्या आज झुगारून देतां यायची नाहीं हें खरें. पण ह्या पारतंत्र्याच्या शृंखला

आज ना उद्यां तूं नाहीं तुझ्या वंशजांनीं तोडल्याच पाहिजेत; व त्या तोडण्याचा प्रयत्न तूं यवनशत्रूंच्या गोटांत राहून केला पाहिजेस. ह्या धनाच्या साह्यानें तूं पराक्रमी हो, यवनांच्या दरबारीं आपलें महत्त्व वाढीव, त्या महत्त्वाच्या जोरावर महाराष्ट्रांतील इतर मातबर मराठा सरदारांना आपल्या काबूंत आण व सर्वांना संतोष होईल असें कर. देव-देवालयांचे जीर्णोद्धार करून आपल्या वंशाविषयीं महाराष्ट्र जनतेच्या मनांत प्रेमभाव उत्पन्न करून स्वातंत्र्यासाठीं त्यांच्या अंतःकरणाला एकसारखी तळमळ लागून राहील असें कर. महाराष्ट्रांत स्वातंत्र्याचा सूर्य तुझ्या वंशांत उगवणार असा विधिसंकेत तर आहेच. पण त्या विधिसंकेतांची सांगता होण्यासाठीं पारतंत्र्यांत गांजत पडलेल्या जीवांनीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त ही केलीच पाहिजे. याप्रमाणें वागण्याची शपथ घे व मग हें धन मिळविण्याच्या उद्योगाला लाग."

मालोजीला त्या तापसी पुरुषाची ही भविष्यवाणी ऐकून किती संतोष वाटला! लगेच मालोजीनें त्या साधु पुरुषाच्या चरणांना वदन करून तशी शपथ घेतली.

"आतां आपण हें धन उकरून काढूं." म्हणून त्या साधूनें वारुळावर पहिली कुदळ हाणून सुमुहूर्त करून दिला, व "आता तूं निर्धास्तपणें येथें खणून धन घे. तुला उपद्रव कदापि व्हावयाचा नाहीं" असें आश्वासन देऊन तो ज्या झाडींतून आला होता त्या झाडींत पुन्हा जाऊन दिसेनासा झाला.

नंतर मालोजीनें त्याचीं माणसें दूर पळालीं होतीं त्यांना बोलावून आणलें. ती प्रथम वारूळ खणायला तयार होईनात. पण मालोजीनें जेव्हां साधु पुरुषानें संबोधिलेला वृत्तांत निवेदन केला, तेव्हां त्याना धीर आला. लगेच त्या सर्वांनीं मिळून तें वारूळ खणून त्या खालची बरीच जमीन उकरली, तेव्हां त्यांना तेथें मोहरांनीं भरलेले सात हंडे सांपडले. मालोजीनें प्रथम त्या धनाला साष्टांग प्राणिपात करून मग तें बाहेर काढून घेतलें, व ही बातमी दुसऱ्या कोणाला कळूं नये असा बंदोबस्त करून तो घरीं आला. घरीं येतांना त्याच्या डोक्यांत प्रथम विचार आला तो असा, "आतां तरी जाधवराव माझी दौलत बरोबरीची मानतील कीं नाहीं?"

प्रकरण तिसरें

# व्याही कीं वैरी ?

जाधवरावांनीं रंगपंचमीच्या दिवशीं मालोजीला आपणाहून हीन लेखून त्याच्याशीं सोयरीक करण्याचा इन्कार केला, तेव्हां हा मालोजी एवढा पराक्रमी व भाग्यवान असेल, तो पुढें नांवालौकिकाला येऊन आपणालाही लाजवील, असें कुणी सांगितलें असतें तर त्यांनीं त्याला मूर्खांत काढलें असतें. पण पुढें जसजसें दिवसांमागून दिवस जाऊं लागले तसतसें त्यांना मालोजीच्या अंगचें खरें थोरपण कळूं लागलें. मालोजीला देवीच्या कृपा-प्रसादानें अपरंपार द्रव्यसंचय मिळाला, मग त्याच्या भाग्योदयाला काय उशीर ! त्यानें त्या धनप्राप्तीचा कोणालाही पत्ता लागूं न देतां त्याचा सद्व्यय करून देवीच्या व त्या साधुपुरुषाच्या आदेशानुसार धर्मकृत्येंही अनेक केलीं व पदरच्या खर्चानें पगारी शिलेदार-बारगीर नोकरीला ठेवून मोठी मान-मान्यताही संपादन केली. अवघ्या चार पांच वर्षांच्या अवधींत मालोजीचें प्रस्थ सर्वत्र इतकें वाढलें कीं, विचारायला नको. दानधर्म कोणी करावा तर मालोजीरावांनीं ! पराक्रम कोणी करावे तर मालोजीरावांनीं ! ज्याच्या त्याच्या तोंडीं मालोजी राजे–मालोजी नव्हे. मालोजी राजे धन्यता पावूं लागले, व जो तो म्हणूं लागला कीं, मालोजीराजे आतां जाधवरावांच्या तोडीचे मनसबदार शोभूं लागले. जाधवरावांनाही वाटूं लागलें कीं, मालोजी आतां बहुतेक आपल्या तोडीचा झाला, मालोजीला 'राजे' हा किताब बादशहाकडून अजून मिळाला नव्हता; पण त्याची थोरवी पाहून जनताच त्याला आतां स्वखुषीनें ' राजे ' म्हणूनच ओळखूं लागली होती.

वस्तुतः जाधवराव हे तेव्हांचे अहमदनगरच्या निजामशाहींतील वाजते गाजते प्रमुख सरदार. त्यांनीं आपल्या पराक्रमाच्या जोरावर बादशहाकडून दहा हजार स्वारांची सरदारी व तिच्या निर्वाहासाठीं मोठी जहागीरही मिळविली होती. त्यावेळीं मालोजी हा दौलताबादेजवळ वेरूळ येथें पाटील होता. हा पाटील मोठा उमदा, तरुण व कर्तबगार आहे असें पाहून बादशहापाशीं शिफारस करून त्यांनीं त्याला आपल्या पदरीं मागून घेतलें. बादशहा-

करून त्याला थोड्या स्वारांची सरदारकीही मिळवून दिली. मालोजीच्या कर्तबगारीला मार्ग मूळ जाधवरावांनी करून दिला खरा; पण मालोजीच्या अंगीं कर्तबगारी होती म्हणून त्यानें त्या संधीचा आपल्या उन्नतीच्या कामीं शक्य तितका उपयोग करून घेतला. जाधवरावांनीं त्याचा सोयरिकीच्या प्रश्नावरून अपमान केला; तिथेंच त्यांच्या सेव्य-सेवक-संबंधाचा शेवट झाला. पण त्यामुळें मालोजीचा भाग्योदय न थांबतां उलट त्याला चढती कळा लागली. तो स्वतंत्र झाल्यापासून त्याला निजामशाहीची विशेष सेवा करतां आली. निजामशाहीच्या राजकारणांत त्यानें हळुहळु आपला शिरकाव करून घेऊन तिथें आपला जम चांगलाच बसविला, व अवघ्या चार पांच वर्षांच्या अवधींत सर्वत्र एवढा दरारा उत्पन्न केला कीं, मालोजी हें एक बडें प्रस्थ आहे असें खुद्द निजामशहालाही वाटूं लागलें. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, ह्या सर्व गोष्टी मालोजीनें जाधवरावांची कुरापत न काढतां किंवा त्यांच्या वाटेला न जातां केल्या.

जाधवराव जरी सोयरिकीच्या प्रश्नावरून मालोजीशीं बिथरले होते, तरी त्यांनाही मालोजीच्या ह्या भाग्योदयाबद्दल हेवा दावा कधींही वाटला नाहीं. उलट आपण जो वृक्ष लावला, तो इतका फोंफावला व पुष्पफलसमृद्ध झाला यांत त्यांना अभिमान वाटत होता. ते नेहमींप्रमाणें इतर सरदारांबरोबर मालोजीलाही सालोसाल सणावारीं बोलावीत; पण मालोजी कधीं गेला तर नाहींच. पुढें पुढें तर मालोजी एवढें बडें प्रस्थ झाल्यापासून जाधवराव व त्यांची स्त्री म्हाळसाबाई यांना असेंही वाटूं लागलें कीं, मालोजीशीं सोयरिक करण्यांत कमीपणा नाहीं. कमीपणा असेल तर तो एकच होता; मालोजी हा निजामशहाकडून जाधवरावांच्या तोडीचा मनसबदार झाला नव्हता. पण म्हाळसाबाईच्या विचारें जाधवरावांनीं शहापाशीं आपलें वजन खर्च करून मालोजीला तेवढा मान मिळवून देण्याचेंही ठरविलें होतें. आतां आडकाठी असेल तर ती एवढीच होती कीं, आपण एकदां ज्या अर्थी सोयरीक नाकारली आहे, त्याअर्थी पुन्हां मालोजीपाशीं ‘ आमची मुलगी तुमच्या मुलाला करून घ्या ’ असें तोंड कसें वेंगाडावें ! तेवढा आपला कमीपणा होऊं नये म्हणूनच शहाकडे मालोजीची तरफदारी करून त्याला मनसबदारी मिळवून द्यायची. त्या उपकारांनीं मालोजी आपला ऋणी झाला

व आपणाशीं सलोख्यानें वागूं लागला म्हणजे मानपमानाचा प्रश्नच मिटला, असा जाधवरावांचा मानस होता.

पण तेवढें श्रेय घेण्याचें जाधवरावांच्या कपाळीं नव्हतें. त्यामुळें त्यांच्या विचारांतील गोष्ट कृतींत उतण्यापूर्वींच मालोजीनें निजामशहाला वश करून घेऊन त्याच्यापाशीं संधान बांधलें व त्याच्यापाशीं तक्रार केली, " आमची कर्तबगारी खाविंदांच्या नजरेला आलीच आहे. अशीच गादीची अखंड सेवा करून गादीचें वैभव वर्धित करावें अशी आमची उत्कट इच्छा आहे. पण आम्ही जशी गादीच्या इभ्रतीची काळजी वाहतो तशीच आमच्या इभ्रतीची काळजी खाविंदांनीं वाहिली पाहिजे. तशी काळजी जर खाविंद बाळगणार नाहींत तर आम्हांला याउपरी खाविंदांचे चरण सोडून जेथें आमची बेनिगा होणार नाहीं तेथें जावें लागेल."

निजामशहाला मालोजीची ही तक्रार नजरेआड करतां येण्याजोगी नव्हती. कारण आधींच विजापूरकर व दिल्लीपती यांच्याशीं झगडतां झगडतां निजामशाहीची परिस्थिति बरीच अडचणीची झाली होती; अशा वेळीं मालोजीसारखा पराक्रमी पुरुष नाराज होऊन गेला तर आपलें मोठेंच नुकसान होणार, असें पाहून शहानें मालोजीला विचारलें, " मालोजीराव ! तुम्ही इतके नाराज कां झालां तें सांगा म्हणजे आम्ही तुमच्या नाराजीचें कारण दूर करतों."

शहा आपल्यावर खुश आहे असें पाहून मालोजीला बोलायला जास्त धीर आला. व तो म्हणाला, " खाविंद ! चार वर्षांपूर्वी जाधवरावांनीं भर दरबारांत आपली कन्या आमच्या मुलाला देऊं केली व रीतसर बोलणें झालें. असें असतां मागाहून वचनाला फिरले. आतां त्यांनीं सोयरीक आमच्याशीं न करतां दुसऱ्याशीं केली तर त्यांत आम्हांला नामुश्की आहे."

" असें आहे काय ? ठीक आहे. आम्ही जाधवरावांची समजूत घालतों." असें म्हणून शहानें तिथल्यातिथें जाधवरावांना बोलावून आणविलें व त्यांना विचारलें, " जाधवराव ! मालोजीरावांशीं सोयरीक करण्याचें कबूल करून मागाहून वचनाला फिरलां याचें कारण काय ?

मालोजी समोर उभाच होता. त्याच्या देखत जाधवरावांना खोटें बोलतां येण्यासारखें नव्हतें. वस्तुतः त्यांचेंही मत आतां पालटलें होतें. पण समोर मालोजी उभा असतां आपण माघार घ्यावी कशी ह्या अभिमानाला बळी

पडून ते उत्तरले, " खाविंद ! मालोजीराव मानमरातबाच्या व दौलतीच्या दृष्टीनें आमच्या तोडीचे नाहींत. आम्ही त्यांना अन्नाला लावलें, आमचे आश्रित ते. आश्रिताकडे कन्या कशी द्यावी ? त्यामुळें आमच्या तोडीचा एखादा मुलगा पाहून आम्ही सोयरीक करण्याचें ठरविलें आहे. एरव्हीं ते आम्ही स्नेहसंबंधी आहोंच."

मालोजीच्या मस्तकावर पुन्हा वज्राघात झाला. आपण स्वपराक्रमावर इतके नांवारूपाला आलों तरी अजून जाधवराव आपणांला मनसबदारीच्या अभावीं हिणवतात म्हणजे काय ? ज्या अर्थी त्यांच्या अंगीं अजून इतका पीळ आहे, त्या अर्थी वेळ पडली तर उघड्या समरांगणावर देखील त्यांच्याशीं दोन हात करावयाचे पण त्यांचा मद उतरवून त्यांना आपणांशीं सोयरीक करण्याला भाग पाडावयाचें; असेंही मालोजीच्या मनांत आलें. पण बादशहानें ज्या अर्थी मध्यस्थी पत्करली आहे, त्या अर्थी त्याच्या मध्यस्थीचा निकाल लागेतों आपण स्वस्थ राहिलें पाहिजे असा विवेक करून तो तेव्हां कांहीं बोलला नाहीं.

शहानें जाधवरावांचें म्हणणें ऐकून घेतलें. त्याची अपेक्षा होती कीं, आपण मध्यस्थी पत्करली हें पाहतांच जाधवराव अठरा बयादी लावण्याचें सोडून ताबडतोब मालोजीशीं सोयरीक करण्याला तयार होतील. पण त्याप्रमाणें घडून न आल्यानें शहाला राग आला. एकदां त्याच्या मनांत आलें, तुम्ही मालोजीशीं सोयरीक केलीच पाहिजे असें सत्तेनें जाधवरावांना सांगितल्यास नाकारण्याची त्यांची काय बिशाद आहे ! पण पुन्हा त्यानें विचार केला, इतकी सत्ता आपण जाधवरावांवर गाजवूं लागलों तर ते वेळीं बिथरायचे व निजामशाही एका बलाढ्य सरदाराला मुकायची. बरें; मध्यस्थी करूं नये तर मालोजी हातचा सुटतो. अशा स्थितींत काय करावें हा पादशहाला मोठा पेंच पडला. अखेर जाधवरावांचें मनही दुखवायचें नाहीं व मालोजीचें मनही दुखवायचें नाहीं, अशी एक तोड त्याला सुचली. तो जाधवरावांना म्हणाला, " जाधवराव ! मालोजी आपल्या योग्यतेचे मनसबदार नाहींत एवढेंच तुमचें म्हणणें असेल, तर त्याचें निराकरण आम्हीं करतों. मालोजींनीं आजवर आमच्या पादशहातीची मनोभावानें सेवा करून चांगलाच नांवलौकिक मिळविला आहे. आमच्या राज्याच्या आबादानीसाठीं तुमच्या दोघांही घराण्यांची एकी होणें ही गोष्ट आम्हांला अत्यंत इष्ट वाटते. पण या संबंधांत

तुमचा किंवा मालोजींचा कमीपणा व्हावा अशी आमची इच्छा नाहीं. यास्तव आम्हीं आजपासून मालोजींना तुमच्या बरोबरीचे पंचहजारी मनसबदार केलें आहे व त्यांना तुमच्या तोडीचा ' राजे ' हा किताब दिला आहे. तसेंच त्यांना साहेब–नौबत व मनसबदारीच्या खर्चासाठीं शिवनेरी व चाकण हे किल्ले आणि त्यांच्या आसपासचा मुलुख यांची जहागीर तोडून दिली आहे. आतां तरी मालोजीराजांशीं सोयरीक करण्याला तुमची कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं ना ? "

जी गोष्ट जाधवराव इच्छीत होते तीच शहानें केली. शिवाय सोयरीक न करण्याचें एवढेंच कारण ते शहापाशीं बोलले होते. अर्थात् आतां सोयरिकीला नकार देण्याला जाधवरावांना तोंडच उरलें नाहीं. त्यांनीं तेव्हांच होकार दिला.

झालें, लगेच शहाच्या समक्ष जिजा व शहाजी यांचें लग्न ठरलें. आपला विजय झाला म्हणून मालोजीराजांना परमानंद झाला. जाधवरावांविषयीं त्यांच्या मनांत जी आढी बसली होती ती आतां दूर झाली. ते शहाच्या समक्ष जाधवरावांना कडकडून मिठी मारून भेटले व म्हणाले, "जाधवराव! आमचा शब्द श्रीजगदंबेच्या कृपाप्रसादानें व खाविंदांच्या मेहेरबानगीनें खरा झाला, व आपली महत्त्वाकांक्षाही पूर्ण झाली. आतां आजवर झाल्या गेल्या गोष्टी कोणीं मनांत ठेवावयाच्या नाहींत "

यावर ' ठीक आहे ' एवढेंच जाधवराव बोलले. ते अर्थातच मनमोकळेपणानें बोलले नाहींत. मालोजीराजांना याचें कारण कांहीं कळेना. पण त्या वेळीं त्यांनीं त्याविषयीं जास्त चिकित्सा केली नाहीं. असलाच जाधवरावांच्या मनांत राग तर मागाहून लग्नसमारंभाच्या वेळीं त्यांची समजूत करतां येईल अशा विचारानें ते स्वस्थ राहिले.

जिजा व शहाजी यांचें लग्न दौलताबादेंतच मोठ्या थाटामाटानें पार पडलें. खुद्द शहानें लग्न समारंभाला हजर राहून वधूवरांना बहुमोल वस्त्रालंकाराचा आहेर केला व त्यांना आपल्या मांडीवर बसवून घेऊन आपल्या हातानें त्यांच्या तोंडांत साखर घातली. पांच वर्षांपूर्वीं जाधवरावांच्या वाड्यांत रंगपंचमीच्या दरबारांत ज्या लोकांसमोर जाधवरावांनीं सहज थट्टेनें ' जिजा व शहाजी हा जोडा फार छान दिसतो नाहीं ? ' असे उद्गार काढले होते, व ज्यांनीं ' होय, छान दिसतो.' अशी त्यांना संमति दर्शविली होती आणि

मागाहून जाधवराव सोयरिकीला नाराज आहेत व मालोजी तर ही सोयरीक करणारच असा हट्ट धरून बसला आहे असें पाहून जे मालोजीची आपसांत टर करीत होते, ते सारे लोक आज त्याच जिजा–शहाजीच्या लग्नसमारंभाला हजर होते. त्यांचें काय ! वारा वाहील तशी पाठ फिरवायची. मालोजीचा पडता काळ होता तेव्हां ' हे लहान तोंडीं मोठा घांस घेऊं पाहातात ' असें म्हणून मालोजीची टर करायलाही त्यांची तयारी, व आज मालोजी ' राजे ' व बडे मनसबदार झाले, त्यांनीं बोललेला शब्द खरा केला, म्हणून त्यांची वाहवा करण्यालाही तयारी ! जाधवरावांची स्त्री म्हाळसाबाई हिचीही तशीच अवस्था. आपणाला आपल्या तोडीचा नव्हे; आपणाहून सरस जांवई मिळाला तेव्हां ह्या जांवयाला कुठें ठेवूं व कुठें न ठेवूं असें तिला होऊन गेलें. चार वर्षांपूर्वीं मालोजीच्या स्त्रीकडे-दीपाबाईकडे ' ही माझ्या आश्रिताची बायको ' म्हणून तुच्छतेनें पाहाणारी म्हाळसाबाई आज त्याच दीपाबाईला ' माझ्या जिजाला पदरीं घ्या. यापुढें तुम्हीच तिची आई ' असें म्हणून पदर पसरण्यांत व ती वरमाय म्हणून तिचे पाय धुण्यांत धन्यता मानूं लागली. लग्नसमारंभांत मालोजी राजे व जाधवराव हे व्याहीव्याही एका लोडाशीं बरोबरीच्या नात्यानें बसलेले पाहून तिच्या डोळयांचें पारणें फिटलें. असा सर्वत्र आनंदीआनंद झाला. वधूवरांची वरात शृंगारलेल्या हत्तीवरून मोठे बादशाही थाटानें मिरवली. यथाकाळीं गृहप्रवेश झाला.

एवढा टोलेजंग लग्नसमारंभ झाला, तरी जाधवराव कांहींच बोलले नाहींत. ते हंसलेही नाहींत किंवा रुसलेही नाहींत. पण तिसऱ्या दिवशीं वरपक्षाकडील भोजन समारंभासाठीं मालोजीराजे जेव्हां जाधवरावांना आमंत्रण देण्यासाठीं आले, तेव्हां जाधवरावांनीं आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. त्यांनीं मालोजीराजांना संतापाच्या भरांत स्पष्ट सांगितलें, " मालोजीराजे ! तुमच्या घरीं आम्हांला अन्नग्रहण करणें नाहीं. आज तुम्ही आम्ही व्याही-व्याही झालों तेच वैरी-वैरी झालों. आजवर आपला बेबनाव होता; पण वैर नव्हतें, तें आज तुम्हीं संपादन केलें. तुमच्या घरीं आम्हांला अन्नग्रहण करणें नाहीं. "

मालोजीराजांना जाधवरावांचे हे बेबनावाचे अनपेक्षित बोल ऐकून अचंबा वाटला. ते म्हणाले, " जाधवराव ! अशा मंगल प्रसंगीं असें अभद्र कां बोलतां ? आपणाला इतकें रागवायला काय झालें ? मीं आपलें कोणतें वैर

साधलें ! अजूनही मी आपल्याशीं सोयरीक करायला योग्य असा तोलाचा असामी झालों नाहीं असा आपला समज आहे काय ?"

"तसें मी म्हणत नाहीं. इतकेंच काय; पण मीं आजवर ज्या ज्या गोष्टी केल्या त्या त्या तुमच्या कल्याणाच्याच केल्या. तुमचें अनिष्ट मीं कधींच चिंतिलें नाहीं, उलट तुमच्या पराक्रमाचें, धडाडीचें व स्वतंत्र बाण्याचें कौतुकच केलें. आणि तुम्ही थोड्या धीरानें वागलां असतां तर आम्ही आपण होऊन शहापाशीं आमचें वजन खर्च करून तुम्हांला आमच्या तोडीची मनसबदारी देवविली असती व मग आनंदानें तुमच्याशीं सोयरीक केली असती. पण तुम्ही आमच्याविरुद्ध शहापाशीं चुगल्या करून त्यांच्या आज्ञेसमोर आम्हांला नमायला लावलें व शहाची थुंकी झेलून मनसबदारी मिळविली; ह्या अनुचित कृतीनें तुमच्या आजवरच्या साऱ्या पराक्रमावर व स्वतंत्र बाण्यावर पाणी पडलें. तुमचें आमचें पटलें नाहीं असें घटकाभर धरून चाललें तरी आम्ही उभयतांही अस्सल मराठे पडलों. आम्ही एकमेकांचा मानभंग करायच्या दुष्ट हेतूनें परधर्मी शहाला बाबा मानायला तयार झालों तर त्यांत आमचा मराठेपणा तो काय कायम राहिला ? आमच्यासमोर—आपल्या अन्नदात्यासमोर-नमतें घ्यायला तेवढी तुम्हांला नामुश्की वाटली व शहाची थुंकी झेलण्यांत मात्र भूषण वाटलें ! आमच्यासमोर तुम्ही आमच्याशीं सोयरीक करण्याची सरळ इच्छा दर्शविली असती तर ती आम्ही संतोषानें मान्य केली असती किंवा आमच्यावर मातच करायची होती तर उघड उघड समरांगणावर करायची होती व आम्हांला पराभूत करून आम्हांला लाजवून, पाहिजे तर आमची दौलत जिंकून मग आमची मुलगी मागायची होती. त्या पराजयांतही आम्ही आनंद मानला असता. त्यांत आम्ही मेलों असतों तरी कांही चिंता नव्हती. पण तुम्ही आपलें नाक कापून आम्हांला अपशकून केला. हा अपमान आम्ही मरेतों विसरणार नाहीं."

मालोजीराजांना अर्थातच जाधवरावांचें हें बोलणें रुचलें नाहीं. कारण त्यांना जाधवरावांची आजवरची कारकीर्द चांगली माहीत होती. जाधवराव हे निजामशाहींतील मोठे मातबर सरदार होते खरे, पण त्यांची पराक्रमी म्हणून जितकी ख्याति होती त्याहून ते निजामशाहीचे निःस्सीम राजनिष्ठ सेवक म्हणून जास्त ख्याति होती. त्या सर्व गोष्टी आठवून मालोजी राजे

त्यांना म्हणाले, " जाधवराव ! शाहासमोर मान नमविण्यांत आपणाला नामोशी वाटते हें आजच आम्हांला नव्यानें कळलें. कारण आजवरचा आपला सारा जन्म ' जी हुजूर ' वृत्तीला साजेसाच गेला. तसली ' जी जी ' मालोजीरावांनीं कधीं केलीही नाहीं व पुढें करणारही नाहींत. शहानें आम्हांला मनसबदारी दिली ती मेहेरबानीनें दिली नसून आम्ही आमच्या पराक्रमावर ती त्याला द्यायला भाग पाडली. नुसतें हांजी हांजी करून आम्हांला वैभव मिळवायचें असतें तर आम्हीं तें यापूर्वींच प्राप्त करून घेतलें असतें. जाधवांनीं तरी भोंसल्यांना खऱ्या मराठेगिरीच्या गोष्टी सांगायला नकोत. पण तो वाद आतां खेळत बसण्यांत अर्थ नाहीं. कारण आतां आपण सोयरे झालों. जाधव व भोंसले यांच्या दोन थोर घराण्यांचा हा जो संबंध यदृच्छेनें जुळून आला आहे, तो फार मंगल मुहुर्तावर घडून आला आहे. जाधवराव ! आतां तुम्ही आम्ही एक झालों तेव्हां एक अत्यानंदाची वार्ता तुम्हांला सांगायला हरकत नाहीं. आई जगदंबेचा आम्हांला असा आशीर्वाद मिळाला आहे कीं, आमचा पौत्र जो होईल तो श्रीसांबाचा अवतार परमपराक्रमी चक्रवर्ती नृपेश्वर असा होईल. ही गोष्ट जितकी आम्हांला भूषणावह आहे तितकीच तुम्हांलाही भूषणावह आहे. कारण त्यांत आपल्या उभयतांच्याही थोर कुलांचा परम गौरव होणार आहे. आमची जिजी राजमाता झालेली पाहून जाधवराव ! तुम्हांला धन्यता वाटणार नाहीं काय ? "

" असलीं थोतांडें मालोजी राजे ! माझ्यासमोर चालायचीं नाहींत. असल्या लंब्या लंब्या थापा मारून आमची सहानुभूति तुम्हांला संपादन करायची आहे हें मी जाणतों—"

" हां ! जाधवराव ! त्या सहानुभूतीच्या गोष्टी मात्र बोलूं नका. आम्ही आपल्याशीं सलोख्याच्या गोष्टी बोलतों याचा अर्थ आपल्यासमोर सहानुभूतीसाठीं पदर पसरतों असा कराल तर फसाल. आम्ही सलोखा करण्याची इच्छा करतों यांतही तुम्ही आम्ही व्याही व एकमेकांचे हितकर्ते म्हणूनच बोलतों. सहानुभूति कसली घेऊन बसलां ? आणि माझ्या वंशांत माझ्या सुनेच्या पोटीं शककर्ता जन्माला येणार ही शुभवार्ता आम्हीं आपणांला सांगितली यांत आपणांला थोतांड कसलें वाटलें ? आम्हांला माहीत आहे,

आमच्या वंशांत शककर्ता अवतार घेणार म्हणून आपणांला वैषम्य वाटतें. पण ज्या गोष्टी व्हायच्या त्या व्हायच्याच. टळायच्या नाहींत."

" मालोजी राजे! ह्या हुलकावण्या कोणाला दाखवितां? आम्हांला ह्या जाधवरावांना ? भगवान् श्रीकृष्णाच्या पराक्रमी यादववंशासमोर तरी तुम्ही असली वाचाळता करूं नका. असल्या थापांवर विसंबून आम्ही आमचा अपमान विसरूं असें कां तुम्हांला वाटतें ? तुम्ही म्हणतां तसा अवतारी पुरुष जर अवतरला तर ह्या यादवांच्या—जाधवरावांच्या वंशांतच जन्मेल व तुम्हां भोंसल्यांना आपल्यासमोर माथा नमवायला लावील."

" जाधवराव ! आपण जर वंशाच्या थोरवीची गोष्ट बोलाल तर त्याही बाजूनें आपले दांत आपल्या घशांत जातील. आपणांला आम्हीं सामोपचारांनीं सांगितलें व तेंही आमच्या पदरचें सांगितलें नाहीं; भगवती देवीनें वर्तविलेलें भाकित सांगितलें कीं, आमच्या वंशांत शककर्ता जन्माला आला तरी त्याचें परममंगल मातृपद आपल्याच कन्येला लाभणार आहे."

" आमची कन्या ! आमची कन्या आम्हीं तुमच्या घरीं दिली तेव्हांच मेली असें समजतों. ती आतां जाधवरावांची जिजा राहिली नाहीं; भोंसल्यांची झाली. म्हणूनच आम्हीं म्हणतों आमची जिजा मेली व जिजाबाई भोंसलीण—आमची वैरीण जन्माला आली ! कुठें जाधव व कुठें भोंसले ! मोराचीं पिसें शेंपूटाला चिकटवून कावळ्याला मोर थोडेंच होतां येतें ! "

" कुठें जाधव व कुठें भोंसले ! जाधवराव ! आपण आपल्या यादववंशाचा अभिमान धरतां हें ठीक आहे. पण त्यावरून आपण भोंसल्यांना कमी लेखूं पाहाल तर याद राखा, केव्हांही भोंसलेच जाधवाहून थोर व प्राचीन आहेत. जाधव श्रीकृष्णाचे वंशज असले तर भोंसले श्रीरामाचे वंशज आहेत. वडीलपणाचा मान भोंसल्यांचा आहे. म्हणूनच शककर्ता अवतार घेईल तो भोंसल्यांच्या वंशांत घेईल. आपली पूर्वपुण्याई थोर म्हणून आपली कन्या भोंसल्यांच्या घरांत पडली. पण आपण म्हणतां कीं ती मेली ! हा आपण भावी भूपतीचा व त्याच्या मातेचा अपमान करीत आहां. ह्या अपमानाची फेड तुम्हांला भोंसल्यांच्या वंशासमोर मान वांकवून करावी लागेल."

" बस्स ! पुरे करा, मालोजीराजे ! तुमच्या ह्या वल्गना पुरे करा. उथळ पाण्याला खळखळ फार असते, कोरड्या मेघांनाच फार कडकडाट करावासा वाटतो. त्या पुढच्या गोष्टी आज बोलून काय करायच्या आहेत ! तुम्ही आम्हांला बोलावण्यासाठीं आलां त्याचा जबाब आम्ही तुम्हांला सांगितला; पुरें झालें."

" ठीक आहे ! जाधवराव ! पाणी उथळ कोणतें व खोल कोणतें, कोरडे मेघ कोणते व जलमेघ कोणते, याचा निर्णय आपल्या व आमच्या पुढच्या तीन पिढ्यांत आपोआप होईल. जो कोणी जगेल वांचेल तो पाहील." असे निर्वाणीचे बोल बोलून मालोजीराजे संतापानें हातपाय आपटीत तेथून निघून गेले.

जाधवराव भोजनसमारंभाला न आल्यामुळें समारंभाचा विरस झाला खरा; पण त्याला कांहीं इलाज नव्हता.

एकूण काय ! जाधव व भोंसले व्याही व्याही झाले पण वैरी वैरी झाले."

प्रकरण चौथें

## शिवावताराचा पूर्वरंग

" गोमती ! अग गोमती ! "

" ओ राणीसाहेब ! आल्यें,—आल्यें. "

गोमतीच्या उत्तराचा प्रतिध्वनि पुरतेपणीं शांत झाला नाहीं, तोंच गोमती जिजाबाईच्या हांकेला त्यांच्या महालांत येऊन हजर झाली.

" काय आज्ञा आहे राणीसाहेब ? "

" अग ! तुला स्वप्नांचा अर्थ कळतो का ? "

" कळतो थोडासा. कां ? आज आपणाला एखादें स्वप्नबिप्न पडलें कीं काय ? "

" हो ! पण तुला कळतें का ? "

" सांगा तर खरें ? मला कळलें नाहीं तर आपल्या राजोपाध्यांना विचारून येऊन आपणांला सांगेन. सांगा तर खरें ! "

" अग ! मी बाई, आज फार चमत्कारिक स्वप्न पाहिलें. मी आपली जागी झाल्यें तों माझ्या संभाजीला जवळ घेऊन पलंगावर झोंपल्या झोंपल्या बोलत होत्यें. तों एकदम संभाजी मागें पाहून ओरडला, आई ! साप ! "

" काय, साप ? "

" हो ! लगेच मी मागें वळून पाहात्यें तर साप खराच ! आणि तो देखील कांहीं लहानसान नाहीं ! केवढें ग बाई तें धूड ! त्यानें आपली आपल्या सुपलीएवढ्या फणेची माझ्या मस्तकावर छाया धरली होती. मी तें पाहून काय भ्याल्यें पण ! आधीं संभाजीला घेऊन पलंगाच्या खालीं उतरल्यें. आतां काय करायचें, असा मला पेंच पडला. स्वारी पलंगावरच झोंपलेली होती. तिकडे हांक मारावी तर स्वारी दचकून जागी व्हायची आणि उठतां उठतां त्यांच्या डोकीला फणा लागायची. मग मेला चावा घेईल कीं काय कोण जाणे ! अशी भ्याल्यें मी. ओरडाओरड करावी तर तीही पंचाईत ! महालाबाहेर येऊन कोणा नोकर-चाकरांना हांक मारून बोलवावें, तर दृष्टीआड काय अनर्थ होईल नि काय नाहीं; नेम काय सांगावा ! "

" खरेंच राणीसाहेब ! मग आपण काय केलेंत ? "

" अग ! मीं किनी, मनाचा घडा कीं केला आतां ह्या वैऱ्याला आपणच मारल्याशिवाय गत्यंतर नाहीं— "

" हो ! कारण एरव्हीं हांक मारायची सोय नाहीं, बाहेर यायची सोय नाहीं, तो मेला काय करता कोण जाणे ! आपण त्याला मारलें तेंच चांगलें झालें.— "

" अग पण—— "

" काय ? तो मेला नाहीं ? मग पळाला कीं काय ? "

" पण माझें ऐकून तरी घेशील कीं नाहीं ? गोमती, ज्या त्या गोष्टींत तुझा घमघुसळेपणाच फार ! "

जिजाबाईनें अशी संभावना केलेली ऐकतांच गोमती तात्पुरती जरा वरमली. तिची टकळी बंद झाली. शिष्टाचार म्हणून तिनें एवढेंच विचारलें, " बरें; पुढें काय झालें ? "

" मीं किनी, उशाखालीं स्वारीची तरवार होती ती हळूच हलकेच स्वारीला जागे देखील होऊं न देतां काढून घेतली—"

" तरवार उशागतीं होती एकूण ? " गोमती पुन्हा आपल्या बडबड्या स्वभावाच्या पूर्वपदावर येऊन म्हणाली, " ती थोरल्या राजांची तरवार असेल ! "

" हो !—"

" तरीच ! मला तसें वाटतेंच, थोरल्या महाराजांना म्हणे, देवी जगदंबेनें ती तरवार प्रसाद म्हणून दिली होती, ती त्यांनीं आपल्या अवसानकाळीं राजांना दिली. आणि राजेदेखील तिला इतके जपतात म्हणायचे ! पलंगावर रात्रीं झोंपीं जायच्या वेळीं देखील तिला दूर विसंबत नाहींत. जसें कांहीं राजाचें तिच्याशीं लग्नच लागलें आहे. "

" अग ! पण—"

गोमती पुन्हां वरमली व म्हणाली, " तरवार उशाखालची काढून घेतली नि पुढें काय झालें ? "

" तरवार मीं घेतली नि आतां त्या सापावर वार करणार, तोंच बाई ! काय चमत्कार ! तो आपली फणा डोलवीत ' मारूं नकोस ' असें मला सांगूं लागला ! "

" काय ? साप बोलला ? "

" अग हो ! "

" हें मोठेंच आश्चर्य नाहीं का राणीसाहेब ? बरें; पुढें ? "

" सापाला वाचा फुटली, हें पाहून मी तर बाई ! अगदीं भांबावून गेल्यें, आतां काय करावें हेंच मला सुचेना. मारावें तर तो म्हणतो, मारूं नको. बरें; सोडावें तर एवढ्या मोठ्या जनावराला जिवंत कसें सोडायचें ? तो केव्हां काय अनर्थ करील याचा काय नेम सांगावा ? "

" खरेंच ! मग आपण काय केलें ? "

" मीं विचारलें ' तूं कोण ? ' तेव्हां ' मी तुझा पुत्र ' असें तो बोलला बाई ! "

" खरेंच ? "

" हो ! पण ऐक तरी ! एवढ्यानें कुठें झालें आहे ? तो आणखी मला

म्हणाला, " तुझ्या पोटीं शककर्ता छत्रपति म्हणून जो अवतारी पुरुष जन्माला येणार आहे तोच मी. " मग मीं जेव्हां याची खूण काय असें त्याला विचारलें—"

" पण एवढें बोलायला राणीसाहेब ! आपल्याला धीर बरा झाला ?"

" धीर झाला म्हणजे ? अग ! अशा वेळीं–प्राणांवर बेतायची वेळ ती, धीट न होऊन कसें चालेल ? मीं न भिता सापाला विचारलें, तूं सांगतोस याला प्रमाण काय ? ' यावर उद्यां सूर्योदयाच्या वेळीं एक ब्राह्मण साधु येऊन तुझ्या ओटींत अमृतफळ घालील, हें याचें प्रमाण ' असें उत्तर देऊन तो पलंगाखालीं उतरला व मी पाहात्यें आहें तों डोळयांचें पातें लवतें न लवतें तोंच दिसेनासा झाला. मग मी स्वारीला हातांनीं हलवून जागी करूं लागल्यें, तोंच संभाजी जागा झाला व मला हांका मारूं लागला. तेव्हां मी जागी झाल्यें. ".

" आतां राजेसाहेब शिंदखेडाहून आले, म्हणजे त्यांना हें स्वप्न सांगायला हवें. " गोमती म्हणाली, " आपण स्वप्न पाहिलें तें पहांटेच्या प्रहरीं. "

" होय. मी जागी झाल्यें तोंच कोंबडा आरवलेला ऐकला. "

" पहांटेच्या प्रहरीं पडलेलीं स्वप्नें हटकून खरीं होतात. स्वप्नांत असा साप दिसला कीं ओळखावें, त्या घरांत–त्या वंशांत पुत्रजन्म होणार. शिवाय आपणांला त्या सापानें सांगितलेंच आहे. आतां, तो साप जें बोलला, एक स्वामी येऊन अमृतफळ आपल्या ओटींत घालतील म्हणून, तो पण दाखला पाहायचा आहे. "

गोमती एवढें बोलते न बोलते तोंच दुसऱ्या दासीनें-गंडकीनें-येऊन वर्दी दिली, " राणीसाहेब ! बाहेर एक साधु आले आहेत. "

साधु आल्याची वार्ता कळतांच जिजाबाई हर्षित चित्तानें बाहेर गेली. तों एक प्रौढ वयाचा जटावेषधारी साधु कांखेला झोळी, एका हातीं झोळी, व दुसऱ्या हातीं कमंडलु असा दरवाजांत उभा ! त्या साधूच्या चर्येवरील तपश्चर्येचें तेज सूर्याच्या तेजाप्रमाणें भासत होतें, व त्याचें मुखमंडळ फुललेल्या कमला-प्रमाणें प्रफुल्ल दिसत होतें. कोणीही पाहाताच त्याच्या मनांत सच्छ्रद्धा उत्पन्न व्हावी अशा त्या तपोमूर्तीला पाहातांच जिजाबाईला आनंद वाटला तर त्यांत

नवल काय? पहांटेचें स्वप्न त्यांना ह्यावेळीं आठवलें व तेच हे साधु–पुरुष असावे असें तर्कानें ओळखून तिनें ओणवून त्यांना त्रिवार नमन केलें.

" सुपुत्रासौभाग्यवती भव!" असा साधूनें आशीर्वाद दिला व विचारलें, " शहाजीराजे कुठें गेले?"

जिजाबाई हात जोडून म्हणाली, " शिंदखेडला कांहीं राजकारणाच्या भानगडी मिटाविण्यासाठीं गेले आहेत."

इतक्यांत गंडकीनें पुन्हा येऊन वर्दी दिली, " राणीसाहेब! राजेसाहेबांची स्वारी आली."

" स्वारी आलीच!" असें म्हणून, जिजाबाई जरा लाजून दोन पावलें दूर उभी राहिली.

शहाजीराजांनीं आंत येतांच प्रथम साधूच्या चरणांना वंदन केलें.

" राजा! तूं मला ओळखलें नसशील?"

" स्वामीमहाराज! क्षमा करावी. पण मी आपणाला ओळखलें नाहीं खरें." शहाजीराजे म्हणाले.

" बरोबर आहे. तुला ओळख कोठून असणार! पण तुझ्या वडिलांची व माझी भेट झाली होती." साधु म्हणाले.

" होय स्वामी महाराज! मी बाबांच्या तोंडून एका तरुण साधुमहाराजांच्या भेटीविषयीं ऐकलें होतें खरें. त्यांच्याच कृपेनें आम्हांला हें वैभव प्राप्त झालें."

" तोच साधु मी. मालोजीराजाला वर मिळालेला तूं त्यांच्या तोंडून ऐकला असशीलच!"

" होय गुरुमहाराज!"

" तो वर यशस्वी होण्याची वेळा आतां आली आहे. मालोजी राजानें धन घेण्यापूर्वी शपथ वाहिलेली तुला सांगितलेली असेलच!"

" होय. गुरुमहाराज! त्या शपथेप्रमाणें माझे बाबा वागत आले व मीही तसाच वागत असून पुढेंही वागेन."

" शुभं भवतु" असें म्हणून साधु जिजाबाईकडे वळला व म्हणाला, " मुली! श्रीशिवभगवान् तुझ्या उदरीं अवतार घेणार आहेत. त्यांच्या अवताराचें परम मंगल चिन्ह म्हणून–" साधू आपल्या झोळींत हात घालून

एक श्रीफल बाहेर काढून शहाजी राजांकडे वळून म्हणाला, " राजा ! आज सोमप्रदोष. आज दोनप्रहरीं तुम्ही उभयतां अभ्यंगस्नानं करून षोडशोपचारें-युक्त अशी देवपूजा करा व नैवेद्यार्थ हें श्रीफळ देवाला अर्पण करा. नंतर प्रदोषकाळापर्यंत उपवास करून उपवासाचें पारणें फेडावयाचें तेव्हां हें श्रीफळ फोडून त्यांतील प्रसाद उभयतांनीं भक्षण करा. तुमच्या उदरीं तुमच्या अपेक्षेप्रमाणें व देवीच्या वरानुसार भगवान् अवतार घेणार हें तुम्ही जाणतांच; ती मंगल वेला आतां समीप आली आहे." जिजाबाईकडे वळून साधु म्हणाला, " मुली, आजपासून पूर्ण नवमास नवदिन अतिक्रमण होतांच तूं पुत्रवती होशील."

शहाजी राजांनीं साधूला श्रीफळानें युक्त अशा हस्तानें प्रणिपात करून तें श्रीफळ जिजाबाईच्या ओटींत घातलें. जिजाबाईनें ओटी नीट खोंचून साधूला वंदन केलें. साधु तिला शुभाशीर्वाद देऊन भगवन्नामाचा त्रिवार घोष करून तिथून निघून गेला.

साधूशीं शहाजीराजांचें व जिजाबाईचें काय संभाषण चाललें होतें तें गोमती दरवाजाच्या बाहेर उभी राहून चोरून ऐकत होती. ती साधु दरवाजाबाहेर पडतांच ती आपला सुगावा लागूं नये म्हणून चपळाईनें तेथून बाजूला सरली. पण आरंभापासून अखेरपर्यंत तिच्या डोळ्यांत चौकसपणाचें पाणी सारखें खेळत होतें. साधू बाहेर जातांच गोमतीही त्याच्या मागोमाग लगबगीनें बाहेर जाऊं लागली.

गंडकीनें तिला जातांना पाहिलें व विचारलें, "गोमती ! इतक्या लगबगीनें कुठें चाललीस ?"

गोमती ह्या प्रश्नानें जरा गोंधळल्यासारखी झाली. पण ती मोठी चतुर व प्रसंगावधानी होती. तिनें चटकन उत्तर केलें, " राणीसाहेबांना पहांटेला स्वप्न पडलें, त्या स्वप्नाचें फळ काय तें उपाध्येबुवांना विचारून येत्यें."

गोमती निघून गेली राणीसाहेबांच्या कामासाठीं ती जाते आहे, शिवाय ती राणीसाहेबांच्या मर्जींतील दासी, म्हणून गंडकीनेंही तिची फारशी चौकशी केली नाहीं. पण तिला विषाद मात्र वाटला. विषाद अशासाठीं वाटला कीं आपण राणीसाहेबांची जुनी दासी, व गोमती नुक्ती आठां दिवसांपूर्वी आलेली. असें असतां राणीसाहेबांची तिच्यावर इतकी मर्जी व विश्वास बसला.

गोमती येण्याच्या पूर्वी राणीसाहेबांची गंडकीवर फार मर्जी होती. असलें कोणतेंही खास राणीसाहेबांचें काम करायचें असलें कीं, तें राणीसाहेबांनीं गंडकीलाच करायला सांगावें. पण गोमती आल्यापासून तो मनू पालटला होता. गोमतीनें आपल्या चतुरपणानें व मधुर भाषणानें राणीसाहेबांना पूर्ण-पणें भारून टाकलें होतें. मग गंडकीला विषाद कां वाटणार नाहीं? पण गोमतीच्या ह्या अवचित भाग्योदयाबद्दल तिच्या नांवानें मत्सरानें बोटें मोडीत बसण्यापलीकडे गंडकीच्या हातीं तरी दुसरें काय होतें!

शहाजी राजे 'एका बाजूला निराशा व एका बाजूला आशा. आयुष्यां-तील सर्वच क्षण सारखे नसतात' असें स्वतःशीं पुटपुटत उभे आहेत, तोंच जिजाबाईला आपलें सुखस्वप्न राजांना केव्हां एकदां सांगेनसें झालें होतें. ती त्यांच्या जवळ जाऊन म्हणाली, "ऐकलें कां? मी पहांटेला एक चमत्कारिक स्वप्न पाहिलें, त्याचा दाखला हा असा हातोहात पटला."

"कोणतें स्वप्न तुम्हीं पाहिलें?" शहाजीराजांनीं कांहींशा चिंतातुर स्वरांत विचारलें.

जिजाबाईला शहाजीराजे कसल्या तरी चिंतेत आहेत एवढें त्यांच्या चर्ये-वरून ओळखतां आलें. शिंदखेडला स्वारी गेली होती, तिकडे सासरे-जांवई भांडले तर नसतील ना, अशी अमंगळ शंका तिच्या मनांत प्रथम उभी राहिली. ती म्हणाली, "इतकी चिंता कसली आपल्या जिवाला लागून राहिली आहे? शिंदखेडला जायचें झालें होतें तिकडे कांहीं कारण घडलें वाटतें?"

"कारण घडलें तर!"

"तें कोणतें?"

"तें मग सांगतों. पण अगोदर तुम्ही तुमचें स्वप्न तर सांगा!" असें सांगत राजे आपल्या महालाकडे निघाले. जिजाबाई त्यांच्या मागोमाग गेली.

प्रकरण पांचवें

# तेव्हां आणि आतां

वाचकांना दौलताबाद येथील शहाजी-जिजाबाई यांच्या लग्नमंडपांतून एकाएकीं दासदासींनीं व विविध वैभवांनीं युक्त अशा वाड्यांतील रंगमहालांत आणून सोडल्यानें एथल्या लेंकुरवाळ्या जिजाबाईला पाहून परक्यासारखें वाटेल; पण तसें वाटायचें कारण नाहीं. संभाजी हें शहाजी—जिजाबाई त्यांचें प्रथम पुत्ररत्न होय. जिजाबाई व शहाजीराजे यांचें लग्न झालें तेव्हां हा टोलेजंग वाडा-ज्या वाड्यांत आज जिजाबाईसाहेब आपल्या दासीशीं स्वप्नाविषयीं बोलत बसल्या होत्या, तो वाडा-तिथें नव्हता. तो शहाजीराजांचे वडील मालोजीराजे यांनीं मग बांधला. हा वाडाच काय, पण शहाजीराजांच्या लग्नापासून आज पाव शतकाच्या काळांत आणखी किती नव्या गोष्टी घडून आल्या होत्या.

जाधवराव व मालोजीराजे यांचा शहाजीराजांच्या लग्नाच्या वेळीं जो बेबनाव झाला, तो आज पाव शतकापर्यंत कायम होता इतकेंच नव्हे, तर असेच कांहीं योगायोग घडत गेले कीं, तो बेबनाव मालोजीराजांच्या हयाती-पर्यंत तर टिकलाच; पण कालांतरानें त्यांचें अवसान झाल्यावर त्या बेबना-वाच्या सैतानानें मालोजीराजांचें झाड सोडून शहाजीराजांच्या झाडाचा आश्रय केला. शहाजीराजांचें लग्न झालें तेव्हा अहमदनगरचें राज्य काय किंवा विजापूरचें राज्य काय, दोन्हीं राज्यें मोडकळीला आलीं होतीं. दिल्लीच्या तख्तावर परमप्रतापी अकब्बरबादशहा तेव्हां विराजमान असून तो ह्या दोन्ही राज्यांना कायमची मूठमाती देऊन त्यांना आपल्या पादशहातींत सामील करून घेण्यासाठीं टपून बसला होता. तें कार्य अकबर बादशाहाचा शहाजीच्या लग्नानंतर एका वर्षानें अंत झाला तेव्हां सिद्धीला गेलें नव्हतें खरें; तरी पण त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र जहांगीर आणि त्याच्या अंतानंतर जहांगिराचा पुत्र शहाजहान हे जे बादशहा दिल्लीच्या तख्तावर विराजमान झाले, यांची दृष्टीदेखील अहमदनगर व विजापूर यांच्या नाशावर निश्चयपूर्वक खिळून बसली होती. ती दिल्लीच्या बादशहांची सक्तीची वेळ

होती म्हणूनच कीं काय, त्या बादशहातीशीं टक्कर देऊन टिकण्याला पुरें पडण्याजोगें सामर्थ्य अहमदनगर किंवा विजापूर यांपैकीं एकाही राज्याच्या धन्याच्या अंगीं उरलें नव्हतें. शिवाय दिल्लीच्या बादशहातीशिवाय गोंव्याकडे त्यांना पोर्तुगीजांचा नवा शत्रु निर्माण झाला होता व तो त्यांना जर्जर करून सोडीत होता. दिल्लीच्या मोंगल बादशहांतींत काय किंवा अहमदनगर आणि विजापूर ह्या दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांत काय, राज्य असें मुसलमानांचेंच. ते जेते व हिंदु जित ! त्यामुळें कोठेंही गेलें तरी पळसाला पानें तीनच; हिंदु धर्म हिंदु रयत यांचा त्रातापाता कोणी नाहीं. अहमदनगरकर व विजापूरकर यांच्या पदरीं अनेक मराठे सरदार मानमान्यतेनें मनसबदारी सांभाळून होते. त्यांतले कांहीं पराक्रमीही होते. पण त्यांच्या पराक्रमांची परिसीमा आपल्या मुसलमान मालकांची मर्जी राखून, त्यांच्या राज्यांत आबादानी रहावी यासाठीं खपून आपली मनसबदारी कायम कशी राखावी किंवा कशी वाढवावी एथवरच होती. ह्या ताबेदारीची खरी चीड अहमदनगरकरांच्या पदरीं असलेल्या जाधवराव व भोंसले ह्या दोघां मनसबदारांना तरी असायची. कारण मुसलमानांनीं हिंदुस्थानांत आपल्या राज्य–विस्ताराचा व धर्म–विस्ताराचा धुडगूस सुरू केला, तेव्हा दाक्षिणेंतील देवगिरीचें यादव राज्य व उत्तरेंतील उदेपूरचें रजपूत राज्य हीं हिंदु प्रमुख राज्यें होतीं, व जाधवराव आणि मालोजीराजे भोंसले हे अनुक्रमें ह्या दोन राज्यांचे वंशज होते. पण ह्या दोघांच्या मनोवृत्तींतही जमीन-अस्मानाचें अंतर होतें. जाधवराव स्वभावतःच नेमस्त प्रकृतीचें, आपली दौलत, आपलें कुटुंब, आपले मानमरातब तेवढें पाहाणारे असल्यानें ते निजामशाहीचे एक आधारस्तंभ होते. त्यामुळें त्यांच्या डोक्यांत हिंदु-साम्राज्याची कल्पना अजून वाढीला लागणें फारसें संभवनीय नव्हतें. अहमदनगरकरांच्या पदरीं मालोजीराजे भोंसले मात्र तडफदार मराठा सरदार होते. तेदेखील जाधवरावांप्रमाणेंच अहमदनगरकरांचे ताबेदार खरे; पण जाधवरावांना ती ताबेदारी मनांत जांचत नसे व मालोजीराजांच्या मनांत ती जांचत होती, एवढाच काय तो फरक !

मालोजीराजे जरी जाधवरावांच्यानंतर उदयाला येऊं लागले तरी थोडयाच काळांत ते जाधवरावांपेक्षा जास्त प्रभावशाली झाले. त्यांनीं अनेक सत्कृत्यें करून रयतेची सहानुभूति आपल्या बाजूला खेंचून घेतली, व पराक्रमाच्या जोरावर

राजदरबारींही चांगलीच मानमान्यता संपादन केली. इतकी कीं, त्यामुळें जाधवराव कधीं कधीं फिक्के पडूं लागले.

जसा सिंह तसा सिंहाचा छावा या न्यायानें मालोजीराजांच्या निधनानंतर शहाजीराजे ' बापसे बेटा सवाई ' शोभूं लागले. ' तुझ्या वंशांतील तुझ्यापासून तिसरा पुरुष जो निपजेल तो शिवावतार शककर्ता परमपराक्रमी छत्रपति निपजेल ' असा देवीनें जो मालोजीला वर दिला होता, त्या वराचें प्रत्यंतर आपणाला आपल्या हयातींत पाहावयाला सांपडणार आहे असा शहाजीराजांना विश्वास होता. शहाजीराजे जन्मतःच चतुर व पराक्रमी होते. त्यांच्या वाढत्या पराक्रमानें निजामशाहींत त्यांच्यावाचून पान हलेनासें झालें.

पण शहाजीराजे एवढे कीर्तिवंत व संपन्न झाले, तसा त्याबरोबरच त्यांचा शत्रुगणही वाढूं लागला. जाधवराव हे त्यांचे सासरे; पण जाधवांपेक्षां भोंसले थोर ठरतात, हें त्यांना सहन होईना. शहाजीराजांनीं अनेकवार जाधवरावांना आपलें जीवितकार्य समजावून सांगितलें; पण ' हा एवढासा पोर मला हिंदवी —साम्राज्याच्या व शककर्ता छत्रपति आपल्या उदरीं येणार अशा काय गप्पा सांगतो आहे ! ' अशी त्यांची जाधवरावांनीं हेटाळणी केली. खुद्द जाधवराव —शहाजीराजाचे सासरे राजांशीं इतक्या तुटकपणें वागतात, असें पाहून राजांचें तेज ज्यांना सहन होत नसे, अशीं अनेक दिवाभीतें आजूबाजूला होतींच, त्यांनीं राजांच्या विरुद्ध कारस्थानें करण्याच्या कामीं जाधवरावांचा उपयोग करून घेण्याचा उपक्रम सुरू केला. ह्या आगलाव्या लोकांत निजामशाहींतील बरेच बडेबडे हिंदुमुसलमान सरदार व खुद्द दिल्लीचा बादशहा आणि त्याचे हस्तक सारख्याच खुनशीपणानें सामील होते. निजामशाहींतील मुसलमानांना वाटे कीं, आम्ही एवढे एकाहून एक रथी महारथी निजामशाहींत असतांना बादशहानें शहाजीराजांसारख्या एका काफिराच्या तंत्रानें राज्यकारभार हांकावा म्हणजे काय बिशाद आहे ! त्यांतच अहमदनगरचा बादशहा वारला व नवा बादशहा गादीवर आला. शहाजीराजे आपल्या कर्तबगारीनें या बादशहाचे वजीर झाले. अल्पवयी बादशहाला मांडीवर घेऊन तख्तावर बसून सर्व राज्यकारभार पाहूं लागले, तेव्हां तर त्यांच्या मत्सरी कंपूच्या संतापाला पारावर उरला नाहीं. त्या सर्वांना असें भय वाटूं लागलें कीं, शहाजीराजे असेच शिरजोर झाले, तर उद्यां ते स्वतःच तख्ताचे राजे होतील. शिवाय मालोजी-

राजांच्या वंशांतील तिसरा पुरुष शककर्ता छत्रपति होणार ही जनवार्ता झाली असल्यानें तो छत्रपति हेंच तख्त बळकावून बसेल कीं काय, आणि तसें झालें तर मग निजामशाहींत आपली प्रतिष्ठा ती काय राहिली ? असें सर्वांना भय वाटूं लागलें. ह्या भयाचें समूळ निरसन करायचें तर शहाजीराजांचा निजामशाहींतून उठावा केला पाहिजे असें शहाजीराजांच्या सर्व प्रतिस्पर्ध्यांना वाटूं लागलें. मग जो तो आपापल्या परीनें त्या उद्योगाला लागला.

शहाजी–जिजाबाईच्या लग्नानिमित्त भोजनाचें आमंत्रण देण्यासाठीं मालोजीराजे जाधवरावांकडे गेले होते; तेव्हां जाधवरावांनीं मालोजीचा धिक्कार करून ' तुम्हां भोंसल्यांना मी जाधवराव, माझ्यासमोर मान नमवा-यला लावीन ' असा पण मिशीला पीळ भरभरून केला होता. तो पण मालोजीराजांच्या हयातींत तर सिद्धीला गेला नाहींच पण पुढें मालोजीराजांच्या पश्चात् जाधवरावांनीं निजामशाहींत वजिरी मिळविण्याचे आटोकाट प्रयत्न केले; पण अनेक कडव्या मुसलमानांनीं त्यांना यश येऊं दिलें नाहीं. त्यामुळें ' मी वजीर होऊन भोंसल्यांना माझ्यासमोर नमायला लावीन ' हा पण सिद्धीला जाण्याची आशा त्यांना दिसेना. बादशहाच्या निधनानंतर बेगमेनें इतर कार-भारी मंडळीच्या सल्ल्यानें व शहाजीराजांची कर्तबगारी पाहून त्यांना वजीरपद दिलें व शहाजी राजे छोट्या बादशहाला मांडीवर घेऊन तख्तावर बसूं लागले तेव्हां तर दरबारी शिरस्त्याप्रमाणें बादशहाला कुर्निसात करतांना बादशहा शहाजीराजांच्या मांडीवर बसलेला म्हणून त्याला कुर्निसात करणें जाधवरावांना प्राप्त होतें. शहाजीच्या लग्नप्रसंगीं ' तुम्हां जाधवांना आम्हां भोंसल्यांसमोर मान नमवावी लागेल, व मी म्हणतों याची प्रचीति माझ्या तीन पिढ्यांत तुम्हांला पाहायला सांपडेल ' असें मालोजीराजे आवेशाच्या भरांत बोलून गेले होते. ती प्रचीति पाहण्याचा प्रसंग जाधवरावांच्या वांट्याला आजच येऊन ठेपला. जिथें सोनें वेंचीन अशी ईर्षा धरावी, तिथें गोंवऱ्या वेंचण्याचा प्रसंग आल्याप्रमाणें जाधवरावांना ही परिस्थिति अपमानकारक व दुःखदायक वाटूं लागली. ' अशा अपमानास्पद स्थितींत राहण्यापेक्षां–भोंसले आपले प्रतिस्पर्धी, त्यांच्यासमोर मान नमविण्यापेक्षां–आपण मोंगलांना जाऊन मिळणें अधिक हिताचें होय; सेवाच करायची तर दिल्लीच्या तख्ताची सेवा करणें जास्त युक्त, कारण तें तख्त आपल्या पूर्वजांचें–मूळचें यादव-

वंशाचें आहे. आज त्या तख्तावर मोंगल बादशहा शहाजहान राज्य करीत असला तरी तें तख्त मूळ आमचें यादवांचें, अर्थात् त्या तख्ताचें वैभव वाढवून झाडून साऱ्या लोकांना त्या तख्ताला मुजरा करायला लावणें म्हणजे यादववंशाची श्रेष्ठता मान्य करायला लावणेंच होय' अशा विचारानें जाधवराव ताबडतोब निजामशाही सोडून दिल्लीच्या बादशहाला जाऊन मिळाले. दिल्लीच्या बादशहाला विजापूर व अहमदनगर हीं दक्षिणेंतील दोन्हीं राज्यें बुडवून मोंगलसाम्राज्याची वाढ करायची अनावर इच्छा होतीच. त्या इच्छेच्या पूर्तीसाठीं जाधवरावासारखीं बाहुलीं जेवढीं हातीं सांपडतील तेवढीं त्याला पाहिजेच होतीं.

शहाजहान बादशहाचा शहाजीराजावर राग अशासाठीं कीं, निजामशाहीचें रक्षण करणारा धडाडीचा असा तेवढाच एक पुरुष निजामशाहींत होता, व तो तेथें आहे तोंवर आपली तेथें डाळ शिजायची नाहीं अशी बादशहाची पक्की खात्री होती. यासाठीं शहाजीची ब्याद जशी टाळतां येईल तशी टाळायची असा शहाजहान बादशहाचा निश्चिय होता. दिल्लीपती शहाजीराजांना निजामशाहीचे आधारस्तंभ मानीत होता, तें सर्वथैव खरें होतें. शहाजीराजे निजामशाहीच्या संरक्षणासाठीं आटोकाट प्रयत्न करीत होते. काय पाहिजे तें झालें तरी निजामशाही तारायची असा त्यांचा निर्धार होता. पण त्या निर्धारांतील हेतु मात्र फार खोल. जाधवरावांना जसा त्यांच्या यादववंशाचा अभिमान होता, तसाच शहाजीराजांना आपल्या शिसोदिय वंशाचा अभिमान होता. पण जाधवराव आपल्या पूर्वजांच्या तख्ताचा मान राखण्यासाठीं त्या तख्तावर आरुढ होणाऱ्या मोंगलबादशहाला मान देण्याला व त्या तख्ताचें वैभव वाढविण्याला हपापलेले होते, तर शहाजीराजे तख्ताच्या असल्या पोकळ बढाईला मान्यता देण्याइतके नेमस्त वृत्तीचे नसून 'आम्ही हिंदु, आमचीं साम्राज्यें मुसलमानांनीं धुळीला मिळविलीं व आमचीं तख्तें बळकाविलीं. तें वैभव आम्ही पुन्हां संपादन करून भोगूं' अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती. ही त्यांची महत्त्वाकांक्षा उत्तरेकडे हिंदुपदपादशाही स्थापन करून पूर्ण होण्यासारखी नव्हती. कारण तिकडे अकबरबादशहानें उदेपूरच्या राण्याशीं 'तुम्ही तुमच्या राज्यांत स्वतंत्र राजे म्हणून राज्य करावें; दिल्लीच्या तख्ताचे अंकित तुम्ही नाहीं व दिल्लीपति तुमच्या स्वतंत्र राजेपणाच्या आड येणार नाहीं. पण तुम्ही आपला राज्य-

विस्तार मात्र करूं नये ' असा तह करून उत्तरेकडील पराक्रमी हिंदु राजांना आपल्या ताटाखालचीं मांजरें बनविलें होतें. हिंदूंची सत्ता स्थापन करायची तर ती दक्षिणेंतच केली पाहिजे; व त्या कार्याला दिल्लीवर मोंगलांकडून अडथळा होऊं नये म्हणून त्यांना दक्षिणेंतील मुलुखांत घुसूं द्यायचें नाहीं, असा शहाजीराजांचा निजामशाहीच्या रक्षणासाठीं झगडण्यांत अंतस्थ हेतु होता.

एकूण काय, शहाजीराजांचा नाश करण्यासाठीं मुसलमान व हिंदु सर्व बाजूंनीं टपलेले होते. जाधवरावही भलत्या मानापमानाच्या भरीं पडून राजांशीं वैर मांडून बसले होते. जाधवरावांचा विरोध काय किंवा दिल्लीच्या बादशहाचा विरोध काय, राजांना प्रथम तितकासा जाणवला नाहीं. पण निजामशाहींतील मुसलमानांचा विरोध मात्र हळुहळु जाणवूं लागला. त्यांनीं नानापरीनीं शहाजीराजांच्या मार्गांत सतत अडचणी आणण्याला सुरुवात केली. पण एकही मसलत नीटशी जमेना. मांजराच्या गळयांत घांट बांधायची असा ठराव तर उंदरांच्या सभेंत एकमतानें पसार झाला; घांट बांधायला पुढें कोणी सरावें याचा मात्र निर्णय त्या उंदरांना करतां येईना. तेव्हां त्यांनीं विचार फेरविचार करून फत्तेखानाला आपला पुढारी नेमण्याचें ठरविलें. फत्तेखानाला तरी अशी खेंकटीं पाहिजेच होतीं. बादशहाच्या पश्चात् अहमदनगरच्या निजामशाहीच्या वजिरीची मनसब आपणाला मिळावी व आपल्याच घराण्यांत टिकावी हा त्याचा हेतु. त्या हेतूच्या मुळाशीं आणखी गर्भित हेतु असा कीं, अनायासें बादशहा मरून बेगम विधवा झाली आहे, ती तरुण व सुंदर आहे, तेव्हां आपण वजीर झाल्यास तिच्याशीं निका लावावा व तिच्या नांवानें राज्यकारभार करून आपण निजामशाहीचा अनभिषिक्त बादशहा व्हावें. पण त्यानें आपल्या बेअकलीपणानें अनेक संकटें निजामशाहीवर ओढवून आणल्यामुळें याच्या हातून राज्यकारभार रेंटायचा नाहीं असें ओळखून बेगमेनें शहाजीराजांना वजीर केलें. याबद्दलचा शहाजीराजांवर सूड घेतां यावा व विधवा बेगमेशीं संधान बांधून तिला आपली बेगम बनवून राज्य उपभोगावें, अशा संधीची फत्तेखान वाटच पाहात होता. त्याला त्याच्यासारख्याच इतर विघ्नसंतोषी लोकांची भर मिळतांच माकडाच्या हातीं कोलीत मिळाल्यासारखी अवस्था झाली. त्याच्या प्रभावळीच्या मतें असें ठरलें कीं, " निजामशाही ही

बादशहाची; पण बादशहा नुसता नांवाचा ! बेगम व अल्पवयी नामधारी बादशहा यांच्या नांवावर शहाजीसारख्या एका हिंदूनें—एका काफिरानें—वजीर बनून बादशाही तख्तावर बसून राज्यकारभार करावा व सर्व मुसलमानांनीं त्या काफिराला लवून कुर्निसात करावा, यापेक्षां मुसलमानाना नामुश्कीची दुसरी कोणती गोष्ट आहे ! ही नामुश्की यापुढें मुसलमानांनीं सहन करायची नाहीं; काय वाटेल तें करून ह्या काफिराला निजामशाहींतून हुसकून लावायचें, व हिंदूंची निजामशाहींतील सत्ता नामशेष करायची. ”

फत्तेखानाचा हा आगलावेपणाचा उपदेश शहाजीराजांच्या नाशावर टपून बसलेल्या सर्व मुसलमानांना सोळा आणे पटला. निजामशाही बुडाली तरी हरकत नाहीं, पण शहाजीला यापुढें वजिरी उपभोगूं द्यायची नाहीं, अशा निश्चयानें त्यांनीं सर्वांनीं मिळून फत्तेखानाच्या पुढारीपणाखालीं कट—कारस्थानें करण्याचा उद्योग जारीनें सुरू केला. पाडाव करायचा तो एकट्या शहाजीचाच करून थांबायचें नाहीं; त्याचीं पाळेंमुळें खणून काढून पुढेंमागें जग बोलतें त्याप्रमाणें शहाजीच्या वंशांत जर छत्रपति खरोखरच अवतरणार असेल, तर त्या अवताराला वाव मिळूं द्यायचा नाहीं, हेंही त्या कटकारस्थानाचें एक प्रमुख अंग होऊन बसलें. हां हां म्हणतां ह्या कारस्थानाचे धागेदोरे इतक्या दूरवर पसरले—ते किती दूरवर पसरले होते, हें ओघाओघानें पुढें कळणारच आहे. .

शहाजीराजे एवढे चतुर व कर्तबगार; त्यांना ह्या गुप्त कारस्थानांची दाद लागल्याशिवाय थोडीच राहाणार ! त्यांचे गुप्त हेर चोहोंकडे संचार करून सप्तपाताळांतील देखील बातमी आणायला समर्थ होते. त्यांनीं रोज बातम्या आणाव्या व त्या ऐकून शहाजीराजांनीं आपलें पुढील धोरण आंखावें. पण त्यांतूनही कांहीं अत्यंत पाताळयंत्री कारस्थानें जर असलीं; तर त्यांचा तपास लावणें कधीं कधीं मनुष्यशक्तीच्या आटोक्याच्या पलीकडचें होऊन बसतें. रणांगणावर लढून त्रिभुवनविजयी झालेला वीरही कधीं कधीं आपल्या महालाच्या पायरीशीं ठेंचाळतो. कांस्याचा नायटा व राईचा पर्वतही कधीं कधीं होतो.

सारांश, शहाजीराजांचें लग्न झाल्यापासून आज पाव शतकांत एकंदर गोष्टी ह्या थराला येऊन पोंचल्या होत्या. वैभवाच्या दृष्टीनें पाहिलें तर त्यांच्या

वैभवाला आज सीमाच नव्हती. गृहसौख्याच्या दृष्टीनें पाहिलें तरी त्यांच्या-सारखे भाग्यवान तेच होते. कारण जिजाबाई जी त्यांना अर्धांगी लाभली, ती रूपवान तशीच गुणवान व तशीच चतुर होती. देवदयेनें नुक्ताच एक त्यांना पुत्ररत्नाचा लाभ झाला होता. सत्ता पहावी तर अल्पवयी सुलतानाचे ते वजीर ! यापेक्षां सत्ता ती आणखी काय पाहिजे ? असें सर्व कांहीं शहाजीराजांच्या मनासारखें झालें होतें. पण त्यांच्या ह्या मान-धन-पुत्र-कलत्र-संपन्न वैभवाला दृष्ट लागूं नये म्हणूनच कीं काय, जाधवराव मात्र अजून त्यांच्याशीं वैऱ्यासारखेच वागत होते. आजवर शहाजीराजे जाधवरावाशीं सलोखा करण्याचे होते नव्हते तेवढे प्रयत्न करून भागले होते, व अलीकडे तर त्यांनीं त्यांचा नाद सोडून दिला होता.

पण आज शहाजीराजांच्या बातमीदारानें जेव्हां बातमी आणली कीं, फत्तेखान जाधवरावांना वश करून आपल्या बाजूला घेऊन त्यांच्यामार्फत दिल्लीपतीशीं संधान बांधू पाहात आहे व हा डाव साधल्यास जाधवराव आणि दिल्लीपति एक होऊन आपल्या संयुक्त फौजेनिशीं दौलताबादेवर स्वारी करून निजामशाही बुडविणार; तेव्हां ही बातमी ऐकून शहाजीराजांचें मन अस्वस्थ झालें. आतां पुन्हा एकदां जाधवरावांची समजूत घालून पाहावी ह्या इराद्यानें ते आज मुद्दाम जिजाबाईच्या सांगण्यावरून आपण होऊन शिंदखेडला गेले होते.

## प्रकरण सहावें

# राजा–राणी

“बाबा इतके स्वाभिमानशून्य होऊन प्रत्यक्ष आमच्यावर–आपल्या लेंकरावर आग पाखडायला तयार होतील असें मला वाटलें नव्हतें. निजामशाहींत वजिरी मिळावी अशी त्यांची इच्छा असेल हें मला कबूल. पण ती वजिरी आपणाला मिळत नाहीं व आपल्या जांवयांना

मिळाली म्हणून जांवयावर सूड उगविण्यासाठीं ते मोंगलांना सामील होऊन निजामशाही बुडवायला तयार कसे झाले, याचेंच मला आश्चर्य वाटतें. अजूनही आपण सांगतां यावर माझा विश्वास बसत नाहीं." जिजाबाई शहाजीराजांच्या तोंडून शिंदखेडला आपल्या माहेरीं काय प्रकार घडला याचें वर्णन ऐकून म्हणाली.

"तुमचा विश्वास नाहींच बसायचा. कारण जाधवराव तुमचे वडील पडले. पण मला एक सांगा, तुमचा विश्वास जन्मदात्या वडिलांवर जास्त आहे कीं माझ्यावर जास्त आहे?" शहाजीराजांनीं कांहींसें रागाऊन विचारलें.

"हें काय विचारणें?" जिजाबाई शहाजीराजांजवळ जाऊन त्यांचा राग शांत व्हावा म्हणून त्यांना पंख्यानें वारा घालीत म्हणाली. "तसें मला विचाराल तर वडील माझे कोण व मी वडिलांची कोण? हो, त्यांनीं मला जन्म दिला खरा, पण त्यांनीं कन्यादान केलें. मला आपल्यांला अर्पण केली तेव्हांच ते मला अंतरले व मी त्यांना अंतरलें. कन्यादानाचें उदक जाधवरावांच्या हातून भोंसल्यांच्या हातांवर सुटलें त्याच दिवशीं जाधवांची जिजा मेली व भोंसल्यांची जिजाबाई जन्माला आली. मी ते माझे बाबा म्हणून त्यांचा कड घेत्यें किंवा घेईन असें आपणांला वाटतें तरी कसें?"

"एरव्हीं तुम्ही मला गळ घालघालून जाधवांच्या दारीं जायला भाग पाडलेंच नसतें. तुम्हांला जर तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें जाधवांच्या कुळाहून भोंसल्यांच्या कुळाचा जास्त अभिमान वाटतो, तर जाधव भोंसल्याशीं उघड-उघड वैर मांडून बसले असतां भोंसल्यांनीं—प्रत्यक्ष तुमच्या पतीनें एखाद्या नोकरासारखे त्यांच्या दारीं जावें, सलोख्यासाठीं त्यांच्या पुढें तोंड वेंगाडावें व अपमान सोसून परत यावें, अशी इच्छा तुम्ही केलीच नसती!"

"मीं इच्छा केली, मीं तशी इच्छा केली खरी. पण ती कां केली? आपला अपमान व्हावा म्हणून केली?"

"नाहीं तर काय माझा मान राहावा म्हणून केली? राणीसाहेब! तुमच्या वडिलांचा स्वभाव तुम्हांला माहीत होता. असें असतां—"

शहाजीराजांना पुरतेपणीं बोलूं न देतां जिजाबाई म्हणाली, "एकूण इतके दिवस एकत्र संसार करून आपण माझी हीच किंमत केली! तरी मी

मनांत म्हणत होतें, अलीकडे दुसऱ्या लग्नाचे विचार आपल्या डोक्यांत घोळूं लागले आहेत ते कां ? ”

“ राणीसाहेब !–” शहाजीराजांना कांहीं बोलायचें होतें, पण जिजाबाईनें त्यांना बोलूं न दिल्यामुळें ते तेवढ्यावरच थांबले.

जिजाबाई डोळे आंसवांनीं भरून आणून म्हणाली, “ माझी हरकत नाहीं; आपण मोहित्यांच्या तुकाबाईशींच काय; अशा आणखी एक सोडून एकवीस बायकांशीं लग्नें करून मला आणखी एकवीस सवती घरांत आणल्या तरी माझी मुळींच हरकत नाहीं. पण माझें म्हणणें एवढेंच कीं, माझ्या माथीं दोषांचें खापर फोडून आपण तें करूं नका. आपण राजे ! आपण आजच्या निजामशाहीचे वजीर ! आपण उद्यांच्या छत्रपतींचे भाग्यशाली जन्मदाते ! आपण मनांत आणाल ती गोष्ट करूं शकाल. माझें बायकोमाणसाचें तिथें काय चालणार आहे ! पण—”

“ पण काय ? राणीसाहेब ? हा सवतीमत्सर तुमच्या तोंडानें भलभलत्या गोष्टी बोलतो आहे. ”

“ नाहीं बरें, नाहीं. मी सवतीमत्सर कधींही करणार नाहीं. आपल्या चरणांना साक्ष ठेवून सांगत्यें, आपण आणखीं कितीहीं लग्नें केलीं तरी मी त्या सवतींचा मत्सर मरेतों कधींच करणार नाहीं. आणखी कितीही सवती आल्या तरी त्या माझें पद तर हिरावून घेऊं शकणार नाहींत ना ? माझा सद्धर्म असेल, पतिव्रताधर्माची पाळणूक आजवर माझ्या हातून यथान्याय झाली असेल, तर परमेश्वर माझा पाठिराखा आहे. त्याच्या कृपेनें माझ्या उदरीं उगवते छत्रपति अवतारणार आहेत. देवीचा आशीर्वाद व महापुरुषानें दिलेला हा प्रसाद कधींही अन्यथा व्हायचा नाहीं. आणखी कितीही सवती आल्या तरी राजमाता मीच होईन. आपण वेळीं मला पट्टराणीपदावरून दूर करूं शकाल; पण परमेश्वरानें मला देऊं केलेला राजमातेचा मान तर आपण माझ्यापासून हिरावून घेऊं शकणार नाहीं ना ? नाहीं ना ? कीं तेंदेखील आपल्या हातचें आहे ? हा देवगुरूंचा प्रसाद—हें श्रीफळ माझ्या ओटींत आपण आपल्या हातांनीं घातलें; ह्या प्रसादाचा व ह्या प्रसादाच्या आश्रयानें आपणांला मिळालेल्या भावी छत्रपतींच्या पितृपदाचा मान तर आपण अव्हेर-णार नाहीं ना ? भोंसल्यांच्या कुळांत छत्रपति अवतरणार म्हणून भोंसल्यांचा

द्वेष करणारे इतके लोक आहेत, त्यांतीलच एक आपण बनून जाधवांच्या मुलीला राजमातेचा मान मिळवूं द्यायचा नाहीं अशी ईर्षा तर आपण धरलेली नाहीं ना ? तशी ईर्षा धरली असेल, इतर अभागी लोकांप्रमाणेंच छत्रपतींच्या अवताराला आडकाठी करण्याचें धैर्य आपल्या अंगीं असेल, तर ही मी ह्या श्रीफळासह आपल्या पायां पडत्यें, मला लाथेनें दूर सारा ! " असें म्हणून जिजाबाईनें शहाजीराजांच्या पायांवर मस्तक ठेवलें. तिच्या डोळ्यांतून या वेळीं आसवें गळत होतीं व त्या आसवांनीं राजांची पावलें भिजत होतीं.

शहाजीराजांना जिजाबाईच्या ह्या कळवळयाच्या बोलांची उपेक्षा करतां येणें शक्य नव्हतें. कारण, मोहित्यांच्या मुलीशीं लग्न करण्याविषयीं त्यांच्या मनानें घेतलें होतें व त्याबाबत जिजाबाईची संमति मुळींच विचारली नव्हती. ही वाटाघाट त्यांनीं शक्य तितक्या मोघमपणानें चालविली होती. पण ती जिजाबाईच्या कानावर आलेली ऐकतांच ते वर्मी पकडले गेले. शिवाय जिजाबाईनें आपला अव्हेर केल्यानें 'भावी छत्रपतीचा अव्हेर केल्याच्या पापाचे धनी आपण व्हाल.' अशी स्पष्ट जाणीव दिली; ती तर शहाजीराजांच्या जिव्हारीं झोंबली. छत्रपतींचा अवतार होणार व तो आपण आणि जिजाबाई ह्या जोडप्याच्याच उदरीं होणार असें स्पष्ट भविष्य वर्तवून आताच स्वामींनीं श्रीफळाचा प्रसाद दिला होता. त्याचप्रमाणें त्या प्रसंगाचें महत्त्व एवढें अफाट होतें कीं, त्यासमोर असल्या क्षुल्लक गोष्टींना नसतें महत्त्व देणें हा निव्वळ अविचार होय, इतकें जाणण्याइतकें शहाजीराजे सुज्ञ होते. ते जाधवरावांकडे गेले ते जिजाबाईच्या सांगण्या-वरून गेले खरे; पण तसें सांगण्यांत आपल्या सासऱ्याकडून अपमान व्हावा असा तिचा मानस असल्याचें आपण रागाच्या भरांत कांहींतरी बोलून गेलों असें त्यांचें मन त्यांना आतां खाऊं लागलें होतें. हा जो आपल्या हातून आपल्या पत्नीचा अपमान झाला, त्या अपमानाची भरपाई वेळींच केली पाहिजे असें त्यांना त्याच क्षणीं वाटूं लागलें. त्यांनीं ताबडतोब आपला सारा राग आवरता घेतला, व जिजाबाईला आपल्या हातांनीं धरून उठवून हृदयाशीं धरून आपल्या शेल्याच्या पदरानें तिचीं आंसवें पुशीत गोड शब्दांनीं तिची समजूत करण्याला सुरुवात केली, " जिजाऊ,—" नेहमीं शहाजीराजे तिला 'राणीसाहेब' अशा गौरवार्थी हांक मारीत, पण जेव्हां

उभयतांच्या प्रेमसंबंधाच्या महासागरांत प्रणयाच्या पर्वतप्राय लाटा उसळूं लागत तेव्हां तीं दोघेंही आपण राजाराणी आहोंत हें अजिबात विसरून एकमेकांशीं समरूप होऊन जात व तेव्हां राजे तिला ' जिजाऊ ' ह्या एकेरी लाडक्या नांवानें संबोधीत. तशीच लाडकी हांक मारून राजे तिला म्हणाले, " जिजाऊ ! सवतीमत्सर हा तुम्हां बायकांच्या पांचवीलाच पूजलेला असतो, पण तुझ्यासारख्या सूज्ञ स्त्रीनें-महाराष्ट्राचा भावी छत्रपती जिच्या उदरीं जन्म घेणार त्या भाग्यशाली राणीनें असे सामान्य स्त्रीला शोभेसें संशयी भाषण किंवा वर्तन करणें योग्य नाहीं. उगी रहा ! रडूं नकोस, उगी रहा ! आजचा दिवस हा आपल्या आयुष्यांतील भाग्योदयाचा दिवस आहे. अविंधांच्या अमानुष अत्याचारांनीं ग्रस्त झालेल्या आपल्या महाराष्ट्राचें दास्य-विमोचन करणारे रयतेचे कैवारी छत्रपति म्हणून ज्याच्या कीर्तीचा डका अलम दुनियेंत गाजायचा आहे, त्या अवतारी पुरुषाच्या अवतरणाचा संदेश आज आपणांला निश्चितपणें ऐकायला मिळाला. अशा मंगल दिवशीं तूं डोळ्यांतून पाणी आणतेस ? वेडी कुठली ! उगी रहा ! रडूं नकोस ! "

जिजाबाई मोठी चतुर, धोरणी, दूरदर्शी व आत्मसंयमी आर्यकन्या होती. शहाजी राजे मोहित्यांच्या सुंदर तुकाबाईशीं आज ना उद्यां लग्न करणार, आपण असें करूं नका म्हटलें तरी ते तें ऐकणार नाहींत, हें ती पूर्णपणें ओळखून होती. त्याविषयीं तिच्या मनाला खेद झाला नव्हता किंवा झाला नसता असेंही नाहीं. खेद झाल्याशिवाय कसा राहील ? कोणत्या स्त्रीला संतोषानें आपणाला सवत असावी असें वाटेल ? पण भविष्यकाळीं घडूं पाहणाऱ्या त्या नाजूक गोष्टीविषयीं आजपासून धुसफुसूं लागणारी दुबळ्या व चंचल मनाची जिजाबाई नव्हती. ती रागाच्या भरांत 'अरे तर कोरे' या न्यायानें बोलून गेली खरी. रागाच्या भरांत माणूस काय पाहिजे तें बोलतें. पण जिजाबाईला राग येण्याचें खरें कारण तें नव्हतें. आपल्या बोलण्याचा राजांनीं विपर्यास केला व आपण आपल्या वडिलांचा मान राखण्यासाठीं पतीचा अपमान झालेला सहन करायला तयार असल्याचा वृथा आरोप आपणावर केला, याची तिला चीड आली. तिनें राजांना जाधवरावांपाशीं जाऊन सलोखा करण्याच फिरून एकवार प्रयत्न करण्याला सांगितलें, व म्हणूनच राजे शिंदखेडला गेले, एरव्हीं मुळींच गेले नसते हें खरें. तसेंच यापूर्वींही जेव्हां जेव्हां संधि मिळेल

तेव्हां तेव्हां ती राजांना उपदेश करी, ' बाबा कसे झाले तरी वडील माणूस आहेत. त्यांनीं आपला एखाद वेळीं अपमान केला असला तरी आपण त्यांचीं लेकरें, आपण त्यांचा अपमान करतां कामा नये. जाधव व भोंसले यांच्यांत मानापमानाच्या चुरशीमुळें कितीही बेबनाव माजला असला तरी अडल्या भिडल्याला दोघेही एकमेकाना सोयरेधायरे म्हणून उपयोगी पडले पाहिजेत. त्यासाठीं दोन्ही घराण्यांमधील बेबनाव नष्ट होऊन दोघांनीं एकमेकांशीं गुण्यागोविंदानें वागलें पाहिजे. दोघेही हट्टी, कुणीही कुणाशीं नमतें घ्यायला तयार नाहीं, अशानें कसा निभाव लागेल? कुणी तरी एकानें पड खाऊन उभयपक्षीं गोडी राखली पाहिजे. ती पड खायला जाधव तयार नसले तर ते हटवादी आहेत हें ओळखून आपण सुज्ञपणें पड खाल्ली पाहिजे.'

पण असाच उपदेश करण्यात आपल्या वडिलांचा श्रेष्ठपणा ठरावा व भोंसल्यांच्या पदरीं अपमान पडावा अशी कोती इच्छा तिची कधींही नव्हती. विधिसंकेतानुसार जाधव–भोंसले हीं दोन बलाढ्य मराठा सरदार घराणीं रक्तसंबंधानें एकजीव झालीं. तीं जर एकाचें तोंड पूर्वेकडे व दुसऱ्याचें पश्चिमेकडे अशा दुज्या भावानें एकमेकांना पाण्यांत पाहूं लागलीं तर त्यामुळें दोघांचीही प्रगति खुंटेल व हे दोन वीरपुरुष आपसांत झगडूं लागून निर्बल झाले म्हणजे दोघांचें भांडण आणि तिसऱ्याचा लाभ या न्यायानें परक्या मुसलमानांना दोघांचाही धुव्वा उडवून सारें भारतवर्ष जिकडे तिकडे मुसलमानमय करून सोडायला आयतें फावेल. तीच जाधव–भोंसल्यांची एकी झाली तर दोघांनाही एकजुटीनें परशत्रूशीं झगडून आपल्या नष्ट राजवैभवाचें पुनरुज्जीवन करतां येईल. जाधव राजकुळांतील माता व भोंसले राजकुळांतील पिता असा दोन राजघराण्यांच्या एक रक्तांतून छत्रपति अवतार घेतील व दोन्हीं राजघराण्यांची कीर्ति अजरामर करून सोडतील. एवढ्या उदात्त हेतूनें आपण आपल्या पतीला जाधवांशीं मिळतें घ्यायला सांगितलें. त्याचा आपल्या पतीनें अर्थाचा अनर्थ केला. म्हणून जिजाबाईला अपमान वाटला व रडूं आलें. पण राजांनीं तिला उठवून हृदयाशीं धरतांच तिच्या अपमानाचें व दुःखाचें परिमार्जन होण्याला कितीसा उशीर ? दुसरी तिसरी सामान्य स्त्री असती तर अशा वेळीं सवतीचा प्रश्न झटाला लावून आपला पति इतका आपल्या मुठींत आला असें पाहून अधिक रुसली असती व ' मी दुसऱ्या स्त्रीशीं लग्न करणार

नाहीं ' असें त्याच्यापासून वचन घेईपर्यंत रुसवा न सोडती. मग राजांनीं वेळीं तसें हंगामी वचन मारे अघळपघळपणानें दिलें असतें व तें पुढें मर्जी-प्रमाणें अघळपघळपणानें मोडलेंही असतें. त्यामुळें मग त्यांच्या पत्नीचा पतीच्या ह्या वचनभंगामुळें अपमान झाला असता, व त्यांच्या हातूनही वचनभंगाचें नकळत पाप घडलें असतें. पण जिजाबाईनें तसें कांहींदेखील केलें नाहीं. सवतीविषयींच्या प्रश्नाचा खल करायला राजे ओशाळले एवढाच ह्या बाबीपुरता आपला विजय झाला तो सई असें मानून तिनें बाजू मोठ्या चातुर्यानें सांवरून घेतली. " महाराज ! आजच्या शुभ दिवशीं आपण मला रडवलें. आपण माझ्यावर भलता आरोप केला नसता तर मला रडूं आलें नसतें. "

" बरें; ही आमच्या हातून चूक झाली याबद्दल आम्ही आपली क्षमा मागतों, मग तर झालें ? आतां तरी तुमची समजूत होईल कीं नाहीं ? कीं यापेक्षां निराळी एखादी शरणचिठी लिहून दिली पाहिजे ? " शहाजीराजे जिजाबाईच्या —त्या आपल्या गृहलक्ष्मीच्या हनुवटीला आपल्या उजव्या हाताच्या बोटानेंच नेट देऊन तिची मान हलकेंच अंमळ वर उचलीत लडिवाळपणानें म्हणाले.

शहाजीराजाचे हे बोल जिजाबाईच्या कानांना अमृतापेक्षांही गोड लागले. तिच्या चेहऱ्यावरील दुःख, शोक, अपमान चटसारा त्याच क्षणांत नाहींसा होऊन तेथें स्मित हास्य विलसूं लागलें. ही वेळा स्वारीला एक लहानसा टोमणा द्यायला खाशी आहे असें पाहून ती म्हणाली, " शरणचिठी काय करायची ? आपल्यासारख्या जमदग्नीच्या अवताराकडून आज शरणचिठी घेतली कीं ती उद्यां मरणचिठीच ठरायची ! "

" ती कशी काय ? "

" कशी काय म्हणजे ? चांगल्या हिताच्या गोष्टी मी सांगितल्या तरी त्यांचा आपण विपर्यास करता, कारण मी जाधवांची मुलगी ! मी म्हणत्यें, आपण आज चूक झाली म्हणाला, त्याच चुकांचा खिळा होऊन उद्यां माझ्या पायांत बोंचायचा ! आपण उद्यां रागाच्या भरांत म्हणायचे, ' माझ्या प्रति-स्पर्ध्यांच्या यःकश्चित पोरीसमोर मला माघार घ्यावी लागली; यांत माझ्या भोंसल्यांच्या वंशाचा अपमान झाला. ' हो ! असें आपण रागाच्या भरांत म्हणायला कमी करायचे नाहीं, माझी बालंबाल खात्री आहे. "

" वाः ! राणीसाहेब ! अखेर तुम्ही आमचे दांत आमच्याच घशांत खासे घातलेत ! "

" मग म्हणायचें तर, जाधवांच्या पोरीनें माझा अपमान केला. म्हणायचें एकदां, म्हणजे जाधवांचे पितर एकदांचे उद्धरून जातील ! "

" हें पाहा, राणीसाहेब ! आमची चूक आम्ही कबूल केली. चूक कबूल केल्यावर आतां बाकी काय राहिलें ? "

" बाकी आणखी काय राहणार ? जाधव आणि भोंसले यांच्यांतला बेबनाव तेवढा बाकी राहिला. ह्या वेळपर्यंत राणीसाहेबांची शोभा झाली ती व्याजांत; मूळ शिल्लक आहे तेवढी कायम आहे. "

" त्याला आतां कोण काय करणार? मीं जाधवांशीं सलोखा करायचे होते नव्हते तेवढे प्रयत्न केले. मामांच्या हातांपायां पडून तुम्हीं सांगितलें तसें नव्हे त्याहीपेक्षां जास्त विनवून पाहिलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं." बोलतां बोलतां शहाजीराजांच्या चेहऱ्यावर इतका वेळ विलसणारी प्रसन्नता हळूहळू लोपूं लागली व तिथें गंभीरता हळूहळू वाढीला लागली. इतका वेळ त्यांच्या डोळ्यांत रंगेलपणाची लकेर मारत होती ती आतां लुप्त होऊन तिथें रागीटपणाची लाल छटा उमटली. ते दोन पावलें दूर सरून छातीवर वीराला शोभणारें हातांचें विरासन मांडून म्हणाले, " तेव्हां आतां जाधवांशीं सलोखा करण्याचे सर्व सामोपचार संपले. जाधव फत्तेखानाच्या कारस्थानांत सामील होऊन मोंगालांशीं लाळघोटेपणा करून भोंसल्यांना वजीरपदावरून हुसकून लावायला तयार झाले, याचाच अर्थ त्यांनीं भोंसल्यांशीं वैर जगजाहीर केलें.

" पण आपण अखेरचा उपाय—रागवणार नाहीं तर बोलत्यें—बोलूं का ! "

" बोला, काय तें बोला. अखेरचा उपाय कोणता ? ' वजिरी पाहिजे तर तुम्ही करा पण निजामशाहीचें रक्षण करा. मोंगलांना निजामशाहींत हात शिरकूं देऊं नका ' असें मामासाहेबांना सांगायचें हाच ना तुमचा अखेरचा उपाय? "

" हो ! तो एकवार मी म्हणत्यें करून पाह्यचा होता. म्हणजे वजीर जाधव असले काय किंवा भोसले असले काय एकाच्या हातीं सत्ता राहती व दुसरे त्या सत्तेच्या रक्षणासाठीं झटले असते. अशानें परक्या शत्रूला ढवळाढवळ करायला अवसर मिळाला ...ता."

" तो उपायही करून पाहिला मी. "

" तरीही बाबा त्याला कबूल नाहींत ? "

" नाहींत. "

" तर मग ते आणि त्यांचें नशीब ! " जिजाबाई खिन्नपणें कपाळाला हात लावून म्हणाली. " इतकें आपण सांगूनही ज्या अर्थी बाबांची समजूत पडली नाहीं, त्या अर्थी महाराज ! मीं आजवर आपणांला सलोखा करा, सलोखा करा असें सांगून उगाच शिणवलें. यापुढें मी मरेतों आपण जाधवांशीं नमतें घ्या असें सांगणार नाहीं. "

" तेंच—तेंच मी तुम्हांला आतां सांगणार होतों. एका दृष्टीनें जाधव सासरे म्हणून वडील माणूस पडले; पण दुसऱ्या दृष्टीनें हे असे वैरी झाले. आतां वडील माणूस म्हणून गय करावी तर वैऱ्याला पोसल्यासारखें होतें. यासाठीं जाधवाच्या बाबतींत माझें तुम्हांला आज असें निर्वाणीचें सांगणें आहे कीं, यापुढें जेव्हां जेव्हां जाधव—भोंसल्यांचा खासगी संबंध येईल तेव्हां तेव्हां मी मामासाहेबांना वडिलांप्रमाणें मानून त्यांच्या पायांवर डोकें ठेवून त्यांचा मान राखीन. असा संबंध येण्याची आतां मला आशा वाटत नाहीं; तरी ऋणानुबंधाचे धागेदोरे कुठें कसे गुंतलेले असतील याचा काय नेम सांगावा ? पण राजकारणांत मात्र भोंसले व जाधव जेव्हां एकमेकांचे प्रतिस्पर्धी म्हणून सामोरासामोरे येतील, आणि असे प्रसंगच यापुढें हरहमेश यायचे; तेव्हां तेव्हां सासरे—जांवई हें नातें विसरून जाधव भोंसल्यांचें वैरी, निजामशाहीचे गुन्हेगार, मराठमोळ्यांत जन्म घेऊन मराठमोळ्याच्या नाशासाठीं झटणारे बद्नेकीचे हरामखोर असें समजून मला त्यांचें पारिपत्य करावें लागेल. वैरी म्हटला कीं तिथें दया-क्षमा नाहीं. वैरी आडवा आला कीं शक्य त्या उपायांनीं त्याचें पारिपत्य केलेंच पाहिजे. ह्या माझ्या कर्तव्याच्या आड राणीसाहेब ! तुम्ही कधींही येणार नाहीं ना ? "

" नाहीं. महाराज ! मी आपल्या कर्तव्याच्या आड कधींही येणार नाहीं. "

" आणि ह्या झगड्यांत जाधवांचें कांहीं बरेंवाईट झालें तर ? "

" इडा पिडा टळो; अमंगळ दूर पळो ! तसा प्रसंग कधीं न येवो ! " जिजाबाई डोळ्यांत आंसवें आणून उद्गारली.

" तसा प्रसंग आलाच तर ? "

"तर !—तर आपण आपलें कर्तव्य तें करा. तेव्हां मग आपल्या हातून माझ्या बाबांना मरण आलें तर बेहेत्तर ! होऊं नये पण झालेंच तर—माझे जन्मदातेच पडले ते, मला दुःख झाल्याशिवाय कसें राहील ! पण माझें दुःख मी मुकाट्यानें सहन करीन. मी पितृहीन झाल्यें म्हणून रडेन कढेन; पण भोंसल्यांच्या वंशाचें वाटोळें करण्यासाठीं टपून बसलेला एक वैरी जगांतून नाहींसा झाला म्हणून आनंद मानीन. यापुढें आपल्या कर्तव्याला आड मी कधींच यायची नाहीं."

"तशी माझ्या पायांना स्मरून शपथ घ्याल ?"

"ही घेतली शपथ ! ही घेतली !" असें म्हणून जिजाबाईनें पदरानें आंसवें पुशीत पुशीत शहाजीराजांच्या पायांना स्पर्श करून शपथ घेतली, "मी यापुढें जाधवांविषयींच्या आपल्या कर्तव्याच्या आड कधींही यायची नाहीं, याला हे आपले पाय साक्ष आहेत." शपथ घेऊन झाल्यावर जिजाबाईनें विचारलें, "आतां तरी झाली माझी परीक्षा ?"

"हो ! झाली !" शहाजीराजे सर्व राग विसरून जिजाबाईला आलिंगन देण्यासाठीं आपले बाहु पसरून पुढें होत सद्गदित कंठानें म्हणाले, "जिजाऊ ! तुझी कर्तव्यनिष्ठा, तुझ्या मनाचा खंबीरपणा, तुझें धैर्य वगैरे पृथ्वीमोलाचे गुण पाहूनच परमेश्वराला वाटलें असेल कीं ह्या माऊलीच्या पोटीं अवतार घेऊन धन्य व्हावें. जाधव एरव्हीं आम्हां भोंसल्यांच वैरी असले तरी तूं ही साक्षात् लक्ष्मी जाधवांच्या वंशीं जन्मली व ती मला अर्धांगी लाभली हें जाधवांचें ऋण माझ्याकडून जन्मोजन्मीं फिटावयाचें नाहीं, असें वाटूं लागतें. यापुढें आपण जाधव–भोंसले हा वादाचा प्रश्न उच्चारायचा देखील नाहीं."

"नयेच उच्चारूं. मी तरी तेंच म्हणत्यें." शहाजीराजांच्या बाहुपाशांत बद्ध झालेली जिजाबाई एखाद्या अचपळ हरिणीप्रमाणें कांहींशा घाबरलेल्या पण प्रेमळ दृष्टीनें शहाजीराजांकडे पाहात म्हणाली.

"बरें; ह्या दंपत्य-कलहाचा असा गोड शेवट झाला म्हणून आम्हांला एक—" असें म्हणून शहाजीराजांनीं जिजाबाईचे हनुवटीला हात लावून ती हलकेंच वर उचलली तेवढ्यांत त्यांचे ओठ स्फुरण पावूं लागले, त्यांनीं आपल्या बंडखोरीनें राजांची मानही वांकविली.

पण तेवढ्यांत जिजाबाईनें आपला हात राजांच्या तोंडावर ठेवून त्यांच्या ओठांना अडवीत कोमल शब्दांनीं राजांची समजूत केली. "अ हं! असें करूं नये. आज आपणां उभयतांना प्रदोष आहे हें विसरायचें झालें वाटतें ?"

"हो! खरेंच!" असें म्हणून शहाजीराजे आवरतें घेतात तोंच त्यांच्या विश्वासांतील सेवक रघूजी तिथें मुजरा करून आपल्या पायांकडे पाहात म्हणाला, "राजेसाहेब! बेगमसाहेबांकडून जासूद आला आहे."

रघूजीची चाहूल लागतांच जिजाबाई शहाजीराजांच्या आलिंगनांतून एकदम निसटली व अंमळ ओशाळी होऊन दूर उभी राहिली.

"तो जासूद काय म्हणतो ?" शहाजीराजांनीं रघूजीला विचारलें.

"महाराजांनीं भोजन आटोपल्यावर सायंकाळपर्यंत एकदां जरुरीच्या कामासाठीं येऊन भेटावें अशी बेगमसाहेबांची आज्ञा घेऊन आला आहे तो" रघूजी म्हणाला.

"ठीक आहे. येतों म्हणावें." शहाजीराजे उत्तरले.

"अरे! महाराज स्नान-पूजा वगैरे आटोपून-आज त्यांना उपास आहे-फराळ वगैरे करून येतील असें त्या जासूदाला सांग." जिजाबाई म्हणाली.

"जशी आज्ञा!" असें म्हणून रघूजी पुन्हां मुजरा करून बाहेर गेला.

"बेगमसाहेबांचें माझ्यापाशीं आज इतकें जरूरीचें काय बरें काम असेल?" शहाजीराजे स्वतःशींच पण जरा मोठ्यानें बोलले.

"काम कांहींही असले तरी स्वामींनीं सांगितल्याप्रमाणें देवपूजा व श्रीफळाची पूजा करून फराळ केल्याशिवाय बाहेर जायचें नाहीं; प्रवासाचे श्रम फार झाले आहेत,-मी सांगत्यें." असें म्हणून राजांच्या स्नानाची व देवपूजेची वगैरे सिद्धता करून घेण्यासाठीं जिजाबाई बाहेर गेली. राजे तिथेंच कसलासा विचार करीत येरझारा घालीत होते.

प्रकरण सातवें

# बिजली ही कोण ?

"खानसाहेब आंत आहेत का ?"

"नाहींत. कां ?"

"पण घरांत आहेत का ? मला त्यांची भेट घ्यायची आहे."

"आहेत; पण कामांत आहेत. ह्या वेळीं भेट व्हायची नाहीं."

"घरांत आहेत आणि भेट व्हायची नाहीं म्हणजे ? माझें त्यांच्यापाशीं जरूरीचें काम आहे. भेट झालीच पाहिजे."

"म्हणजे तूं माझ्यावर हुकमत गाजवतेस कीं काय ?"

"यांत हुकमत कसली ? माझें खानसाहेबांपाशीं जरूरीचें काम आहे म्हणून म्हटलें."

"पण खानसाहेब जरूरीच्या कामांत गुंतले आहेत; इतक्यांत कुणालाही भेटूं द्यावयाचें नाहीं असा त्यांचा मला सख्त हुकूम आहे."

"हुकूम असला तरी माझी गोष्ट निराळी आहे. पाहिजे तर आतांच मौज पाहा; आंत जाऊन मी आल्यें आहे असें खानसाहेबांना सांग कीं ते हातीं असलेलें काम तसेंच टाकून बाहेर येतात कीं नाहीं तें दिसेल."

"पण तुझें नांव तरी काय ?"

"माझें नांव तुला माहीत नाहीं ? खानसाहेबांकडे कोणकोण माणसें येतात हें देखील तुला जर कळत नाहीं, तर पहारेकरी कशाला झालास ? चल जा ! खानसाहेबांना सांग बिजली आली आहे."

"पण ही बिजली कुठची कोण म्हणून खानसाहेबांनीं विचारलें तर ?" पहारेकऱ्यानें बिजलीकडे भेदक दृष्टीनें पाहात विचारलें.

"ह्या उठाठेवी तुला कुणी सांगितल्या आहेत ? हे मेले देवडीवाले धन्यापेक्षांही चौकस आणि शिरजोर. तुला रे माझ्या ठावठिकाण्याशीं काय करायचें ? समज, मी बेगम आहें. धन्यापेक्षां हे मेले धन्यांचे कुत्रेच जास्त जाचतात ! तूं मुकाट्यानें आंत जाऊन वर्दी देतोस कीं नाहीं ?" बिजलीनें रागाला येऊन विचारलें.

फत्तेखानाचा पहारेकरी आज बदलला होता. नेहमींचा तो विश्वासू सादत-खान पहारेकरी फत्तेखानाच्या कांहीं नाजूक कामगिरीवर गेला असल्यानें ह्या नवीन पहारेकऱ्याची—सुलेमानाची त्याच्या जागीं मुक्काम योजना झाली होती. तो बिजलीच्या ओळखीचा नव्हता. हाच जर सादतखान असता, तर बिजलीला पाहातांच त्यानें न विचारतां न पुसतां आंत पाठवून दिलें असतें. कारण ज्या कांहीं ठराविक माणसांना मध्यरात्रीच्या वेळींही न विचारतां न सवरतां आंत सोडावयाचें अशी त्याला फत्तेखानाची सक्त ताकीद होती, त्या ठराविक माणसांत बिजलीचें नांव होतें. फत्तेखानाशीं बिजलीचें इतकें वजन होतें कीं मध्यरात्रीला जरी ती त्याला भेटायला गेली तरी तिला खानाच्या वाड्यांत मुक्तद्वार असायचें. खान जरी आपल्या रंगमहालांतील रंगविलासांत गढून गेला असला किंवा झोंपीं गेला असला तरी पहारेकऱ्यानें बिजली केव्हां येईल तेव्हां खानाला वर्दी द्यायचीच व खान तसाच उठून बिजलीची भेट घ्यायचा. खान एकाद्या महत्त्वाच्या कामांत गुंतला असला तर कधीं कधीं त्याच्या बेगमेलाही त्याची भेट घेण्याची बंदी असे. पण बिजली आली कीं तिची भेट खानानें कोणत्याही परिस्थितीत झटकून घ्यावीच. इतकें खानापाशीं बिजलीचें वजन आहे हें पहारेकऱ्यांना व इतर दरोबस्त नोकर–चाकरांना माहीत असल्यानें ' समर्थाच्या घरचा श्वान, त्यासी सर्वही देती मान ' ह्या न्यायानें दरोबस्त लोक बिजलीशीं अत्यंत अदबीनें वागत. हा यःकश्चित् पहारेकरी आपणाला मज्जाव करतो असें पाहातांच बिजलीच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबल्यास नवल नाहीं.

बरें; सुलेमान वागला तोही खानाच्या हुकुमाबरहुकूम वागला. तो नुक्ता आजपासूनच पाहाऱ्यावर आला होता व अलीकडे खानाच्या वाड्यांत अत्यंत महत्त्वाच्या राजकारस्थानांचा खल जेव्हां तेव्हां सुरू असल्यानें कोणीही आला तरी त्याला भेटूं द्यावयाचें नाहीं असा खानाचा सुलेमानाला सख्त हुकूम होता. त्या हुकुमाची तामिली करतांच ही बाई इतक्या अपमानास्पद भाषेंत आपणाला बोलली, याबद्दल सुलेमानाला अत्यंत चीड आली. पण करतो काय ! ताबेदारी पडली ! बिजलीला पाहातांच त्याला कांहीं संशय आला. हिला कुठें तरी पाहिलें असावें असें त्याला वाटलें. पण रूपाचें साम्य आठवणींत जुळलें तसें नांवाचें कांहीं जुळेना. तरीपण त्यानें तिचें रूपही

ध्यानीं ठेवलें व नांवही ध्यानीं ठेवलें. एवढें मात्र त्याला खास वाटलें कीं, ही खानाचें प्रियपात्र तरी खास असेल. आतां तिनें जर खानापाशीं आपल्या विरुद्ध चुगली केली तर निष्कारण आपल्या पोटावर पाय यायचे, ह्या भयानें त्यानें मनांत जळफळत असतांही एकवार झालेल्या प्रकाराबद्दल बिजलीची माफी मागितली व ताबडतोब आंत जाऊन खानाला बिजली आल्याची वर्दी दिली.

खान या वेळीं सालरजंग, मोहबतखान हे दोघे सरदार व दुसरे दोघेतिघे मुसलमान यांच्याशीं खलबतें करीत बसला होता, तो 'बिजली' आल्याची वर्दी मिळतांच क्षणभर 'ही बिजली कोण' अशा घोटाळयांत पडला; पण लगेच कायसें आठवून स्वतःशीं हंसत तसाच बाहेर आला. खानाच्या ह्या चाळ-वणीवर सुलेमानाचा डोळा होता. सकाळपासून चार दोन मोठीं मोठीं माणसें खानाच्या भेटीला येऊन गेलीं, त्यांपैकीं दोघांची भेटच घेतली नाहीं, व सालरजंग आणि मोहबतखान हे सरदार भेटीला आले तरी तो त्यांना सामोरा आला नाहीं, हें सुलेमानानें पाहिलें होतें. तोच खान बिजली आल्याचें कळ-तांच चटकन उठून बाहेर आला असें पाहातांच ही बिजली अशी मोठी कोण बादशहाची बेगम लागून गेली आहे म्हणून इतकी चमकते, तें जाण-ण्याची सुलेमानाला सहाजिकपणेंच उत्कंठा लागून राहिली. सुलेमानाची ही उत्कंठा वर वर दिसायला जितकी साधी होती तितकी अंतरंगांतून साधी नव्हती. सुलेमान आठ दहा दिवसांपूर्वी खानाच्या पदरीं नोकरीला राहिला, तो शहाजीराजांनीं आपल्या सैन्यांतून संशयानें हाकलून दिलेला शिपाई गडी पोटाला मिळविण्याची दुसरी सोय नाहीं म्हणून राहिला. ही नोकरी मिळ-विण्यासाठीं त्याला खानासमोर शहाजीराजांवर शिव्यांची लाखोली वाहावी लागली, व खानानेंही त्याचे इतर कोणतेही गुण न पाहातां केवळ त्याच्या ठायीं वसणारा शहाजीराजांविषयींचा दीर्घ द्वेष पाहूनच त्याला आपल्या पदरीं शहाजीराजांकडील कारस्थानांचा भेद आणण्याच्या कामगिरीवर ठेवून दिलें. शहाजीराजांकडील नोकरीला लागल्या दिवसापासून आजवर सुलेमानानें महत्त्वाची अशी कांहींच बातमी खानाला दिली नव्हती हें खरें; तरी पण राजांच्या अवास्तव नालस्तीवर तो वेळ मारून नेई, व खानही त्यावर खुश असे. सुलेमान पुढें काय काय पराक्रम करील याचा विचारदेखील न करतां

खान त्याला—तो ज्या अर्थी शहाजीराजांचा कट्टा दुष्मन, त्याअर्थी आपला दोस्त—आपल्या विश्वासांतील सेवक म्हणून ओळखीत होता. म्हणूनच आज सादतखानाच्या ऐवजीं पहारेकऱ्याच्या जबाबदारीच्या कामावर त्याची खास नेमणूक झाली होती. पहारेकऱ्याचें जबाबदारीचें काम असें कीं, खानाकडे रोज रोज नवे नवे कारस्थानी लोक येणार, मोठमोठीं कारस्थानें चालणार, त्या सर्वांची नांव निशीवार बित्तंबातमी प्रथम पहारेकऱ्याला मिळणार! पहारेकरी जर इतका विश्वासांतील नसेल तर रोज कोण आले कोण गेले व काय काय कारस्थानें झालीं यांचा मोकाट बभ्रा होण्याचा संभव फार!

पण हा सुलेमान पहारेकरी इतर पैहारेकऱ्याहून अगदीं निराळा होता. पहारेकऱ्याचें काम फक्त पहारा करण्याचें, कोण येतील त्याची वर्दी खानाला देऊन आंत सोडण्याचें आणि ते कोण जातील त्यांना जाऊं देण्याचें. पण हा पहारेकरी तेवढ्याच कामावर संतुष्ट नव्हता. खानाकडे नोकरीला राहिल्या-पासून तों पहारेकरी होण्याच्या पूर्वीपासूनच खानाकडे कोण येतात व कोण जातात, ते खानाशीं काय काय खलबतें करतात वगैरे गोष्टीवर अत्यंत दक्ष-पणें नजर ठेवी. येणाऱ्या जाणाऱ्या लोकांचे चेहरेही नीट न्याहाळून ठेवीत असे. त्यांतल्यात्यांत आज बिजलीचा चेहरा तर त्यानें विशेष लक्षपूर्वक न्याहाळून ठेवला.

फत्तेखान बाहेर येतांच बिजलीनें जर पहिली गोष्ट कोणती केली असेल, तर ती सुलेमानविषयीं खानापाशीं तक्रार करण्याची. ती सुलेमानाकडे पाहात कपाळाला आंठ्या घालून म्हणाली, " खानसाहेब! हा कोण आडदांड पहारेकरी तुम्हीं ठेवला आहे ? "

" कां ? काय झालें ? " खानानें विचारलें.

" मीं त्यास सांगितलें, खानसाहेबांना मला भेटायचें आहे, तर उगाच तूं कोण तुझें खानसाहेबांपाशीं काम काय, असली चांभारचौकशी करीत बसला! नोकरमाणसांना काय, पायांवर पाणी ओत म्हटलें तर त्यानें पायांवर पाणी ओतावें, सांखळ्या केवढ्याच्या असें विचारांत बसण्याची गरज काय ? "

बिजली खरोखरच नांवाप्रमाणें कडाडूं लागलेली पाहून सुलेमान कांहींसा ओशाळा झालेला होता. पण तो नशिबाचा थोर त्यामुळें खान त्याला कांहीं

रागावून बोलला नाहीं. उलट हंसत हंसत बिजलीला म्हणाला, "वा: ! तर मग त्यानें फार छान कामगिरी केली म्हणायची !"

" ही कसली जळली कामगिरी ? माणूस कोण कसें आहे, कोण कशा-साठीं येतें, हें जर चेहऱ्यावरून ओळखतां आलें नाहीं, तर तो कां माणूस ? समजा, आतां यानें मला आंत येऊं दिलें नसतें व आपणांला मीं आल्याची वर्दीही देऊं दिली नसती, तर मला असेंच मागच्या पावलीं मागें जावें लागलें असतें. मग कामाचा घोंटाळा झाला नसता काय ? "

"शांत हो ! शांत हो ! अस्मानकी बिजली, मेरी प्यारी, शांत हो !" खान बिजलीच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत म्हणाला, " परक्या माणसाला मी कामांत असतांना मुळींच आंत पाठवूं नको अशी मींच त्याला सक्त ताकीद देऊन ठेवली आहे. कारण मीं असें ऐकलें आहे कीं, अलीकडे शहाजींचे अनेक गुप्त हेर निरनिराळ्या वेशांनीं जिकडे तिकडे हिंडत असतात. त्यांतला एखादा बदमाश माझ्या वाड्यांत शिरायचा व माझ्या गळ्याला फांस लावायचा ! कारण बेगमसाहेबांचा अजून माझ्यावर बसावा तितका विश्वास बसलेला नाहीं. त्या नुकत्या कुठें माझ्या आहारीं येत आहेत. पण माझ्या व त्यांच्या सुलेहांत बिब्बा घालण्याचे शहाजीचे प्रयत्न सुरूच आहेत "

" पण मी तर शहाजीराजाची बातमीदारीण नाहीं ना ?" बिजलीनें एक मुरका मारून विचारलें, " मात्र फलाणी बाई आली तर तिला आंत सोड असें रानदांडग्याला तुम्हीं सांगून ठेवायचें होतें."

" बरें आतां सांगून ठेवतों, मग तर झालें ? " असें तिला सांगून खान सुलेमानकडे वळून म्हणाला, " सुलेमान ! यापुढें बिजली केव्हांही आली तरी तिला थेट माझ्यापाशीं आणून सोडायचें "

" जसा आपला हुकूम " सुलेमान कुर्निसात करून म्हणाला.

" बरें, पण आज कांहीं विशेष खबर ?" खानानें बिजलीला विचारलें, " राजे आले का ? "

" हो ! आले."

खानाचा प्रश्न व त्याला मिळालेलें बिजलीचें उत्तर ऐकून सुलेमानला काय वाटलें नकळे. त्याची चर्या एकाएकीं गंभीर झाली. तो भेदक दृष्टीनें खान व बिजली यांच्याकडे बराच वेळ टक लावून पाहात उभा राहिला. तो

आपणाकडे संशयी मुद्रेनें पाहात आहे असा बिजलीला संशय आल्यामुळें कीं काय, ती सुलेमानकडे पाहात खानाला म्हणाली, " पण हा तमचा पहारेकरी—"

" त्याच्याविषयीं तुला मुळींच संशय घ्यायला नको." खान मान डोलवीत म्हणाला, " तो माझा विश्वासांतील माणूस आहे."

" असें ? "

" होय. तो पूर्वी शहाजींच्या पदरीं सैन्यांत नोकर होता. पण शहाजीनें त्याला अन्यायानें नोकरीवरून काढून टाकलें; म्हणून तो माझ्या पदरीं आला. त्याचा आपणांला बातम्या काढण्याच्या कामीं फार उपयोग होणार आहे. तुला काय बोलायचें तें तूं अगदीं निर्भयपणें बोल सांग काय बातमी आहे?"

" राजेसाहेब शिंदखेडला गेले होते. तिकडून ते सासऱ्याशीं भांडून आले."

" तें तर ठरलेलेंच होतें. ज्या गोष्टी जगजाहीर आहेत, त्या सांगण्यांत कांहीं चातुर्य नाहीं."

" पण जरा धीरानें ऐकाल तरी कीं नाहीं ? आणखी एक अत्यंत महत्त्वाची बातमी आहे."

" मग सांग काय ती. "

" राजेसाहेब व राणीसाहेब यांच्या उदरीं छत्रपति अवतार घेणार म्हणून आपण ऐकत होतों ना ? तें खरें. राणीसाहेबांना तसें स्वप्नही पडलें व एका साधूनें त्या उभयतांना आज एक श्रीफळ आणून दिलें आहे. तें त्यांनीं भक्षण केलें, म्हणजे राणीसाहेबांच्या उदरीं छत्रपति जन्मतील."

" असें काय ? ठीक आहे." खान म्हणाला. " राणीसाहेबांना दिवस तर जाऊं देत ! मग आपण पाहूं. बरें, आणखी कांहीं बातमी ? "

" आणखी आज कांहीं बातमी नाहीं. "

" ठीक आहे. बरें; तो साधु कुठें गेला त्याचा कांहीं पत्ता ? "

" छे ! त्याचा कांहीं पत्ता नाहीं. हो खरेंच एक गोष्ट सांगायची विसरल्यें. शहाजीराजांची जिकडे तिकडे इतकी फत्ते कां होते माहीत आहे का ? "

" कां होते ? " खानानें विचारलें.

" त्यांच्यापाशीं मालोजीराजांना देवीनें दिलेली भवानी तलवार आहे. त्या तरवारीच्या जोरावर त्यांची फत्ते होते. "

" तर मग तूं सवडीप्रमाणें एक कर. शहाजीची ती तरवार तेवढी चोरून घेऊन ये. मीं तुला आज साधूनें दिलेलें श्रीफळ आणायला सांगितलें असतें–"

" छे ! तें तर मुळींच साधायचें नाहीं. आतां तरवारीचें मात्र जमलें तर पाहीन. " असें म्हणून बिजली बाहेर निघाली.

बिजली खानाला इतकी प्रिय कां याचा सुलेमानला आतां उलगडा झाला. सुलेमान हा खानाचा नोकर खरा; पण त्याचें अंतःस्वरूप निराळें होतें, हें खानाच्या किंवा दुसऱ्या कोणाच्याही ध्यानीं येणें शक्य नव्हतें. पण तसें कांहीं नसतें, तर सुलेमान प्रत्येक बाबतींत इतका चौकसपणा कशाला दाखविता ? आज बिजली निघून जातांच खान आंत आपल्या साथीदाराशीं इतर खलबतें करण्यासाठीं निघून गेला, तेव्हां सुलेमानाच्या मनांत काय आलें नकळे, तो झपझप पावलें उचलीत बिजलीच्या मागोमाग गेला. त्यानें तिला विचारलें, " बिजली ! खानसाहेबांनीं माझ्या विश्वासूपणाबद्दल तुझ्यापाशीं तारीफ केलीच आहे. आतां यापुढें तूं आणि मी एकमेकांशीं सलोख्यानें वागून एकमेकांना साह्य केलें पाहिजे. तूं शहाजीराजांच्या विरुद्ध कां हें कांहीं मला माहीत नाहीं; पण मी त्यांच्याविरुद्ध असायला कारणें आहेत. तीं खानसाहेबांनीं तुला सांगितलीच. "

" होय. पण मी कांहीं त्यांच्याविरुद्ध नाहीं ! सुलेमान ! तुला माहीत नाहीं. ही माझी नोकरी आहे. तूं नवीन आहेस, खानसाहेबांनीं मला राजांच्या घरच्या बातम्या काढून आणण्यासाठीं नोकरीला ठेवलें आहे. "

" अस्सें ! मग तूं हिंदु कीं मुसलमान ? "

" मी कोण असावी असें तुला वाटतें ? "

" मला वाटतें, तूं मुसलमान असावीस. "

" चुकलास ! साफ चुकलास ! " बिजली हंसत हंसत म्हणाली, " मी हिंदु आहें. "

" तूं हिंदु आहेस ? सुलेमान स्वतःशीं आंतल्या आंत रागानें पुटपुटत पण बाह्यात्कारी हंसत हंसत म्हणाला, " तर मग तूं शहाजीराजांविरुद्ध कां ? आजकाल तुमचे इकडचे हिंदु पाहावें तों राजांना देवासारखे मानतात."

" तें खरें; पण माझ्याशीं राजांची करणी सैतानासारखी झाली. राजांनीं माझ्या संसाराचा सारीपाट उधळून लावून मला राखेंत बसविलें आहे. त्याचा मी सूड घेणार ! मी राजांच्या संसाराचा सारीपाट असाच उधळून लावणार !"

" कां ग ? एवढें राजानीं तुझें काय घोडें मारलें ? "

" काय घोडें मारलें ! " बिजली गतगोष्टींची आठवण झाल्यानें एकदम इंगळीसारखी लाल होऊन म्हणाली, " सुलेमान ! त्या गोष्टी सांगून काय करूं ? "

" अग, तूं आणि मीं समदुःखी आहों म्हणून विचारतों."

" तुलादेखील राजानीं आपल्या सैन्यांतून नोकरीवरून काढलें ना ? "

" होय. "

" मग राजांच्या सैन्यांत हिरोजी कदम नांवाचा एक बारगीर आहे, तो तुला माहीत आहे ? "

" होय माहीत आहे. पण त्याच्याशीं तुझा काय संबंध ? " सुलेमाननें विचारलें. हा प्रश्न विचारतांना त्याची दृष्टि जास्त चौकस बनली.

" पण हें कुणाला सांगायचें नाहीं. "

" मी कशाला कुणाला सांगायला जातों ? "

" खानसाहेबांनासुद्धां सांगायचें नाहीं. "

" नाहीं सांगायचा ! "

" ऐक तर. पांच वर्षांपूर्वी—मी तेव्हां पंधरा सोळा वर्षांची होत्यें. त्या हिरोजीच्या घराण्याचा व आम्हां शिंद्यांचा घरोबा फार. आम्ही वेरूळचे राहाणारे. माझ्या बाबांचें हिरोजींच्या वडिलांशीं—संताजी कदमाशीं शेतवाडीमुळें उत्पन्न झालेल्या कसल्याशा वादावरून वांकडें होतें. राजांनीं तेव्हां संताजीची बाजू उचलून धरून आम्हांला पाण्यांत पाहावें. हिरोजी व मी एका खेळीमेळीचीं मुलें. आम्ही लहानपणापासून एकत्र खेळत असूं. तेव्हांपासून आम्ही एकमेकांना आवडूं लागलों होतों. माझ्या बाबांची तेव्हां अशीही इच्छा होती कीं, माझें व हिरोजीचें लग्न झालें तर उत्तम. त्यासाठीं ते संताजीशीं सलोखा करायलाही तयार होते. पण संताजीला तें पसंत नव्हतें. तो म्हणाला, ' आम्ही कदम केवढे थोर जातकुळीचे मराठे ! आम्ही शिंद्यांशीं सोयरीक करावी म्हणजे काय बिशाद आहे ? ' असा संताजीनें माझ्या बाबांचा अपमान केला.

तो त्यांना सहन झाला नाहीं. त्यांनीं राजांपाशीं ते गांवचे प्रमुख पाटील म्हणून तक्रार केली. पण राजांनींही संताजीच्याच शब्दाला मान्यता दिली. शेवटीं आमचें लग्न मोडलें. पुढें बाबा शिंदखेडला जाधवरावांच्या पदरीं नोकरीला गेले, तेव्हां हा आपल्यांतला माणूस फितूर झाला म्हणून राजांनीं त्याला पकडून आणून राखेचे तोबरे देऊन जिवें मारलें! राजांनीं माझ्या बाबांचा असा घात केला. त्याचा सूड मला घ्यायचा आहे."

"पण हिरोजीचें पुढें काय?" सुलेमानानें उत्सुकतेनें विचारलें.

"त्याचें काय?" बिजली डोळ्यांत आंसवें आणून म्हणाली. "मीं त्याला तेव्हां सांगितलें, तुझें माझ्यावर जर खरें प्रेम असेल तर तूं राजांची नोकरी सोडून जाधवरावांच्या पदरीं चल. तिथें राजे पकडतील असें भय वाटत असेल तर विजापूरच्या आदिलशाहींत चल. आपण मग लग्न करूं व सुखानें राहूं. पण तो मेला कसला बावळट! त्याला आपल्या बापाचा शब्द मोडवेना व राजांच्या ठायींची निष्ठा सोडवेना. त्यासाठीं त्यानें मला स्पष्ट सांगितलें, 'मी राजांच्यासाठीं व माझ्या बाबांच्या शब्दासाठीं तुझ्या प्रेमावर पाणी सोडायला तयार आहें.' तेव्हां त्यानें असेंही कबूल केलें होतें कीं 'मी बाबांचें मन वळवीन, राजांचे मन वळवीन व करीन तर तुझ्याशींच लग्न करीन, नाहींपेक्षां आजन्म अविवाहित राहीन.' तेव्हां आम्ही उभयतांनीं अशा आणाभाका घेतल्या होत्या कीं, करूं तर एकमेकांशीं लग्न करूं नाहींपेक्षां जन्मभर लग्नाची तशीच राहूं. ती आणभाक मीं आजवर पाळली."

"तूं पाळलीस?" सुलेमाननें विशेष उत्सुकतेनें विचारलें.

"हो मी पाळली." बिजली म्हणाली. "मीं देवाधर्माला स्मरून आजवर ती आणभाक पाळली आहे. त्या भेंकडाच्या हातून मात्र ती आणभाक पाळायचें झालें नाहीं. त्यानें अखेर त्याच वर्षीं दुसऱ्या मुलीशीं लग्न केलें, व आतां मोरे शहाजीराजांच्या गळ्यांतला ताईत बनून मजेनें संसार करतो आहे. त्यानें माझा विश्वासघात केला!"

"मग तूं दुसऱ्या कुणाशीं लग्न करायचें होतेंस!"

"नाहीं. मीं करीन तर हिरोजीशींच लग्न करीन अशी शपथ घेतली होती, ती मीं आजवर पाळली; पण तो मात्र शपथेला जागला नाहीं."

" त्याला जर कळलें असतें, तुझें आपल्यावर इतकें निःसीम प्रेम आहेसें, तर त्यानेंही मग कशाला दुसऱ्या मुलीशीं लग्न केलें असतें ! त्याला वाटलें असेल, तुझा बाप तुझें दुसऱ्या एखाद्या तरुणाशीं लग्न करून देणार; म्हणून त्यानेंही लग्न केलें. "

" हें तुला रे काय माहीत ? "

" मला माहीत, मला हिरोजीनें सांगितलें म्हणून. "

" हिरोजीनें आणखी माझ्याविषयीं काय काय तुला सांगितलें ? " बिजलीनें उत्सुकतेनें विचारलें.

" त्याच्याशीं तुला काय करायचें आहे ? " बिजली इतकी नरम आलेली पाहून तिला आणखी नरम आणण्याचें मनाशीं ठरवून सुलेमान म्हणाला.

" नाहीं पण; तो काय म्हणाला तें सांग तरी ! "

बिजली फारच गयावया करूं लागली. तेव्हां सुलेमान म्हणाला, " त्यानेंच मला सांगितलें कीं, तुमचें लग्न मोडल्यावर तुझा बाप तुला त्याच्याशीं भेटू देखील देत नसे. "

" तें खरें. पुढें ? "

" त्यानें तुझें दुसऱ्याशीं लग्नदेखील ठरविलें होतें. होय ना ? "

" होय. तेंही खरें. "

" मग ? तुझें त्याच्याशीं लग्न झालें नाहीं का ? "

" नाहीं. लग्न रे कसें होईल ? बाबा माझें ऐकेनात; मी लग्न करायला तयार नाहीं असें सांगितलें तरी कोणीही माझें ऐकेना. तेव्हां मीं मग युक्ति केली. प्रथम आजारीपणाचें सोंग केलें; आणि नंतर जीव देण्याचें सोंग केलें. "

" काय ? म्हणतेस काय तूं ? खरें हें ? "

" हो ! खरें. आज चार वर्षें झालीं. मी कांहीं जिवंत नाहीं. बाबांचा माझें लग्न करण्याचा आग्रह पाहून ' जीव द्यायला जात्यें ' असें सांगून मी जी घरांतून बाहेर पडल्यें, ती कायमचीच बाहेर पडल्यें. एकुलती एक मुलगी मी बाबांची; मी गेल्यें असें पाहून ते अत्यंत दुःखी झाले व तीर्थयात्रेला निघून गेले; त्यांचा आजवर पत्ता नाहीं. "

" मी इतके दिवस गांवोगांव हिंडून माझ्या बाबांचा शोध केला; पण फुकट. अखेर माझ्या मनानें घेतलें, आपल्याला तर आपल्या उभ्या आयुष्यांत

सुखाची आशा नाहींच; आतां आपणाला असें राखेंत बसवणाऱ्या शहाजी-राजांचा तरी सूड घ्यावा. माझ्या वंशांची वेल त्यांनीं खुडली तशी त्यांच्या वंशाची वेल आपण खुडावी. माझ्या तोंडी त्यांनीं माती घातली तशी त्यांच्या तोंडीं आपण माती घालावी. असा निश्चय करून मी आजवर इतके दिवस शिंदखेडला जाधवरावांच्या घरीं कुणबीण म्हणून राबत होत्यें बरें ! कुणबीण म्हणून ! मनांतला हेतु हा कीं, अगदीं पहिल्यापासून जिजाबाई राणीसाहेब संभाजीच्या वेळीं गरोदर असतांना त्या पहिल्या बाळंतपणासाठीं माहेरीं येतील व मी काय पाहिजे तें करून त्यांचा मुलगा मारीन, असा माझा डाव होता. पण तो फसला. जाधवरावांचें व शहाजीराजांचें वैर असल्यानें त्या बाळंत-पणाला आल्याच नाहींत. पुढें त्या सासरे–जांवयाचें आज सख्य होईल, उद्यां होईल, आणि जिजाबाई राणीसाहेब एकदां तरी माघारपणासाठीं येतील अशी सारखी परवांपर्यंत वाट पाहिली. त्या एकदांच्या दोन महिन्यांपूर्वीं माहेरीं आल्या. पण तेव्हां कांहीं माझ्या मनांतले बेत साधले नाहींत. पण मी एक मात्र साधलें. मी तेव्हां जिजाबाई राणीसाहेबांची सेवाचाकरी करून त्यांच्यावर असें वजन पाडलें कीं, त्यांना माझ्या वांचून करमूंच नये. त्यांच्या संभाजी-राजांना तर माझा इतका लळा लागला कीं, आई वेळीं जवळ नसली तरी चालेल, पण मी जवळ पाहिजे. इतका त्यांना माझा लळा लागल्यावर इकडे दौलताबादेला जेव्हां राणीसाहेब यायला निघाल्या, तेव्हां मला मुलासाठीं म्हणून आपणाबरोबर बोलवायला लागल्या. पण म्हाळसाबाईंची जिव्हाळ्याची दासी मी, त्या कांहीं मला सोडीनात. माझ्या मनांतून तर राणीसाहेबांबरोबर इथें यायचें होतें. कारण मला सूड उगवायचा होता. पण मालकीणच नको म्हणायला लागल्यावर माझें तिथें काय चालणार ! पण देव माझा पाठीराखा होता. राणीसाहेब इकडे आल्या. आठ दिवस झाले, पंधरा दिवस झाले, महिना झाला, आणि राणीसाहेबांकडून शिंदखेडला नोकर निकडीचा निरोप घेऊन म्हाळसाबाईपाशीं आला कीं, संभाजीराजांनीं हाय घेतलें आहे, ते अंथरूणाला खिळले आहेत. असा जेव्हां तिकडचा निरोप आला, तेव्हां म्हाळसाबाईंना मला इकडे पाठवणेंच भाग पडलें. मला त्यांनीं कायमचीच राणीसाहेबांना आंदण दिली म्हणेनास ! तेव्हांपासून आज आठ दिवस झाले मी इकडे आल्यें ती राणीसाहेबांच्या तैनातींतच आहें.''

" आणि खानसाहेबांशीं तुझी दोस्ती कधीं जमली ?"

" दोस्ती कसली ? मी मुळीं शिंदखेडाहून दौलताबादेला आल्यें ती राजांवर सूड घेण्याच्या इराद्यानेंच आल्यें. तिकडे असतांनाच मला ह्यांच्या भानगडी कळल्या होत्या. एकदां खानसाहेब राजांच्या विरुद्ध कारस्थानें रचण्यासाठीं शिंदखेडला आले होते. राजांचा नाश करायच्या कामीं त्यांचा अनायासें उपयोग होईल अशी माझी खात्री असल्यामुळें मीं ज्या दिवशीं इथें आल्यें, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं खानसाहेबांना भेटून त्यांना राजांच्या घरच्या बातम्या पुरविण्याचें काम मी आपखुशीनें पत्करलें. शिवाय मी शिंदखेडाहून निघालें तेव्हां जाधवरावांनींही मला हें काम गुपचुप सांगितलें होतेंच."

" काय ? जाधवरावांनीं काय सांगितलें होतें ? जाधवरावांच्या मनांतून देखील शहाजीराजांचा फडशा व्हावा असें आहे ?"

" वेडा तर नाहींस तूं ? अरे ! तसें कसें त्यांच्या मनांत असेल ? त्यांच्या मनांत शहाजीराजाचा कोणीकडून तरी नक्षा उतरावा, त्यांच्याकडची वजिरी जावी व ती आपणाला मिळावी; निदान वजिरी मिळणें शक्य नसेल तर राजांच्या सकट निजामशाही बुडाली तरी बेहेत्तर एवढेंच त्यांना वाटतें. सध्या त्यांचे व खानसाहेबांचें मिळून राजांच्या विरुद्ध दिल्लीच्या मोंगल बादशहाला सामील होऊन सर्वांनीं मिळून निजामशाहीवर चालून येण्याचे बेत चालले आहेत. त्याबाबत राजांच्या गोटांत काय काय खलबतें चालतात तीं बारकाईनें ऐकून खानसाहेबांना कळवायचीं एवढेंच माझें काम आहे."

" पण खानसाहेबांना तूं नीट ओळखतेस ना ?" सुलेमाननें एकवार आपलें संभाषण कोणीं ऐकलें कीं काय तें पाहाण्यासाठीं सभोंवार पाहिलें व कोणी ऐकत नाहीं अशी आपल्या मनाची खात्री करून घेऊन विचारलें, " अर्थात् असा प्रश्न मी तुला विचारायचा नव्हे. कारण मी खानसाहेबांचा नोकर पडलों. ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी हा सेव्य-सेवक न्याय मला कळतो. शिवाय शहाजीराजांचा सूड घ्यावा अशी तुझ्याप्रमाणेंच माझीही इच्छा आहे. पण तूं आतां जें सांगितलेंस, त्यावरून तूं खरीखरी पतिव्रता—नव्हे, चुकलों, पवित्र कुमारिका आहेस अशी माझी तुझ्या आतांच्या बोलण्यावरून खात्री झाली आहे. थोडया वेळापूर्वी तूं प्रथम मला भेटलीस तेव्हां माझा तुझ्याविषयीं अगदीं निराळा ग्रह झाला होता. मघाशीं

खानसाहेबांनीं बोलतां बोलतां तुला 'प्यारी' म्हटलें आणि तूं तें सहन केलेंस, तेव्हां तो माझा ग्रह बळकट झाला होता पण—"

"पण तुझा ग्रह काय झाला होता?"

"तें आतां कशाला बोलूं? तो ग्रह खोटा होता असें आतां माझें मत झालें आहे यांत काय तें समज."

"पण तुझा ग्रह काय झाला होता तें तर सांग ना?"

"छे! तें विचारूं नकोस. सध्या तरी स्त्रियांविषयीं वाईट कोणी बोलूं नये. तुझें शील किती उज्ज्वल आहे याविषयीं माझी आतां खात्री झालेली आहे. आतां उगाच उच्चारूं नये तें वाणीवाटे उच्चारून मी पापाचा धनी होऊं इच्छीत नाहीं. मला तुझ्या ह्या पवित्रतम पतिभावनेबद्दल अत्यंत अभिमान वाटतो. मला जर हिरोजी पुन्हा कधीं भेटला, तर त्याला मी सांगेन—त्याच्या तोंडांत चांगलें शेण घालीन कीं मूर्खा! थूः तुझ्या मर्दपणावर व माणुसकी-वर! तुझ्या नांवानें बिजली—"

"बिजली नव्हे, गोमती. बिजली राजाच्या वाड्यांतून बाहेर पडल्यापासून वाड्यांत परत जाईपर्यंत-राजांच्या नाशाच्या कारस्थानाचीं सूत्रें हालविणारी ती बिजली. ती तेव्हां इतर जगाला ओळखीत नाहीं. बिजली जगाची नाहीं व जग बिजलीचें नाहीं. हिरोजी बिजलीला ओळखणार नाहीं; गोमतीला ओळखील. बिजली हें नांव तुझ्या माझ्यापुरतें, खानसाहेबांशीं संबंध माझा येतो, तेवढ्यापुरती मी बिजली, नीट लक्षांत ठेव."

"बरें; गोमती. मी हिरोजीला सांगेन कीं गोमती तुझ्या नांवानें रडत बसली आहे व तूं मात्र तिच्याशीं विश्वासघात करून इकडे नवी बायको करून संसारांत मारे मजा मारीत बसला आहेस. हिरोजी मला भेटूं दे तर खरा! मग पाहा त्याचे कसे खासे कान उपटतों ते! पण मी जें तुला आतां विचारलें, खानसाहेबांना ओळखतेस का, तें एवढ्यासाठीं कीं, तूं इतकी तरणीताठी, तशांत रूपवान, तशांत अजून लग्नाची, आणि खानसाहेब पडले मुसलमान. तशांत स्त्रियांच्या बाबतींत ते सज्जनपणानें वागतील असें मला वाटत नाहीं. म्हणून विचारलें."

बिजलीला सुलेमानच्या तोंडचे हे नीतिधर्माचे बोल ऐकून मोठा अचंबा वाटला. ती म्हणाली, "सुलेमान! तूं मुसलमान. तुम्हां मुसलमानांत पाति-

व्रत्य ही भावनाच सहसा आढळायची नाहीं. तुमच्या धर्मांत वाटेल त्या पुरुषाला वाटेल त्या स्त्रीशीं लग्न करायला मोकळीक आहे. बाजारबसव्या बायकांशीं लग्न लावायलाही तुम्हीं मुसलमान कमीपणा मानीत नाहीं. आणि तूं माझ्या—एका हिंदु स्त्रीच्या पावित्र्याचें एवढें कौतुक करावेंस, तिच्या अब्रूला एवढें जपावेंस ! छे ! हे कांहीं बाबा ! कडव्या मुसलमानाला साजेसे बोल तुझ्या तोंडून निघाले नाहींत. हिंदु म्हणजे काफीर ! त्या काफीराच्या जातींतील स्त्रीशीं इतकी सभ्यतेची तुझी वर्तणूक आहे, हें पाहून मला आतां संशय येऊं लागला आहे कीं, तूं कांहीं खरा मुसलमान् नसावास. खरें सांग, तूं खराखुरा मुसलमान आहेस का ! ”

ब्रिजलीचा प्रश्न अगदीं साधा होता. पण तो ऐकून त्याचें उत्तर देतांना मात्र सुलेमान मनांतून अगदीं गोंधळून गेला. जणूं काय तूं खरा मुसलमान आहेस का ह्या प्रश्नानें त्याच्या काळजाला हात घातला. पण त्या मनांतल्या गोंधळाचा मागमूसदेखील बाहेर दिसूं न देतां तो उत्तरला, “ होय. मी मुसलमान आहें.”

“ पण तूं खरा मुसलमान आहेस का ? ” ब्रिजलीनें सुलेमानच्या चेहऱ्याकडे लक्षपूर्वक पाहात विचारलें.

“ खरा मुसलमान म्हणजे कसा ? ” सुलेमाननें जास्तच गोंधळांत पडून विचारलें.

ब्रिजली सुलेमानच्या कानांकडे निरखून पाहात म्हणाली, “पाहूं रे तुझे कान पाहूं ! ”

आतां मात्र कसोटीची वेळ आली. सुलेमाननें ओळखलें कीं, आपले कान टोंचलेले आहेत हें ब्रिजलीनें ओळखलें. तो म्हणाला, “ तूं माझ्या कानांकडे काय पाहाणार ? ते टोंचलेले आहेत म्हणून तुला संशय आला असेल. पण त्याचें कारण असें कीं, मी माझ्या आईला उतार वयांत झालेला नवसाचा मुलगा आहें. मुलगा होईना, म्हणून माझ्या आईनें सारे पीर, सारे फकीर व सारे दर्गे भजून पार पाडले. पण ते नवसाला पावेनात तेव्हां जेजुरीच्या खंडोबाला नवस केला खंडोबा तुमचा हिंदूंचा देव, म्हणून आईनें माझे हिंदूसारखे कान टोंचले.”

बिजली हें ऐकून फक्त हंसली. त्यावरून सुलेमाननें ओळखलें कीं, हिचा आपल्या बोलण्यावर विश्वास बसत नाहीं. त्यानें आपली संशयनिवृत्ति करून घेण्यासाठीं बिजलीला हंसण्याचें कारण विचारलें. ती उत्तरली, "सुलेमान! आमच्या हिंदूंच्या चालीरीति तुझ्यापेक्षां मला जास्त माहीत आहेत. पण तूं कोणी का असेनास! मला त्याच्याशीं काय करायचें आहे!"

"असें कसें? मुसलमानांत झालीं तरी सज्जन माणसें नसतात कीं काय?" सुलेमाननें ओशाळल्यासारखें होऊन विचारलें.

"असतात तर! मी तुझ्यासारखा मुसलमान प्रत्यक्ष डोळ्यांसमोर पाहात आहें, मग नाहीं कशी म्हणेन? तें राहूं द्या." बिजली सुलेमानाच्या डाव्या कानाच्या पाळीकडे—की त्या पाळीवर असलेल्या काळ्याभोर तिळाकडे नकळे—लक्षपूर्वक पण सुलेमानच्या लक्षांत येऊं नये अशा खबरदारीनें चोरून पाहात म्हणाली. "बाकी! तूं खानाविषयीं मला वेळींच सूचना दिलीस हें फार चांगलें केलेंस."

"मीं तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगितली. वास्तविक तिकडे तो खान आणि तूं कांहीं का गोंधळ घालाना! माझें काय जातें? पण तूं आतां हिरोजीचा संबंध सांगितलास, व तो माझा दोस्त पडला. तुला एक गोष्ट खरेंच माहीत नसेल?"

"ती कोणती रे?"

"हिरोजीची बिचाऱ्याची पहिली बायको नुक्ती दोन महिन्यांपूर्वी मेली!"

"खरेंच? ती कशानें मेली रे?" बिजलीनें विशेष उत्सुकतेनें विचारलें. बिजली एवढी चतुर, एवढी धोरणी, पण हिरोजीची बायको मेल्याची वार्ता ऐकून तिला इतका बेसुमार विस्मय वाटला कीं, तो तिनें मनात दाबून ठेवूं म्हटल्यानेंही दाबला जाईना.

सुलेमानला बिजलीचें तेवढेंच वर्म सांपडलें. तो तेवढ्यावरूनच तिला खिजविण्याच्या उद्देशानें म्हणाला, "का बरें? त्याची बायको मेल्यामुळें तुला आनंद वाटला वाटतें?"

"इश्श! मला काय त्यांत आनंद वाटायचा? जगांत कोण मेलें किंवा कोण जन्मलें, तरी त्यांचें सुतकसोयर मला थोडेंच आहे? हिरोजीची एक बायको मेली तर तो दुसरी करील, तो माझ्यासारखा हट्टी थोडाच आहे!"

" आणि समज, तो तुला मागणी घालायला आला तर ? "

" इश्श ! " बिजली रागावल्यासारखें करून म्हणाली. " सुलेमान ! खबदार असलें कांहीं भलतेंसलतें बोलशील तर ! तूं आपला खानसाहेबांच्या देवडीवर जा कसा ! " इतक्यात देवडीवरून खरोखरच सुलेमानला कोणीतरी हांका मारूं लागलें तिकडे बोट करून बिजली म्हणाली, " तें पाहा तें पाहा, कोणीतरी तुला हांक मारतें आहे. जा तिकडे लौकर आणि हें पाहा, मी आतां बोललें यांतला एक शब्ददेखील बाहेर फुटतां कामा नये. जर का फुटला, तर मी खानसाहेबांना खोटेंच सांगेन हा सुलेमान शहाजीराजांचा हेर आहे म्हणून, आणि मग तुझ्या पोटावर पाय येतील."

" आलों ! आलों ! " खानाच्या दरवाजांतून एक नोकर हांक मारीत होता त्याला आश्वासीत सुलेमान बिजलीला म्हणाला, " आणि मग तूं खानाशीं फितूर आहेस असें मला नाहीं का शहाजीराजांना सांगतां येणार ? "

" अरे दगलबाजा ! " बिजली पुढें जाऊं लागलेली फणफणत मागें वळून म्हणाली, " असा तूं असशील हें मला माहीत नव्हतें. मी उगीच मनांतल्या साऱ्या गोष्टी तुझ्यासमोर ओकलें. "

" तें ठीक केलेंस. मीं तुला सांगितलें ना हिरोजी माझा स्नेही आहे, माझा शब्द तो ऐकतो म्हणून ? आतां मीं जर त्याला सांगितलें, तूं बिजलीशीं लग्न कर म्हणून, तर—"

" पुन्हां बिजली ? गोमती म्हण म्हणून सांगितलें ना ? "

" बरें; गोमतीशीं लग्न कर म्हणून मीं जर त्याला सांगितलें तर नाहीं म्हणायची छाती नाहीं त्याची. मात्र जर का त्याला तुझी ही फितुरी कळली तर काय अनर्थ होईल तें मात्र सांगवत नाहीं."

इतक्यांत देवडीवरून पुन्हां हांका येऊं लागल्या, त्यामुळें तेव्हां सुलेमान व बिजली यांना जास्त वेळ बोलत उभें राहणें अशक्य झालें. त्यांनीं पुन्हा रात्रीं याविषयीं बोलण्याचा संकेत करून एकमेकांचा निरोप घेतला. निरोप घेतांना दोघांनाही वाटलें कीं, आपणाला आणखी कांहीं वेळ मनमोकळेपणानें बोलतां येतें तर फार बरें होतें. पण दोघे दोन दिशांना वळल्यावर दोघांनाही वाटलें, आपण बोललों हें मूर्खासारखें बोललों. याची आपल्या धन्यापर्यंत चुगली झाली तर !

प्रकरण आठवें

# बेगम आणि शहाजी

शहाजीराजे स्नान, पूजा वगैरे आटोपून बेगमच्या आमंत्रणाप्रमाणें तिच्याकडे जायला निघाले तेव्हांच त्यांचा डावा डोळा लवत होता. त्यावरून त्यांनीं तर्क केला होता कीं, बेगमेच्या कानांत फत्तेखान वगैरे कोणी तरी विष ओतलें असेल, त्यामुळें ती संशय घेऊन आपणाला कांहींतरी विचारणार. तो त्यांचा तर्क खराच होता. राजे जाऊन पोंचतात न पोंचतात तोंच बेगम आपल्या महालांतून राजे बसले होते त्या दुसऱ्या महालांत आली व पडद्यांत म्हणाली, " वजीर ! तुमच्यावर आमच्या सलतनतीचा सारा भार टाकून आम्ही विश्वासानें बसलों. पण तुम्हीं आमचा कैंसानें गळा कापण्याचा क्रम आरंभिला आहे. "

" तो कसा बेगमसाहेबा ? " शहाजीराजांना विचारलें.

" कसा तें तुम्हांला दाखल नाहीं काय ? तुम्हीं इकडे तर निजामशाहीचे मोठे पक्षपाती म्हणून मिरवितां व आमच्या नजरेआड तिकडे दिल्लीच्या बादशहाशीं दुलंग होऊन आमची निजामशाही बुडविण्याचीं कारस्थानें रचतां ! "

" बेगमसाहेबा ! हा आपण माझ्यावर नुसता आळ घेत आहां. सूर्य पश्चिमेला कधींतरी उगवेल का ? "

" तर मग आमची सारी सलतनत तुमच्या विरुद्ध कां ? "

" बेगमसाहेबा ! सारी सलतनत माझ्याविरुद्ध नाहीं. सलतनतींतील कांहीं विघ्नसंतोषी लोक, ज्यांना शहाजीराजे वजीर असल्यानें अल्पवयी सुलतानाच्या राज्यांत मनाला मानेल तसा धुडगूस घालतां येत नाहीं, तेवढे ते सलतनतीच्या व माझ्याविरुद्ध असतील. बेगमसाहेबा ! आपल्याही नाशावर असेच लोक उठलेले आहेत."

" ते कोण कोण सागा पाहूं ? थेट आमच्या नाशापर्यंत ह्या शत्रूंच्या प्रयत्नांची मर्यादा येऊन पोंचली आहे असें म्हणतां म्हणून आम्हीं विचारतों."

" या वेळीं मी जरी खरें बोललों, तरी बेगमसाहेबा ! आपणांला तें कडू लागण्याचा संभव आहे. त्यांत मग माझेंच अहित आहे. सध्या माझा काळ फिरला आहे. सलतनतीच्या राजकारणाचा वारा अलीकडे विरुद्ध दिशेनें वाहूं लागला आहे."

" वजीर ! असे मोघम बोलूं नका, स्पष्ट काय तें बोला. आमच्यावर तुम्ही हे टोमणे हाणीत आहां—"

" नाहीं. बेगमसाहेबा ! मुळींच नाहीं."

" तर मग ? "

" माझ्याविरुद्ध सध्यां जें सलतनतीच्या हितकर्त्यांचें म्हणून जाळें पसरलें आहे व पसरत आहे त्याला उद्देशून मी हें बोलत आहें. "

" तेंच तेंच आम्ही तरी म्हणतों. आमच्या राज्यांतील अनेक मातबर मनसबदारांनीं तुमच्या वजिरीविरुद्ध आमच्यापाशीं तक्रारी केल्या व त्या आम्हीं ऐकून घेतल्या, म्हणून तुमचा आमच्यावर ठपका आहे. खरें ना ? "

" बेगमसाहेबा ! आपण सलतनतीच्या मालिक पडलां, व मी पडलों आपला वजीर. आपल्या हुकुमाचा बंदा सेवक मी. आपणांला ठपका देण्याचा मला अधिकार काय ? पण जोंपर्यंत मी वजिरीवर आहे तोंपर्यंत सलतनतीच्या भल्याबुऱ्या भवितव्याची जबाबदारी माझ्यावर आहे. ती जबाबदारी ओळखून मी बोलत आहें. कांहीं कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्यांचा माझ्यासारख्या बंद्या सेवकांनीं—आपण आमच्या मालिक—आपणांसमोर उच्चारदेखील करतां कामा नये. पण वेळच अशी येऊन ठेपली आहे कीं, हा शिष्टाचार क्षणभर बाजूला ठेवून मला खरी वस्तुस्थिति आपणांसमोर मांडणें अवश्य आहे. "

" मग बोला ना काय तें ? आम्ही तुम्हांला सांगितलेंच कीं, दिल्लीच्या बादशहापाशीं तुम्ही दुलंग होऊं पाहात आहां असा आमचा तुमच्यावर आरोप आहे. याचा काय तो जबाब द्या. "

" हा आरोप जो आपण माझ्यावर लादूं पाहतां, तो फत्तेखानाच्या सांगीवरूनच ना ? "

" हो ! असेंच धरून चाला. पण एकट्या फत्तेखानाचीच ही तक्रार आहे असें नाहीं; प्रत्यक्ष तुमचे सासरे जाधवरावदेखील त्याच मताचे आहेत. ते तर म्हणतात कीं, शहाजीराजांना सबंध सलतनत बळकावून बसायचें आहे,

व तेवढ्यासाठीं तुम्ही दिल्लीच्या बादशहाशीं संगनमत चालविलें आहे असें त्यांचें म्हणणें."

"बेगमसाहेबा! यालाच चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात. पण जग दिसतें तसें नसतें. आपण नेहमीं आपल्या महालांत असणार—मी जरा स्पष्ट बोलतों याबद्दल माफी असावी—कोणीं काय आपणांपाशीं येऊन सांगणार तें आपणांला खरें वाटणार. पण तें सांगणारांच्या पोटांत काय हेतु असतो याचा आपण कधींच विचार करीत नाहीं. तसा विचार आपणांला करतांही यायचा नाहीं. माझ्यावर फितुरीचा आरोप येण्यापूर्वी आपण एवढा विचार करायला हवा होता कीं, भोंसले आज दोन पिढ्या ह्या सल्तनतीची सेवा करीत आले व मरहूम सुलतानांनी राजकारणाच्या बाबतींत भोंसल्यावरच इतका विश्वास टाकला, तो भोंसले आपण म्हणतां तसे बदनेकीचे होते म्हणून टाकला कीं काय? तेव्हांही जाधवराव होते, व वजीर मलिकंबर वारल्यावर वजिरी आपणाला मिळावी म्हणून ह्याच फत्तेखानानें अनेक कारस्थानें केलीं. व मरहूम सुलतानांनीं त्या भ्रमाच्या भोंवऱ्यांत सांपडून त्याला वजिरी दिलीही होती. पण तेव्हां फत्तेखानानेंच सुलतानांना पदच्युत करून स्वतः सुलतान होण्याच्या आसुरी महत्त्वाकांक्षेच्या आहारीं पडून दिल्लीच्या बादशहाशीं फितुरी चालविली होती. ती फितुरी मींच उजेडांत आणली, व म्हणून फत्ते-खानाला वजिरीला मुकावें लागलें, हें बेगमसाहेबा! आपण विसरलां काय? आणि सुलतानांच्या पश्चात आपण मला वजिरी सांगितली तेव्हां फत्तेखानानें स्वतः वजीर होण्यासाठीं कसे जंग जंग पछाडले हेंही आपणांला मालूम आहेच. फत्तेखान माझ्या नांवानें जळतो याचें कारण माझ्या वजिरातींत त्याला त्याचे मनोरथ साधायला वाव मिळत नाहीं. आणि जाधवराव तरी माझ्या विरुद्ध आहेत याचें कारण त्यांना वजिरी मिळाली नाहीं."

"पण तुमच्या वंशांत छत्रपति जन्माला येणार आहे व तो स्वतंत्र मराठी राज्याची स्थापना करणार आहे. त्याच्यासाठीं तुम्ही दिल्लीच्या बादशहाला सामील होऊन आमची निजामशाही बुडविणार व आज आमचे वजीर आहां ते उद्यां आमचे तख्तच बळकावून बसणार, असें आमच्या कानीं आलें आहे."

" हीच काय, बेगमसाहेबा ! अशा आणखी कितीतरी गोष्टी आपल्या कानीं येतील. आपण बायकोमाणूस पडलां; आपणांला पडद्यांत बसून बाहेरच्या जगाची कल्पना कशी येणार ? आपणांपाशीं स्वतःच्या हीन स्वार्थाला साजून दिसतील अशा दहा दिशांना दहा कंड्या पेटवून द्यायला या आगलाव्यांचें काय जातें ? पण वस्तुस्थिति अगदीं निराळी आहे. "

" ती काय ? "

" आपला माझ्यावर विश्वास असेल तर ते बोलण्यांत शोभा आहे. विश्वास नसेल तर मला आपण तसें स्पष्ट सांगा, म्हणजे मी आतांच्या आतां वजिरीचीं वस्त्रें सुलतानाच्या पायांवर ठेवून आपली रजा मागायला तयार आहें. सांगा बेगमसाहेबा ! आपला माझ्यावर विश्वास आहे काय ? "

" हो ! विश्वास आहे. आतां अविश्वास उत्पन्न होण्यासारख्या गोष्टी कानीं आल्यावर आम्हांला त्याची चौकशी केल्याशिवाय कसें चालेल ? तुमच्यावर आमचा विश्वास आहे. ह्या विश्वासाला पात्र असल्याची तुम्ही आमची खात्री पटवून द्या. "

" बेगमसाहेबा ! तशी वेळ आली कीं, मुद्देमालासह आपली खात्री पटवून देईन. तूर्त खुल्या दिल्यानें व खऱ्या मनानें वस्तुस्थितीची दाखलगिरी आपल्यापाशीं करून ठेवायची म्हणून सांगतों, निजामशाही बुडावी अशी इच्छा माझ्या बाबांनीं—मालोजी भोंसल्यांनींही कधीं केली नाहीं. त्यांचाच मुलगा मी. आतां, आपण आमच्या वंशीं छत्रपति अवतार घेणार अशी वार्ता ऐकली आहे. आपल्या तोंडांत साखर पडो. मात्र जसे माझे बाबा, तसा मी; व तसाच माझा पुत्रही होईल. माझी देखील इच्छा आहे कीं, माझ्या वंशाच्या हातून स्वतंत्र मराठी राज्याची स्थापना व्हावी. बेगमसाहेबा ! निजामशाहीचें छत्र आमच्या मस्तकावर रुळत आहे तोंवरच आम्हांला हातपाय हलवितां येणें शक्य आहे. राज्यच स्थापन करायचें तर तें आम्ही भोंसले मनगटाच्या जोरावर स्थापन करूं, इतकी मर्दुमकी आमच्या मनगटांत आहे. खाल्ल्या घराशीं बेइमान व्हायचें नाहीं एवढी नेकी आमच्या अंगीं आहे. खरा मर्द कधीं बायांबापड्यांना नागवून मिळविलेलें मेलेलें वैभव भोगण्यांत मोठेपणा मानायचा नाहीं. इतकेंच काय; पण बेगमसाहेबा ! आपण जरी मला वजिरीवरून बडतर्फ केलें तरीदेखील

मीं आपल्या सलतनतीचें अनिष्ट चिंतणार नाहीं, ही मजविषयीं खात्री बाळगा. उलट आपल्या कानांत माझ्याविरुद्ध विष ओतणाऱ्या आगलाव्यांच्या अंतःकरणांत ह्या एकंदर कारस्थानाच्या मुळाशीं केवढा जबरदस्त नीच स्वार्थ ठाणें देऊन बसला आहे हें जर मीं आपणांला सांगितलें, तर बेगमसाहेबा ! आपल्या अंगावर कांटा उभा राहील."

"मग सांगाना ! मी ऐकायला तयार आहें. असे अस्तनींतील निखारे कोण कोण आहेत तें तरी कळूं दे ?"

"अशा वेळीं बोलूं नये त्या गोष्टी बोलाव्या लागतात; पण हीं कारस्थानें रचण्यांत खानाचा दुहेरी दुष्ट हेतु आहे. वजिरी तर आपणाला मिळावी ही त्याची इच्छा आहेच. पण नुसती वजिरी आपण त्याला दिली तरी त्याचें समाधान व्हायचें नाहीं—"

"मग त्याला आणखी काय मिळविण्याची इच्छा आहे ?"

"स्पष्ट बोलतों याबद्दल माफ करा; पण बेगमसाहेबा ! त्याचा आपणांवर डोळा आहे. आपण भर ज्वानींतील विधवा, वजीर होऊन आपणांशीं निका लावायला सांपडल्यास आपल्या नांवावर तो मग निजामशाहीचा धनीच झाला !"

बेगम यावर कांहींही बोलली नाहीं. ती कां बोलली नाहीं हें शहाजीनें ओळखलें. त्यानें यापूर्वीच कुणकुण ऐकली होती कीं, रुबाबदार चेहरा, पिळदार शरीर, गौरवर्ण अंगकांति, मधुर भाषणशैली वगैरे मोहकता फत्तेखानाच्या ठायीं पूर्णत्वानें वसत असल्यानें सुलतान हयात असल्यापासूनच बेगम फत्तेखानाला चाही. त्या चाहण्यांत म्हणजे पापच असेल असें नाहीं, व तसा तेव्हां बेगमेच्या चाहण्याचा अर्थ कुणी घेतलाही नाहीं. पण एवढें खरें कीं, सुलतानानें फत्तेखानाला एकाएकीं वजिरीवरून काढलें तें त्याला फत्तेखानाच्या वर्तनाविषयीं संशय आला म्हणून काढलें. तेव्हां बेगम फत्तेखानावर फिदा आहे असा बोभाटा झाला नव्हता, तरीही फत्तेखानाची बेगमेवर पापी नजर आहे ही गोष्ट मात्र तेव्हांपासून जगजाहीर झाली होती. पुढें सुलतान वारल्यावर तर काय फत्तेखानाच्या वाटेंतील एक कांटा आपोआप दूर झाला. सुलतानाच्या निधनानंतर बेगमेनें फत्तेखानाला सोडून शहाजी राजांना वजिरी दिली याचें कारण एक तर शहाजीराजे पराक्रमी व कर्तबगार,

त्यांच्याशिवाय राज्यकारभार नीट चालावयाचा नाहीं असें पाहून साबाजी, अनंत व चतुर वगैरे मरहूम सुलतानाच्या मर्जींतील कारभारी मंडळीनें बेगमेपाशीं शहाजीराजांचीच शिफारस केली. तेव्हां बेगमेच्या मनाचा ओघ कदाचित् फत्तेखानाकडे असला तरी राज्यकारभाराच्या व कर्तबगारीच्या दृष्टीनें फत्तेखान हें वेर्जी उतरलेलें मोतीं होतें. एकवार त्यानें अपयश पदरीं घेतल्यामुळें त्याला पुन्हा वजीर नेमणें मनलज्जेसाठीं नाहीं तरी जनलज्जेसाठीं बेगमेला उचित वाटलें नाहीं. तरी पण फत्तेखानाची बेगमेच्या महालांत ये जा सुरूच होती. मध्यें कांहीं कारणांमळेंच फत्तेखान बेगमेला दृष्टीसमोरही नकोसा झाला होता हें खरें; पण आतां पुन्हा ती त्याच्याशीं गुण्यागोविंदानें वागूं पाहात होती. असा बेगमेचा कल स्वत:कडे वळत असलेला पाहून फत्तेखानानें आपल्याविरुद्ध बेगमेपाशीं चुगल्या करायला सुरुवात केली असल्याचें शहाजीराजांना माहीत होतेंच. तशांत आतां शहाजीराजांनीं 'खानाचा तुमच्यावर डोळा आहे' असें बोलून दाखवितांच बेगम कांहीं बोलली नाहीं, यावरून तर इथें कांहीं तरी पाणी मुरतें आहे असा राजांचा ठाम समज झाला. तरीही शहाजीराजे भित्र्या किंवा तोंडपुज्या वृत्तीचे नव्हते. त्यांनीं बेगमेला स्पष्ट सवाल केला. "बेगमसाहेबा! फत्तेखानाचीं हीं कारस्थानें आपणांला मानवतात का?"

बेगम यावर काय बोलणार? हीं कारस्थानें रुचतात म्हणावें तर शहाजी-राजे बिघडणार व मग ते काय करतील आणि काय नाहीं त्याचा नेम नाहीं. ते वेळीं निजामशाही सोडून जातील व मोंगलांना मिळून—त्यांच्या मनांत यापूर्वी तसें करायचें नसलें तरी आतां फत्तेखानावर सूड घ्यायचा म्हणून—निजामशाहीची धूळदाण करायच्या उद्योगाला लागतील. शिवाय आपण फत्तेखानाची बाजू घेऊन बोलतों, व फत्तेखान तर बद-कर्तबगार म्हणून गाजलेला, तेव्हां बेगम व फत्तेखान यांचा कांहीं वाईट संबंध असल्यामुळेंच बेगमेनें फत्तेखानची बाजू घेतली अशी सर्वत्र बदनामी होईल. बरें; शहाजीराजांच्या शब्दाला मान डोलवावी तर ते वजीर पडले. ते आपल्या अधिकारांत फत्तेखानाला केव्हां कसे गोत्यांत आणतील याचा नेम नाहीं. हे दोन्ही प्रसंग बेगमेच्या मनांतून टाळायचे होते. तिच्या मनांतून फत्तेखा-नालाही अडचणींत आणयचें नव्हतें. कारण तो तिचा दिलप्यारा पडला. बरें;

शहाजीराजांनाही तोडायचें नव्हतें; कारण त्यामुळें अब्रूपरी अब्रू जायची व राज्यही जायचें. अशा कात्रींत सांपडलेल्या बेगमेनें आपल्या मतें मोठ्या चतुराईनें एक पळवाट काढली. ती म्हणाली, "मी ह्या प्रकरणाची रीतसर चौकशी करीन, तोंवर मी कांहींच बोलूं इच्छित नाहीं."

"म्हणजे याचा अर्थ हाच कीं, आपला माझ्यावर विश्वास नाहीं." शहाजीराजे म्हणाले.

"विश्वास नाहीं कसा ? विश्वास आहे. पण मला तुमच्या फितुरीच्या ज्या गोष्टी कळल्या आहेत, त्यांवरून ह्या विषयाकडे मला डोळेझांक करतां येण्यासारखी नाहीं." बेगम म्हणाली.

"बेगमसाहेबा ! आपण ह्या गोष्टींकडे डोळेझांक करावी असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. पण चौकशी करायची ती एकांगी करूं नये एवढेंच माझें म्हणणें. आपल्या कानांवर जी दिल्लीचा बादशहा निजामशाहीवर चालून येण्याच्या तयारींत आहे अशी बातमी आली आहे, ती खरी आहे; पण ती एकांगी आहे आपणांला ज्यांनीं ही माझी फितुरी आहे असें सांगितलें, त्यांनींच ही फितूरी चालवली आहे."

"याला पुरावा काय ?"

"याला पुरावा आणखी काय देऊं ? फत्तेखान व जाधवराव मोंगलांना सामील होऊन निजामशाहीवर चालून येत आहेत. अशा बातम्या माझ्या बातमीदारांकडून मला रोजच्या रोज मिळत आहेत. शिवाय आज मी मुद्दाम शिंदखेडला जाधवरावांकडे जाऊन आलों व ह्या फितुरीचें माप मोजून त्यांच्या पदरांत घातलें, तेव्हां त्यांनाही कानावर हात ठेवायची सोय उरली नाहीं. यापेक्षाही आणखी भरभक्कम पुरावा आपणांला पाहिजे असेल तर तो माझ्या हातीं लागल्यावर मी आपल्याला सादर करीन. पण तूर्त बेगमसाहेबा ! तूर्त आपणांला मी एवढेंच बजावून ठेवतों, कीं ह्या वाटाघाटींत आपण पडूं नये. माझ्यावर विश्वासून वागावें. फत्तेखानाच्या फसवेगिरीच्या बोलांनीं आपणांला भूल पडेल. पण त्या भुलींत आपल्याला धोका आहे. आपली अब्रू, आपली गादी, आपल्या अल्पवयी पुत्राचें जीवित या सर्वांनाच त्यांत धोका आहे. माझें कर्तव्य म्हणून मी आपणांला हें वेळींच बजावून ठेवतों; या उप्परही आपण फत्तेखानासारख्या फसव्यांच्याच तंत्रानें

वागणार असाल तर आपलें, अल्पवयी सुलतानाचें व ह्या निजामशाहीचें नशीब ! " एवढें बोलून शहाजीराजे तिथून रागावून तडक निघून गेले.

राजे गेल्यावर बेगमेनें बराच वेळपर्यंत एकंदर परिस्थितीचा विचार केला. पण भांबावलेल्या विकृत मनाचा विचार तो, त्याला विचार म्हणण्यापेक्षां अविचार म्हणणेंच जास्त शोभलें असतें. शहाजीराजांच्या बोलण्यावरून फत्तेखान म्हणतो तसे शहाजीराजे निमकहराम होणार नाहींत अशी तिची खात्री होऊन चुकली. पण त्यामुळें ह्या चुगल्या करणारा फत्तेखान मात्र तिला नावडता होऊं शकला नाहीं. याचें कारण ती तरुण विधवा बेगम पडली. जन्मापासून राजकारणांत कधींच रूळलेली नाहीं. नानापरीचे विलासविहार करावे व पडदानशीन आयुष्य कंठावें या पलीकडे आपल्या डोक्यावर कांहीं जबाबदारी आहे किंवा कसें याची जाणीव तिला मुळींच नव्हती. फत्तेखान हा बदकर्तबगार व हीन बुद्धीचा मनुष्य आहे, त्याच्या हातून वजीरीचें जबाबदारीचें काम मुळींच पार पडायचें नाहीं; हें तिला कळत नव्हतें असें नाहीं. पण कळूनही वळत नव्हतें. धुंदावलेल्या तारुण्यमदानें तिच्या दृष्टीला फत्तेखानाचें मोहक रूप, मोहक भाषण, मुसमुसलेलें तारुण्य व पिळदार शरीर एवढेंच दिसे, व तेवढ्यावरच ती निहायत खुश होती. अशा धुंदींत तिला बाकीच्या गोष्टी कशा आठवतील !

कावीळ झालेल्याला सारेंच पिवळें दिसतें या न्यायानें बेगमेच्या तारुण्यसुलभ विलासलोलुप दृष्टीला अलीकडे जें जें कांहीं फत्तेखानाच्या विरुद्ध तें तें हटकून वाईट दिसूं लागलें होतें. शहाजीराजांनीं देखील आजच्या भेटींत फत्तेखानाविरुद्ध उद्गार काढले ते तिला फारसे आवडले नाहींत. नाहीं म्हणायला खानाचा आपल्या दोघां अल्पवयी मुलांवर दुष्ट डोळा आहे असें शहाजीराजे म्हणाले तेव्हां तिच्या अंतःकरणाला जरा धक्का बसला. पण पुन्हा ती पूर्वपदावर येऊन स्वतःशीच म्हणाली, इतका फत्तेखान दुष्ट कसा असेल ? तसेंच फत्तेखानाच्या मनांतून वजीर झाल्यावर आपणाशीं निका लावायचा आहे हें ऐकूनही तिला खेद झाला. तिला वाटलें, असें जर असेल, तर फत्तेखान आपणाशीं निका लावण्याची इच्छा करतो तो आपल्या प्रेमासाठीं किंवा आपल्या सौंदर्यासाठीं नाहीं ! त्याला आयतें सलतनतीचें वैभव भोगायला पाहिजे आहे त्यासाठीं तो आपणासमोर एवढी लाळ

घोटतो. मानाला व वैभवाला हपापलेल्या अशा तरुणाशीं स्नेह ठेवल्यापासून आपणाला कितपत सुख होईल, याचा बेगमेला आतां भरंवसा वाटेना.

ह्या सर्व शंकांचें निरसन खुद्द फत्तेखानाच्या तोंडूनच करून घ्यावें असा बेत करून बेगमेनें आपल्या दासीला हांक मारली, " जुलेखा ! "

हांक ऐकतांच जुलेखा धांवत तेथें आली व विचारूं लागली, " काय हुकूम आहे बेगमसाहेबा ? "

" आतांच्या आतां अशीच्या अशी फत्तेखानाकडे जा व त्याला सांग, आजच्या आज रात्रीं मी निकडीनें बोलावलें आहे."

" जसा हुकूम बाईसाहेब ! " असें म्हणून जुलेखा बाहेर निघून गेली. जातां जातां तिनें बेगमेकडे अशा चमत्कारिक नजरेनें पाहिलें कीं, त्यामुळें बेगमेच्या जिवाला हुरहूर लागून राहिली, " आपण फत्तेखानाला बोलावलें यांत जुलेखेस संशय आला कीं काय ? "

## प्रकरण नववें

# प्रेमी जीवांचा प्रथम संगम

गोमती खानाच्या वाड्यांतून निघाली तेव्हांपासून तिच्या मनांत एकसारखा एकच विचार घोळत होता. आपणाला सुलेमान म्हणून जो भेटला तोच तर हिरोजी नसेल ना ? तसा तिला संशय येण्याचें कारण हिरोजीच्या अनेक खाणाखुणा सुलेमानच्या ठायीं संभवत असलेल्या तिनें पाहिल्या होत्या. विशेषतः सुलेमानच्या डाव्या कानाच्या पाळीवरील तीळ तर हा हिरोजीच असावा असा संशय उत्पन्न करण्याला पुरेसा ढोबळ पुरावा होता. पण पुन्हा गोमतीला वाटलें, हिरोजी खानाच्या घरीं नोकरीला कशाला येईल ! तो शहाजीराजांचा नोकर, त्याला राजांच्या घरीं काय कमी आहे ! तरीही असा विचार करतां करतां शेवटीं ती ह्या पदावर आली कीं, गोमती—खानाची बातमीदारीण शहाजीराजांच्या वाड्यांत वावरत असते तसा

सुलेमान हा शहाजीराजांचा बातमीदार खानाच्या वाड्यांत वावरत नसेल कशावरून !

असे परस्परविरोधी विचार एकाच वेळीं गोमतीच्या अंतःकरणांत तांडव करीत असल्यामुळें ती अगदीं भांबावून गेली होती. शहाजीराजांची ती पक्की वैरीण खरी; पण सुलेमान हाच हिरोजी असेल का ? तो जर हिरोजी असला तर त्याच्या धन्याविषयीं आपण इतका वैरभाव मनांत बाळगलेला पाहून त्याला फार वाईट वाटेल. ह्या भयानें खानापाशीं कबूल केल्याप्रमाणें श्रीफळ व तलवार चोरून हातावेगळी करण्याचें धैर्य तिला झालें नव्हतें. सुलेमान हाच हिरोजी ठरला नाहीं, तरी सुलेमान हिरोजीचा दोस्त होता व सुलेमाननें हिरोजीपाशीं गोमतीविषयीं चार चांगले शब्द बोलण्याचें कबूल केलें होतें. अशा स्थितींत काय करावें आणि काय न करावें याचा विचार करता करतां सूर्य अस्ताला गेला. दिवे लागले, राजाराणींनीं प्रदोष सोडला. त्यांनीं स्वामींच्या आशीर्वादानुसार श्रीफळ भक्षण केलें व तीं उभयतां आपल्या रंगमहालांत गेलीं; तरी गोमतीचें मस्तक भ्रमायचें कांहीं कमी झालें नव्हतें. नेहमींचा तिचा व्यवसाय म्हटला म्हणजे राजे केव्हां कुणाशीं काय बोलतात हें तिखट कानांनीं ऐकत राहायचें. तसेंच राजाकडे कोण आले आणि कोण गेले यावरही बारकाईनें नजर ठेवायची व मग खानापाशीं जाऊन त्याची चुगली करायची. पण आजची स्थिति निराळी होती. आज तिचे कान कांहीं ऐकेनात आणि डोळे कांहीं पाहीनात. अशा स्थितींत राजाराणी झोंपी गेलेलीं पाहून ती उठली व पूर्वसंकेतानुसार सुलेमान आपल्याला भेटेल या आशेनें दरवाज्याबाहेर जाऊन उभी राहिली. थोड्याच वेळांत दुरून एक पुरुष तिच्या अनुरोधानें येतांना तिला दिसला. तिला वाटलें कीं, तो सुलेमानच आहे. म्हणून तिनें अंमळ दुरूनच हांक मारली, "सुलेमान !"

" मी सुलेमान नाहीं." उत्तर मिळालें.

" तर कोण ? "

" मी हिरोजी."

हिरोजी हें नांव ऐकतांच गोमती एकदम गांगरून गेली. हिरोजी आपणाला भेटेल हें तिच्या ध्यानींमनींही नव्हतें. पण आज तो ज्याअर्थी अवचित भेटायला आला त्याअर्थी तो सुलेमानच्या सांगण्यावरूनच आला

असला पाहिजे याविषयीं गोमतीला शंका उरली नाहीं. बाहेर अर्धवट काळोख असल्यानें हिरोजीचा चेहरा जरी तिला नीटसा दिसला नाहीं तरी तिनें अंदाजानें ओळखलें कीं हा हिरोजीच.

" जरा इकडे ये. म्हणजे आपल्याला थोडा वेळ मनमोकळेपणानें बोलतां येईल." असें म्हणून हिरोजी पुढें चालूं लागला. गोमती त्याच्या मागोमाग चालूं लागली. तीं दोघेंही पडक्या घराच्या पिछाडीला जाऊन उभीं राहिलीं. आपण हें काय करतों याचें भान त्या दोघांनाही नव्हतें.

" तुम्हांला मी इथें आहे ही बातमी कुणी सांगितली ? " गोमतीनें प्रथम विचारलें.

" तुझ्या दोस्तानें व आमच्या दुश्मनानें—" हिरोजी उत्तरला.

" सुलेमाननें काय ? "

" होय."

" बरें मग, तुम्ही या ठिकाणीं कशाला आलां ? "

" तुला भेटण्यासाठीं. "

" मला भेटून आतां काय करणार ? "

" तूं सांगशील तें करीन."

गोमतीला यावर कांहीं बोलवेनाच. हिरोजीनें तिला अगदीं निरुत्तर करून टाकिलें. ती कांहीं बोलत नाहींसें पाहून हिरोजी म्हणाला, " गोमती ! आजवर माझी अशी कल्पना होती कीं, तूं केव्हांच संसारात पडून एव्हांना एक-दोन मुलांची आई शोभत असशील. पण सुलेमानच्या सांगण्यावरून मला सारा प्रकार कळला. बरें; झालें तें होऊन गेलें. आतां यापुढें तुझा विचार काय आहे ? "

" आतां माझा विचार ऐकून आपणांला काय करायचें आहे ? उन्हाच्या तापानें जें फूल एकवार सुकलें, तें अश्रूंनीं भिजव भिजव भिजवलें तरी त्यांतून वास थोडाच येणार आहे ! मी सुलेमानला सांगायला विसरलें कीं, मला हिरोजीची भेट घ्यायची नाहीं. "

" गोमती ! हें तूं खरें बोलतेस ? " हिरोजीनें अस्वस्थ चित्तानें विचारलें.

" हो खरेंच बोलतें. आणि मी तरी पाहा वेडी कशी ती ! ज्या गोष्टी बोलायच्या नव्हेत त्या मी वेड्यासारख्या सुलेमानपाशीं बोलून मोकळी झालें.

पण तेंही एका अर्थीं बरें झालें. त्यामुळें माझ्या मनांत काय आहे व मी जगांत कशी वागते हें आपणांला आपोआप कळून चुकलें. त्यावरून आपणांला कळलेंच असेल कीं, आपल्या आयुष्याचें ध्येय आणि माझ्या आयुष्याचें ध्येय यांत उत्तर ध्रुव आणि दक्षिण ध्रुव यांच्यामधील अंतराइतकें अंतर आहे. आपण शहाजीराजांचे कट्टे कैवारी तर मी त्यांची कट्टी वैरीण. अशा स्थितींत आपलें आणि माझें नातेंसुद्धां वैऱ्याचेंच उत्पन्न होतें नाहीं का ?" बोलतां बोलतां गोमती एकाएकीं थांबली. तिचेंच मन तिला खाऊं लागलें कीं, आपण या वेळीं बोलूं नये तें बोललों. निदान हिरोजीला वैरी म्हणण्यांत तरी आपण हिमालयाएवढी मोठी चूक केली अशी तिची खात्री होऊन चुकली. पण एकवार तोंडून निघून गेलेले शब्द माघारीं थोडेच घेता येतात !

गोमती मनांतल्या मनांत अगदीं चूर होऊन गेली होती कीं, हिरोजी आपले शब्द मनाला लावून घेतो कीं काय ? पण हिरोजीच्या मनावर तिच्या बोलण्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तो नुसता तिच्याकडे पाहात स्मित-हास्य करीत उलट दोन पावलें तिच्या अधिक जवळ जाऊन उभा राहिला.

" आपणांला यांत इतकें हंसूं कसलें आलें ?" गोमतीनें विचारलें.

" हंसूं आलें तें अशासाठीं कीं, बायका भावनेच्या भरांत येऊन बोलूं लागल्या म्हणजे त्यांच्या बोलण्याचा जमाखर्च नेहमीं व्यस्त प्रमाणानें करावा लागतो. अत्यंत आवडती किंवा अत्यंत मनकवडी अशी एखादी गोष्ट बायकांना आपल्या प्रिय माणसांना सांगायची असली तर ती त्या अशीच सांगतात. माझी तर अशी खात्री आहे कीं, तुझी माझी जी जिव्हाळ्याची मैत्री आहे, तिची ओळख तुला असल्याशिवाय तुझ्या तोंडून हे शब्द आले नाहींत."

" म्हणजे ? मी बोललें त्यांत आपल्या ओंव्या गाइल्या असें का आपणांला वाटतें ?" गोमती अंमळ धीरानें, हिरोजी रागावला नाहीं असें पाहून अंमळ जास्त मनमोकळेपणानें म्हणाली.

" गोमती ! तुझ्यासारख्या जिव्हाळ्याच्या माणसाच्या तोंडून शिव्या निघाल्या तरी त्या ओंव्यांप्रमाणेंच मंगल असतात. मांजरीचे दांत मांजरीच्या पिलाला कधीं बाधत नसतात, तद्वतच प्रेमी माणसाचे शिव्याशाप प्रेमी माणसांना जाचत नसतात."

" एकूण आपण मुठींत माती धरून त्या मातीचें सोनें बनविणारे पट्टीचे जादूगार आहां म्हणायचे ! कारण माझ्या कठोर शब्दांचेदेखील अत्यंत मृदु अर्थ आपल्या कानाला ऐकूं आले. "

" गोष्ट खरी. मी जादूगारच आहें. "

" मग आपण इथें माझ्यावर जादू घालायला आला कीं काय ? "

" हो ! तूं आतांच म्हणलीस कीं माझ्या मुठींत मातीचें सोनें होतें. त्याची प्रचीती पाहाण्यासाठीं मी तुझ्यासमोर आलों आहें. " हिरोजी थोडा वेळ थांबून विचार करून म्हणाला, " गोमती ! तूं हातीं घेतलेलें कार्य किती भयंकर आहे, याची तुला कल्पना तरी आहे का ? "

" असेल भयंकर. मी म्हणत्यें, तें महाभयंकर असेल. पण मग करणाराची करामत म्हणतात ती कशासाठीं ? "

" तुझ्या अंगीं करामत आहे, हें मला फार पूर्वीपासून माहीत आहे. पण त्या करामतीचा असा दुरुपयोग करायचा का ? देव्हाऱ्यांतील सोन्याची मूर्ति मोडून त्याची पिकदाणी करायची का ? सांग. विचार करून सांग. मी शहाजीराजांचा एकनिष्ठ सेवक आहें, एवढी एक गोष्ट तूं ध्यानीं ठेवलीस म्हणजे मी काय म्हणतों तें कळायला फारसे श्रम पडायचे नाहींत. "

" तें मला माहीत आहे. आपल्या बोलण्याचा उद्देश मला कळतो. राजावर सूड घेण्याचा जो माझा निश्चय, त्यापासून मला परावृत्त करण्यासाठीं आपली ही सारी धडपड चाललेली आहे. पण एकट्या राजांच्यामुळें माझा उभा जन्म कसा मातीमोल होऊन गेला आहे. याचा जर आपण विचार कराल तर आपणांलाही मी करतें असेंच करण्याची बुद्धि होईल. आपल्या बोलण्याचा अर्थ मला कळतो. आपण इथें आलां तें हेंच सांगण्यासाठीं ना, कीं राजांना स्वामींनीं दिलेलें श्रीफळ आणि देवीनें दिलेली भवानी तलवार—"

गोमतीच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वी हिरोजी तिला म्हणाला, " खरेंच तें श्रीफळ आणि तलवार तूं हस्तगत केलीस का ? "

" हो, केली. मग आपलें म्हणणें काय ? "

" ती कुठें आहे ? "

" समजा, ती मी खानाला नेऊन दिली आणि तें श्रीफळही खानाच्याच स्वाधीन केलें—"

गोमतीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच हिरोजी एकदम अस्वस्थ होऊन म्हणाला, " चांडाळणी ! तूं घात केलास. खरें सांग. खरेंच तूं असें केलेंस का ?

" केलें नाहीं, पण करीन."

" मग असें करूं नकोस."

" पण आपण मला सांगणारे कोण ? "

" मी कोण ? मी शहाजीराजांचा एकनिष्ठ सेवक, आणि तुझा कोण हें तर तुला माहीतच आहे. तुम्हां दोघांचेंही कल्याण व्हावें आणि तुमच्या कल्याणानें मीं सुखी व्हावें अशी माझी इच्छा आहे. हा आम्हां तिघांचाही स्वार्थ सोडून दिला तरी तूं काय किंवा मी काय आमच्या राजा-राणींच्या जीवाला आमच्या जीवापलीकडे जपण्यानें साऱ्या रयतेचें मंगल साधायचें श्रेय आम्हांला लाभणार आहे."

गोमती संतापानें लाल होऊन म्हणाली, " हिरोजी ! आपण म्हणतां तें सारें खरें. पण परदुःख शीतळ असतें हेंही कांहीं खोटें नाहीं. ह्या जगांत असा कोणता संसारी जीव आहे कीं, जो स्वतःचें अमंगल होत असतांना उघडया डोळ्यांनीं तें अमंगल साधणाऱ्या व्यक्तीला मांगल्याच्या शिखरावर चढवूं पाहील ? स्वतःचे पंचप्राण व्याकुल होत असतां समोर दुसरा माणूस पोटभर जेवीत असलेला पाहून कोणत्या भुकेल्या जीवाचें समाधान होईल ? अपकाराची फेड उपकारांनीं करणारे साधू ह्या जगांत फार विरळा असतात. जशास तसें हा जगाचा न्यायच आहे. राजांनीं असें माझ्या कल्याणासाठीं आजवर काय केलें आहे तर मी त्यांच्या कल्याणासाठीं झटूं ? मी पहिल्या-नेंच ताडलें होतें कीं, आपण आज माझ्याकडे आलां तेव्हां आपण याच गोष्टीची रदबदली करण्यासाठीं आला आहां. पण आपल्या शिष्टाईचा माझ्यापाशीं कांहींदेखील उपयोग होणार नाहीं. राजांच्या बाबतींत सामोपचारां-ची गोष्ट पुन्हां माझ्यापाशीं बोलूं नका. राजे आणि मी एकमेकांना पाहून घेऊं."

" असेंच जर असेल तर मी राजांच्या वतीचा माणूस तुला सांगतों कीं, मी तुला इथल्या येथें कैद केली आहे." हिरोजी गोमतीचा उजवा हात आपल्या डाव्या हातांत घट्ट धरून आपल्या उजव्या हाताचें आंगठ्याजव-

ळील बोट आपल्या नाकाजवळ नेऊन तिला धमकावीत म्हणाला. “ बस ! आतांपर्यंत मी तुझ्या तोंडून राजांविषयीं अनुदारपणाचे अनेक बोल ऐकून घेतले, हेंच फार झालें. पण ह्यापुढें तें चालायचें नाहीं. मी पुन्हा एकवार विचारतों. मला स्पष्ट सांग. मी राजांच्या पायाचा सेवक व राजे माझे मायबाप, तशीच तूंही राजांच्या राणीची दासी आहेस. ज्या घरचें अन्न खावें त्या घराचे वासे मोजावे या सारखा कृतघ्नपणा जगांत दुसरा कोणता असेल ? बोल, तूं तुझ्या धन्याला ओळखतेस कीं नाहीं ? ”

“ मी माझ्या प्रतिज्ञेशिवाय दुसऱ्या कशालाही आणि कुणालाही ओळखीत नाहीं. ” गोमती जरादेखील न डगमगतां म्हणाली.

“ तर मग मीदेखील तुला ओळखीत नाहीं. मी देखील म्हणतों, गोमती कुठची कोण भगवान् जाणे. माझ्यासमोर जी उभी आहे ती राजांची दगलबाज दासी उभी आहे. ह्या दगलबाजीबद्दल तिला शासन करणें हें माझें काम आहे. ”

बराच वेळपर्यंत तीं दोघेंही स्तब्ध उभीं होतीं. कुणी कुणाशीं बोलेना. दोघांच्याही मनांत त्यांच्या त्यांच्या परीनें विचार चालले होते. अखेर गोमतीच पहिल्यानें बोलती झाली. ती म्हणाली, “ मग काय आपण मला शासन करणार तर ? ”

हिरोजी म्हणाला, “ तें आतां तुझ्या इच्छेवर सर्वस्वी अवलंबून आहे. मुंगी होऊन साखर खावी आणि हत्ती होऊन लांकडें मोडावींत. जर तुला माझी पर्वा असती तर तूं मला पाहातांच सामोपचारांनीं विचारलें असतेंस कीं, मी काय करूं ? आणि मग मी तें तुला सांगितलें असतें. गोमती ! तूं आणि मी एकमेकांना परकी नाहीं. आपल्या पांच वर्षांपूर्वींच्या आठवणी तुला आठवत नाहींत का ? त्या वेळीं तूंच मला किती परोपरीनें सांगत असेस कीं आपलें लग्न झाल्यावर आपण शहाजीराजांच्या पदरींच राहून नांवारूपाला यायचें. राजांचा माझ्या ठायीं लहानपणापासून अत्यंत विश्वास असलेला पाहून तुला तेव्हांदेखील राजांविषयीं किती अभिमान वाटे. आणि तीच तूं आज राजांच्या विरुद्ध शत्रूला सामील होऊन राजांच्या नाशाचीं कारस्थानें रचीत आहेस. तूं असें समज कीं, मी आज तुझ्यासमोर आलों, तोच माझ्या स्वरूपानें साक्षात् परमेश्वर तुझ्या नशिबाची परीक्षा पाहाण्यासाठीं

तुझ्यासमोर येऊन उभा राहिला. त्या परमेश्वराच्या एका मुठींत उभ्या जन्माचें संसार-वैभव सांठविलेलें होतें, व दुसऱ्या मुठींत राजद्रोहा-विषयींचें शासन सांठविलेलें होतें. त्या परमेश्वरानें आपल्या दोन्ही मुठी मिटून तुझ्यासमोर धरिल्या व 'एकी कीं बेकी' म्हणून विचारलें. तेव्हां तूं चटकन 'बेकी' सांगून संसार-वैभवाला मुकलीस व राज्यद्रोहाविषयींचें शासन मात्र हकनाक पदरीं पाडून घेतलेंस. पुन्हा एकवार मी झाल्या चुकीची दुरुस्ती करण्याची संधि तुला देतों. ऐकून ठेव, माझ्या मुठी मीं तुला उघडून दाखविल्या आहेत. यशाचा आणि सुखाचा मार्ग तुला आक्रमण करायचा असेल, हा हिरोजी आपला जन्माचा सोबती व्हावा अशी तुझी मनापासूनची इच्छा असेल, तर तुला माझ्या पावलावर पाऊल टाकून चाललें पाहिजे—"

गोमती हिरोजीला पुरतेपणीं बोलूं न देतां कांहींशी प्रसन्न चित्तानें म्हणाली, "वाहवा! माझी कल्पना होती कीं, ह्या पांच वर्षांत आपला स्वभाव कांहीं निवळला असेल. पण पाहातें तों पळसाला पानें तीनच. आपण तरी माझ्यावर इतकी सत्ता गाजविणारे कोण हो? तसें पाहिलें तर निश्चयाच्या कसोटीला मी जितकी टिकलें तितकें आपण कांहीं टिकला नाहीं. तेव्हां आतां अशक्य गोष्टी शक्य धरून चालायचें आणि निराशेच्या पोटींही आशा जन्माला येईल अशी वाट पाहात बसायचें तर मी म्हणेन कीं, सत्ताच गाजवायची तर ती मी आपल्यावर गाजवायची; आपण माझ्यावर नाहीं गाजवायची."

गोमती बोलतां बोलतां थांबून हिरोजीच्या तोंडाकडे पाहात गालांतल्या गालांत हंसूं लागली.

ती बोलून गेली खरी; पण लगेच तिला वाटलें कीं, आपण बोललों तें केवळ भ्रमिष्टाप्रमाणें मुद्दा सोडून बोललों. आपल्या बोलण्याला ना शेंडा ना बुडखा. आणि वस्तुस्थिति तशीच होती. आतां गोमती जें बोलत होती तें बेभानपणें तोंडाला येईल तें बोलत होती. शहाजीराजांविषयींचा आज पांच वर्षें तिच्या अंतःकरणांत दृढमूल होऊन राहिलेला द्वेषभाव आज हिरोजीच्या पांच वर्षांनंतरच्या पहिल्यावहिल्या कोटींतील सहानुभूतीच्या दोन शब्दांनीं दूर झाला होता. दुष्टपणा हा गोमतीचा उपजत गुण नसल्यामुळें यापुढें शहाजीराजांचा दुष्टावा करणें तिचें तिलाच आतां जड वाटूं लागलें होतें. त्यांतूनही इतका वेळ तिनें उसनें अवसान कसेंबसें आणलें. पण

असल्या उसनवारीच्या गोष्टींनीं गत कशी लागावी? हिरोजीच्या आतांपर्यंतच्या बोलण्यावरून तिला पूर्णपणें कळून चुकलें होतें कीं, आपल्या पूर्वीच्या संसाराविषयींच्या साध्यासिध्या इच्छा व महत्त्वाकांक्षा हिरोजीच्या हातीं पूर्णत्वाला पोंचवणार. पण लहानपणापासून गोमतीचा हा स्वभावच होता कीं, आपली चूक झाली तरी ती सामोपचारानें कधीं कबूल करायची नाहीं. हिरोजीला हा तिचा स्वभाव पूर्णपणें माहीत होता. आपण सांगूं ती गोष्ट गोमती खात्रीनें करील व जी गोष्ट करूं नको म्हणूं ती ती खात्रीनें करणार नाहीं असा भरंवसा हिरोजीला गोमतीविषयीं पांच वर्षांपूर्वी वाटे, त्याप्रमाणें आजही वाटत होता. समुद्रांत तारू लोटल्यावर वाऱ्याची गति पाहून कोणत्या दिशेनें कसें तारू हाकारावें हें जसें नाखव्याला चांगलें कळतें, त्याप्रमाणेंच गोमतीशीं बोलतांना तिच्या शब्दावरून, तिच्या हावभावावरून व तिच्या चेहऱ्यावरील आविर्भावावरून तिच्याशीं कसें वागून तिला आपल्या मनाप्रमाणें वागायला लावायचें हें कळत होतें. आजदेखील प्रथम प्रथम गोमती राजांवर सूड घेण्याच्या गोष्टी बोलत होती. पण शेवटीं ती प्रेमगर्भ भाषेंत बोलूं लागलेली पाहातांच हिरोजी ओळखून चुकला कीं, आपण हिला जिंकली. आतां तिला आपल्या म्हणण्याप्रमाणें वागायला कबूल करून कसें घ्यायचें एवढाच प्रश्न होता. पण तो प्रश्नही सोडविण्याला तितका अवघड नव्हता.

अंमळशानें हिरोजीनें गोमतीला विचारलें, " एकी कीं बेकी ? "

गोमती उत्तरली, " पण आपण म्हणाला त्याचप्रमाणें आपल्या मुठींत खरोखरच माझ्या संसाराचें वैभव सांठविलेलें आहे कीं ह्या फुकीच्या गोष्टी चालल्या आहेत."

हिरोजीला गोमतीच्या अनुरक्तपणाविषयीं एवढा पुरावा पुरेसा होता. त्याचा पूर्वीचा आवेश आतां बराच ओसरला होता. तोही गोमतीइतक्याच उत्कंठेनें व अनुरक्तपणानें उद्गारला, " गोमती ! तूं असें बोलणें म्हणजे माझ्याविषयीं नसता अविश्वास दाखविण्यासारखें आहे."

" मग काय आपण बोललां तें खरें ? "

" हो एकवारच नव्हे तर त्रिवार, शतवार, सहस्रवार खरें. "

" मग काय तर आज ना उद्यां गोमती आपल्या संसाराची धनीण होणार म्हणायची तर ! "

" होय. पण तिनें आपलें कर्तव्य केलें तर."

" सांगा, तिनें आपलें कोणतें कर्तव्य करायचें ? "

" जी निष्ठा तिच्या आवडत्या हिरोजीची राजांच्या पायीं आहे ती निष्ठा तिचीही असली पाहिजे. राजांच्या शत्रूंशीं सामीलगिरी यापुढें तिनें करतां कामा नये. "

गोमती यावर आणखी कांहीं बोलली असती. पण तेवढ्यांत फत्तेखान अचानक त्या वाटेनें येतांना तिला आढळला. त्याबरोबर दोघांचींही तोंडें एकदम बंद झालीं. हिरोजी हा शहाजीचा विश्वासू नोकर व गोमती ही आपली गुलदस्तांतील बातमीदारीण. हे सूर्यचंद्र आज एका वेळीं एकत्र कसे उगवले याचें खानाला मोठेंच आश्चर्य वाटलें. पण तो कांहीं बोलला नाहीं. गोमतीनें त्याच्याकडे पाहून स्मितहास्यपूर्वक नेत्रसंकेत केला. तेवढ्यावरून खान काय ओळखायचें तें ओळखून हिरोजीकडे तीक्ष्ण नेत्रकटाक्ष फेंकीत निघून गेला.

हिरोजीला कां नकळे खान आलेला पाहातांच अस्वस्थ वाटूं लागलें. तो म्हणाला, " गोमती ! मला आतां फार वेळ थांबतां येत नाहीं. आपणाला जास्त बोलायचें तें आपण उद्यां बोलूं. उद्यां याच वेळीं, याच जागीं मी तुला नेमका भेटेन. त्यापूर्वी आज एकच महत्त्वाची गोष्ट मला तुला सांगायची, ती ही कीं, तूं काय पाहिजे तें कर; पण स्वामीनीं राजांना दिलेलें श्रीफळ व देवीनें दिलेली तलवार राजांची राजांपाशींच राहिली पाहिजेत. तूं त्यांना हात लावतां कामा नयेस. व दुसऱ्या कोणाला हात लावूं देतां कामा नये. राजांच्या तलवारींत असा अद्भुत दैवी गुण आहे कीं, जें कोणी माणूस अपवित्र बुद्धीनें त्या तलवारीला स्पर्श करील त्या माणसाचें रक्त पिण्यासाठीं ती तलवार सदोदित तान्हेलेली असते. यापेक्षां आज मी कांहीं जास्त सांगूं शकत नाहीं. तूं आतां जा. सुलेमान जर भेटला तर त्याला यांतलें एक अक्षरही कळूं देऊं नकोस. "

हिरोजी एवढें बोलून लगबगीनें तिथून निघून गेला. तो पूर्णपणें डोळ्यांआड होईतों गोमती तिकडे टक लावून पाहात होती. तो दिसेनासा होतांच आतां काय करावें आणि कसें करावें अशी चिंता करीत तीही जड पावलांनीं राजांच्या वाड्याकडे गेली.

प्रकरण दहावें

# खानानें जाळें टाकलें

फत्तेखान जो बिजलीला ती हिरोजीशीं बोलत असतांना भेटला, तो बेगमेच्या महालांतून येतांना. तो बेगमेच्या महालांतून बाहेर पडला तोह हंसत हंसत. बेगमेकडून 'प्यार !' असें कधीं नव्हत्याचीं संबोधनें घेत व बेगमेला कधीं नव्हत्याचें 'प्यारी !' असें आज संबोधायला सांपडलें म्हणून आनंदानें बेहोश होऊन बाहेर पडला. तो वाटेला लागल्यावर दिसेनासा होईतों बेगम आपल्या रंगमहालाच्या खिडकीवरून किनखापी पडदा दूर सारून त्याच्याकडे सारखी टक लावून पाहात होती. इतक्या उत्कंठेनें बेगम आज फत्तेखानाकडे कां पाहाते आहे हें दुसऱ्या कुणाला जरी कळण्यासारखें नव्हतें तरी जुलेखाला मात्र तें पूर्णपणें कळून चुकलें होतें. कारण, खान जेव्हां महालांत आला व बेगमनें त्याला आज पहिल्यानें आपल्या रंगमहालांत प्रवेश देऊन महालाचा दरवाजा लावून घेतला, तेव्हांच जुलेखा ओळखून चुकली कीं, आजची बेगम रोजची ती नाहीं !

जुलेखा ही बेगमेची अत्यंत विश्वासू दासी. जुलेखा वयानें पंचवीस वर्षांची–बेगमेच्याच बरोबरीची होती. व बेगमेचें तिच्यावर जिवापलीकडे प्रेम होतें. वस्तुतः इतका त्या दोघींचा प्रेमा असायचा नव्हे; कारण जुलेखा ही मरहूम बादशहाच्या हयातींत त्याच्या जनानखान्यांतील एक आवडती नाटकशाळा होती. पण ती नाटकशाळा होती, एवढ्यावरून तिची कमी किंमत कोणी लेखल्यास तें धाडसाचें होईल. एकतर जुलेखा ही बेगमेचीच दूरची नातलग होती; दुसरें बादशहाची ती जरी नाटकशाळा होती, तरी ती बादशहाशीं वागतांना पतिव्रताधर्म पाळी व बेगमेशीं अत्यंत प्रेमानें वागे. म्हणूनच बादशहाच्या हयातींत ती नेहमींच बेगमेच्या संगतींत असे व बेगमेच्या दोघां अल्पवयी मुलांचें तिनें ममतेनें लालनपालन करून त्यांना वाढविलें होतें. स्वतः जुलेखेला बादशहापासून मूल झालें नव्हतें, त्यामुळें तिच्या अपत्यवात्सल्याचा अमृतौघ बादशहाच्या दोघां शहाजाद्यांसभोंवारच वाही, व बादशहाच्या पश्चात् देखील त्या तिच्या अपत्यवात्सल्याला खंड पडला नव्हता.

जसा जुलेखेचा शहाजाद्यांच्या ठायीं जिव्हाळा होता, तसाच शहाजाद्यांचा तिच्या ठायीं लळा होता. इतका कीं, दोन्हीं शहाजाद्यांना जग कसें आहे हें थोडें थोडें कळूं लागेपर्यंत बेगम आपली आई व जुलेखा आपली दायी हें त्यांना माहीतच नव्हतें. आतां कुठें त्यांना जरी आपली खरी आई कोण हें कळूं लागलें होतें तरी त्यांची खरी ' मा ' जुलेखाच होती. तात्पर्य, जुलेखा जरी बेगम नव्हती, बेगमेची दासी होती, तरी इतर दासी व ही दासी यांच्यांत जमीनअस्मानाचें अंतर होतें. बादशहाच्या इतर साऱ्या नाटकशाळांना बादशहा निधन पावतांच बेगमेनें दश दिशांना घालवून दिलें; पण जुलेखा मात्र तिच्या पाशीं राहिली व तीं इतर फुलपांखरें नव्यानव्या पुष्पवृक्षासभोंवार गुंजारव करीत निघून गेलीं. कोणी अमक्या सरदाराची तर कुणी तमक्या सुभेदाराची प्रियतमा बनल्या तर कुणी आणखी कुणाच्या कांहीं बनल्या; पण जुलेखा मात्र बादशहाच्या पश्चात् बेगमेप्रमाणेंच त्याची विधवा अर्धांगी पातिव्रताधर्मानें दिवस कंठीत होती. जुलेखा मनानें बेगमेहून खंबीर व शहाणी असल्यानें तिच्या सत्सहवासाचा बेगमेच्या वैधव्यलांछित आयुष्यावरही आजवर पुष्कळच सुपरिणाम होऊं शकला. बेगम ती बेगम व दासी ती दासी. बेगम वैभवाच्या शिखरावर स्थानापन्न झालेली व जुलेखा तिच्या पायातळीं पडलेली. हें जरी खरें, तरी त्या दोघी एकमेकींच्या निकट सहाचर्यांत होत्या. त्यामुळें जुलेखेच्या सद्गुणपुष्पाचा परिमल बेगमेसभोंवारचें वातावरण निसर्गतःच सुगंधित करी. बेगमेच्या डोळ्यांसमोर जर जुलेखेचा सच्चरितादर्श नसता, तर आधींच चंचल वृत्तीची असलेली ती वैभवसंपन्न विधवा यापूर्वी केव्हांच अधःपतित झाली असती. फत्तेखान हा बादशहाच्या हयातीपासूनच बेगमेवर पापी डोळा ठेवून होता. हें जुलेखाला माहीत होतें. पण बादशहा हयात होता तोंपर्यंत तो सर्व गोष्टींना जबाबदार असल्यामुळें व आजच्याइतकी बेगमेची बरोबरी करण्याची वेळा जुलेखेच्या आयुष्यांत तेव्हां प्राप्त न झाल्यामुळें तेव्हां जुलेखा कांहीं न बोलतां फत्तेखानाचे चवचाल चाळे सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण मात्र करून ठेवीत होती. दुसरें असें कीं, कुंकवाला आधार जोंपर्यंत स्त्रियांना असतो तोंवर कांहींही प्रमाद त्यांच्या हातून घडले तरी त्या आधारावर ते उपेक्षणीयच ठरतात. पण आतांची बादशहाच्या पश्चात्ची परिस्थिति अशी,

नव्हती. हें ओळखूनच जुलेखा आतां बेगमेला बेलगामी बनूं न देण्याची शक्य तेवढी खबरदारी घेत होती.

पण बेगम स्वभावतःच चंचल, तशांत बादशहाच्या पश्चात् तिला वाऱ्यासारखें स्वातंत्र्य प्राप्त झालेलें. तें अमौलिक खरें; पण तें जितकें अमौलिक तितकेंच पचनीं पाडायला अवघड ! बेगमेला बादशहाच्या पश्चात् स्वातंत्र्य मिळालें, त्याचा योग्य उपयोग करण्याचें तिनें मनांत आणिलें असतें तर तिला पृथ्वीमोलाच्या अनेक गोष्टी करतां आल्या असत्या. बादशहाच्या अमदानींत एखाद्या नालायक माणसानें आपली सुंदर बहीण किंवा मुलगी बादशहाच्या जनानखान्यांत लोटून त्या वशिल्याच्या जोरावर मनसबदारी मिळवावी व मग त्या मनसबदारींत मनाला मानेल तसा धुडगूस घालावा; हे व असे अनेक अनिष्ट प्रकार जे बादशहाच्या हयातींत घडले होते अथवा घडत होते, त्यांना आतां आळा घालून आपलें राज्य नीति-वैभव संपन्न करण्याचें बेगमेनें मनावर घेतलें असतें तर तें तिला स्वातंत्र्याच्या जोरावर सहज करतां आलें असतें. आणि ह्या बेगमेच्या ऐवजीं जुलेखा जर दैववशात् बादशहाची मुख्य बेगम झाली असती, तर तिनें बादशहाच्या पश्चात् तिला प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याचा असाच सदुपयोग केला असता. पण जुलेखा म्हणजे कांहीं बेगम नव्हे ! त्यांतूनही जुलेखेनें बेगमेच्या मर्जींतील मैत्रीण म्हणून जेवढें जेवढें बेगमेला सांगून करतां येण्याजोगें होतें तेवढें तेवढें करण्याचा क्रम सुरू ठेवला होता. बादशहाच्या निधनानंतर वजीरपद कुणाला द्यावें हा प्रश्न उपस्थित झाला तेव्हां शहाजीराजांनाच वजीर करावें असा बेगमेचा ग्रह बनवायला जुलेखाच बहुतांशीं कारण झाली होती. फत्तेखानाच्या बाबतींत देखील सावध राहण्यासाठीं जुलेखा प्रथमपासूनच बेगमेला नाना तऱ्हांनीं, आपली अमर्यादा होणार नाहीं अशी काळजी घेऊन शक्य तेवढा उपदेश करी. आजवर आजच्या दिवसापर्यंत बेगम प्रत्यक्षपणें जाळ्यांत सांपडली गेली नव्हती. याचें खरें श्रेय जुलेखेलाच होतें.

जुलेखा पडली दासी व बेगम पडली स्वतंत्र ! त्यामुळें बेगम जो आजवर फत्तेखानाशीं स्नेहसंबंध ठेवीत आली, त्याला आळा घालणें व तो तोडून काढणें जुलेखेच्या आवांक्याबाहेरचें होतें. त्यांतूनही बेगम जेव्हां फत्तेखानाला बोलावून त्याच्याशीं बोलत बसे तेव्हां जुलेखेला कांहींशी वचकून

वागे. फत्तेखानाला बोलावण्यांत व त्याच्याशीं बोलत बसण्यांत बेगमेचा अंतस्थ हेतु जरी कामुकतेचाच असला, तरी जुलेखेच्या भयानें ती आपल्या त्या हेतूवर राजकारणाच्या वाटाघाटींचें पांघरूण घालण्याइतकी दक्षता बाळगी. जुलेखेलाही बेगमेचें स्वातंत्र्य लक्षांत घेतां, बेगम आपणाला इतकी वचकून वागते हेंच सई, असें म्हणून समाधान मानून घ्यावें लागे.

पण आज जुलेखेला तेवढ्या समाधानालाही जागा उरली नाहीं. आजवर बेगमेनें फत्तेखानाला बोलावून आणण्याच्या कामागिरीवर जुलेखेची योजना कधींच केली नव्हती; कारण त्या बोलावण्यांत विशेषसा खाजगीपणा किंवा नाजुकपणा नव्हता. पण आज तें दूतीचें काम करणें जेव्हां जुलेखेच्या वाट्याला आलें तेव्हां ती ओळखून चुकली कीं, बेगमेच्या मनांतील फत्तेखानाविषयींची पापवासना आतां परिपक्व दशेला येऊं पाहात आहे. बेगम आज फत्ते-खानाला भलत्यासलत्या दूताच्या किंवा दूतीच्या हातीं रात्रीच्या वेळीं एकां-तांत बोलावण्याला अब्रूच्या भयानें लाजली. म्हणूनच आपण बेगमेच्या विश्वासांतील दासी असल्यानें आपणांकडे तें काम आलें, हें जुलेखेनें तेव्हांच ताडलें. ती फत्तेखानाच्या घरीं गेली, त्याला निरोप सांगितला, तो आला; सर्व कांहीं नीट झालें. पण आज बेगम त्याच्याशीं पडद्याआडून बोलायचें सोडून ‘ महत्त्वाच्या भानगडीविषयीं बोलायचें आहे ’ असें कारण सांगून त्याला अंतर्महालांत घेऊन गेली. इतक्या महत्त्वाच्या वाटाघाटी व्हायच्या त्याअर्थी आपण तिथें हजर असल्यानें कदाचित बेगमसाहेबांना आवडणार नाहीं हें आगाऊ जाणून जुलेखा आपण होऊनच दूर राहिली. बेगमेनेंही तिला जवळ राहायला सांगितलें नाहीं, यावरून बेगमेला ती जवळ नको होती हें सिद्धच झालें.

पण जुलेखा दूर गेली नाहीं. जें पाप बेगमेच्या मनांत आलें होतें, त्याच पापाचें प्रतिबिंब जुलेखेच्या मनांत उमटलें असल्यानें बेगम आज अधः-पाताच्या गर्तेच्या अगदीं कांठावर जाऊन उभी आहे अशी जुलेखेची खात्री झाल्यामुळें व अखेरपावेतों बेगमेचा अधःपात किंवा राज्याचा नाश फत्ते-खानासारख्या खल पुरुषाच्या हातून होऊं द्यावयाचा नाहीं असा तिचा निर्धार असल्यानें ती धाकट्या शहाजाद्याशीं खेळत बसल्याचें निमित्त करून दरवाजाबाहेर रेंगाळत होती. तिचें शरीर दरवाजाबाहेर होतें पण मन बेगम

व फत्तेखान काय बोलतात याचा कयास बांधण्यांत गढून गेलें होतें, व कानही त्या दोघांचें संभाषण ऐकण्यासाठीं टवकारून उभे होते. तिनें त्या दोघांचें संभाषण ऐकलें तें असें:—

" फत्तेखान ! आजच मीं शहाजीराजांची भेट घेतली व त्यांना तुम्ही सांगितल्याप्रमाणें फितुरीबद्दल जाब विचारला. "

" बरें; मग राजे काय म्हणाले ? "

" ते म्हणाले कीं, ह्या ' चोरांच्या उलट्या बोंबा ' आहेत. त्यांचा उलट तुमच्यावर व जाधवरावांवर असा आक्षेप आहे कीं, तुम्हींच मोंगलांशीं सामील-गिरी चालविली आहे."

" बेगमसाहेबा ! राजांनीं असें सांगावें हें त्यांच्या डावपेंची स्वभावाला साजेसेंच आहे. आतां सच्चा कोण व लुच्चा कोण हें ठरविणें आपल्या मर्जीवर अवलंबून आहे. "

" माझी तर खात्री आहे कीं राजांना तख्ताच्या हितापेक्षां स्वतःच्या हितालाच जपावेसें वाटतें. "

" हें आपणच म्हणतां म्हणून ठीक आहे. "

" शिवाय राजांची आणखी एक गोष्ट मला मुळींच आवडली नाहीं. "

" ती काय ? "

" तुमचा व माझा स्नेह आहे हें पाहून राजांच्या पोटांत दुखतें."

" तें दुखायचेंच. "

" तुम्हांला मीं चांगलें म्हटलेलें राजांच्यानें ऐकवत नाहीं. "

" बरोबर आहे. "

" बरोबर काय ? हे वजीर झाले म्हणून यांनीं आमच्या खाजगी गोष्टींत मन कशाला घालावें ? "

" बेगमसाहेबा ! याचें कारण आपला दुबळेपणा; दुसरें काय ? म्हणूनच मी आपणांला आजवर सांगत आलों. पण पुन्हा पुन्हा त्या त्याच गोष्टींची उजळणी करण्यांत अर्थ काय ? आपणांवर राजांचें वजन पडेनासें झालें म्हणजे ते आपला व माझा सूड घेण्यासाठीं भलभलत्या गोष्टी बोलूं लागतील हें मला प्रथमच माहीत होतें, म्हणूनच मी आपणांला सांगत आलों कीं, हा आयत्या बिळावरील नागोबा आपणांला पुढें नडेल. "

" तो काय मला नडतो ? पण तुम्हांला मी एक विचारणार आहें. मी जर तुम्हांला पुन्हां वजिरातीवर आणायचा प्रयत्न केला, तर तुम्ही पुढें माझ्याशीं कृतघ्न नाहीं ना होणार ? "

त्या दोघांचें संभाषण जुलेखेला पुढें ऐकायला मिळालें नाहीं. कारण धाकटा शहाजादा तिला हाताशीं धरून खेळण्यासाठीं दूर ओढून घेऊन गेला. अर्ध्या घटकेनें ती परत पूर्व जागीं आली तेव्हांदेखील बेगमेच्या महालाचा दरवाजा लावलेलाच होता. पण ती तिथें येऊन पोंचते न पोंचते तोंच तो उघडला गेला, व बेगम आणि फत्तेखान यांच्या संभाषणाचे शेवटचे धागे मात्र तिच्या हातीं लागले.

" बरें आहे बेगमसाहेबा ! राजांच्या फितुरीच्या उपद्व्यापांवर पायबंद लावण्याचा प्रयत्न मीं खासगी रीतीनें केला तर त्यामुळें आपलें मन मजविषयीं कलुषित होणार नाहीं ना ! '

" प्यारे ! हें काय विचारतां ! तुमच्याविषयीं माझें मन कधींच कलुषित व्हायचें नाहीं. "

" अल्ला की कसम ? "

बेगमेनें यावर कांहीं उत्तर दिलेलें जुलेखेला ऐकूं आलें नाहीं. पण फत्तेखानानें एका अनिर्वाच्य युक्तीनें बेगमेचें तोंड बंद केलें असावें अशी कल्पना मात्र तिला करतां आली.

लगेच फत्तेखान बेगमेच्या महालाबाहेर पडला तो थेट निघून गेला. बेगम खिडकींतून त्याच्या मावळत्या मूर्तीकडे टक लावून पाहात उभी राहिली होती.

आतां जुलेखेला बेगमेपाशीं जायला हरकत नव्हती. महालाचा दरवाजाही उघडाच होता. जुलेखेलाही आज झाला हा एकंदर प्रकार पाहून अत्यंत विस्मय वाटत होता. बेगम सध्यां जो मार्ग स्वीकारते आहे तो चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या देण्यासारखा धोक्याचा आहे हें जुलेखा पूर्णपणें ओळखून होती. त्याची जाणीव बेगमेला वेळींच व्हावी ह्या इराद्यानें ती तशीच बेगमेच्या महालांत गेली. तिच्या मागोमाग अल्पवयी बादशहा व शहाजादा हे दोघेही गेले.

एकाएकीं महालांत कोण आलें म्हणून बेगम फत्तेखानावरची नजर ढवळून मागें वळून पाहात म्हणाली, " जुलेखा ! तरी म्हटलें, कोण आलें ? "

" बेगमसाहेबा ! खानसाहेबांशीं इतका वेळ कसलें खलबत चाललें होतें ? " जुलेखेनें गंभीर चर्या करून विचारलें.

" खलबत कसलें ? ह्या राज्याच्या उलाढाली ! " बेगम न्यायाधीशासमोर उभा करण्यांत आलेला खराखुरा गुन्हेगार जितक्या भित्रेपणानें बोलतो तितक्या भित्रेपणानें उत्तरली.

" अलीकडे खानसाहेब पुन्हा बेगमसाहेबांच्या मर्जीत ठसूं लागलेले दिसतात ! " जुलेखा पूर्वीच्याच गंभीर वृत्तींत म्हणाली. ज्याच्या पोटांत दुखतें तें मिरपूड मागतें या न्यायानें बेगम कांहींशीं घुस्श्याला येऊन म्हणाली, " जुलेखे ! ह्या तुझ्या टोमणेवजा भाषेचा अर्थ काय ? "

" तो बेगमसाहेबांना चांगला कळतो. "

" म्हणजे तुला आम्हां दोघांच्या वर्तनाविषयीं संशय येतो कीं काय ? "

" माझें एकटीचें काय घेऊन बसलां ? पण जन जें बोलतो, तें तरी ध्यानीं घेऊन वागायला हवें ना ? "

" जन काय बोलतो ? मीं तर कुठें कांहींच ऐकलें नाहीं ! "

" जन कांहीं कोणाविषयीं ज्याच्या त्याच्या तोंडावर बोलत नाहीं ! दुसरें असें कीं झोंपीं गेलेल्याला कोणीतरी जागें करूं शकेल; पण जाग्याला जागें कोण करूं शकेल ? बेगमसाहेबा ! मी कधीं नव्हत्याची आज इतकी स्पष्ट बोलत्यें याबद्दल मला कसूर माफ करा. पण फत्तेखानाविषयीं मी आपणांला प्रथमपासून वेळोवेळीं सावध करीत आल्यें आहें. आपण हरिणी पडलां, व तो पडला वाघ—"

" हरिणी कसली ? खानाचें वावगें आचरण जर मला दिसलें, तर मग मी वाघीण नव्हे; नागीण आहें—"

" कबूल ! पण आपण नागीण पडलां तरी तो पडला गारोडी ! शहाजीराजांसारख्यांना ही नागीण डसवायला उपयोगी पडावी म्हणून तो गारोडी नागसुराच्या जोरावर तिला गुंगवून आपल्या कह्यांत आणील—"

" जुलेखे ? मला वाटतें, शहाजीराजांनीं तुला वकीलपत्र दिलेलें दिसतें ! "

" आचरण बिघडलेल्या दृष्टीला जिकडे तिकडे बिघाडच दिसायचा. "

" जा ! जा ! जुलेखे ! तूं बाहेर जा पाहूं ! तुझें डोकें आज ठिकाणावर नाहीं. " बेगम रागाला येऊन म्हणाली.

" माझें डोकें आज ठिकाणावर आहे; पण बेगमसाहेबा ! आपलें पाऊल वांकडया वाटेनें पडूं लागलें, आपली दृष्टि चळूं लागली, म्हणून आपल्याला आज कोणतीच गोष्ट ठिकाणावर नाहींशी दिसूं लागली आहे. " बेगम रागावलेली पाहून जुलेखा न भितां उलट चिरडीला येऊन म्हणाली. "आज-वर उभ्या जन्मात मीं आपल्या तोंडून उपमर्दाचा एकही शब्द ऐकला नाहीं, तें आज आपण बोलायला सुरुवात केली आहे. हा आपल्या डोळयांवर चढ-लेल्या नशेचा परिणाम आहे. "

" जुलेखे ! मी बेगम आहें, व तूं माझी दासी आहेस. "

" होय, पण म्हणून काय झालें ! नीतीधर्माचे निर्बंध रावापासून रंका-पर्यंत सर्वांनीं सारखेच पाळायचे असतात. तुम्हांला माझें बोलणें जर रुचत नसेल तर मी आजपासून बोलायची नाहीं. नेहमींच्या त्या तुम्ही आज उरला नाहीं. बेगमसाहेबा, आज तुमचा नूर बदलला आहे हें मला स्पष्ट दिसतें आहे. एरव्हीं बेगम आणि दासी हा भेद आपण बोलून दाखवला नसता. "

बोलतां बोलतां जुलेखेच्या डोळयांत आंसवें उभीं राहिलीं व कंठ दाटून आल्यामुळें पुढें बोलवेना. अल्पवयी बादशहा व त्याचा धाकटा भाऊ आपली आई रडूं लागलेली पाहून कावऱ्या बावऱ्या नजरेनें तोंडाकडे पाहूं लागले. धाकट्या शहाजाद्यानें तर धांवत जाऊन जुलेखेच्या गळयाला मिठी मारून आपल्या रेशमी आंगरख्याच्या टोकानें तिचीं आंसवें पुशीत विचारलें, " मा ! तुम रोती क्यों ? "

जुलेखा शहाजाद्याच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून पण त्याला आपल्या मांडीवर बसवून घेऊन बेगमेकडे वळून म्हणाली, " बेगमसाहेबा ! मीं जी बाद-शहांच्या पश्चात् आपल्या पायांची दासी होऊन आपल्या पदरीं राहिल्यें ती ह्या दोन रत्नांसाठीं. हा मायापाश मला तोडवेना म्हणून. आणि खानाच्या बाबतींत देखील मी जी इतकी सावधपणानें वागायला आपल्याला वेळोवेळीं सांगतें, ती—" जुलेखा अल्पवयी बादशहाला जवळ घेऊन म्हणाली, " ह्या गादीच्या धन्यांचें नेणतेपण आहे व ह्या त्यांच्या नेणतेपणांत तो सैतान ह्यांच्या जिवावर एखादी आफत ओढून आणायलादेखील शरमायचा नाहीं

अशी माझी खात्री आहे म्हणून. आपणच सांगा, खानाचा अंतस्थ कावा तसा असला तर तो आपणांला रुचेल का ?"

जुलेखेचा हा प्रश्न बेगमेच्या अंतःकरणांत तीक्ष्ण बाणासारखा घुसला. खरें पाहूं गेलें असतां ह्या जातीचा बाण मातृहृदयावर जास्त परिणामकारक होतो. मातेला—तिच्या अंतःकरणाला व तिच्या इतर कामुक मोहांना विद्ध करून सदसद्विवेकबुद्धीला तेवढ्यापुरतें तरी डोकें वर करायला वाव करून देतो. बेगम आज फत्तेखानाला पाहून शृंगारविषयक वासनांनीं बरीच बेहोश झाली होती. तरी ह्या आपल्या पोटच्या अर्भकांचे बळी पडतील अशी शंका—नुसती शंका जुलखेनें प्रदर्शित करतांच तिचे कामानें अंध बनलेले नेत्र तेवढ्यापुरते तरी खाडकन् उघडले. तिची सदसद्विवेकबुद्धि तेवढ्यापुरती तरी जागृत झाली. फत्तेखानाचा आपणाशीं सलगी करण्यांत असा दुष्ट हेतु आहे अशी कल्पना होतांच अशा दुष्टाला यापुढें जवळ करूं नये असें तिला वाटूं लागलें. त्या उपऱ्या शहाणपणाच्या भरांत ती बोलून गेली, "जुलेखे, असें जर फत्तेखानाचें अंतःकरण काळेंकुट्ट असलें तर तूंच पाहाशील, माझ्या हातून त्याला कुत्र्याच्या मोतीचें मरण येईल. मी याची पुरी चौकशी करीन. आजवर मीं त्याला जवळ केला याचें कारण आज तरी तो सलतनतीच्या रक्षणासाठीं मनोभावानें झटतो आहे म्हणून. माझ्या सलतनतीचा फडशा करायला सोकावलेल्यांची शिकार करण्यासाठीं हा शिकारी चित्ता मीं जवळ केला आहे, इतकाच त्याचा माझा संबंध. पण हाच चित्ता माझ्यावर, माझ्या मुलाबाळांवर उलटतो असें पाहातांच तो माझ्याहातून जिवंत सुटेल तरी कसा ?"

जुलेखेनें ओळखलें कीं, बेगमेची ही उपरति प्रसूतिवैराग्याप्रमाणें किंवा स्मशानवैराग्याप्रमाणें क्षणिक आहे. या ठिकाणीं नुसतें पांडित्य कामीं यायचें नाहीं; बेगम एक बहकत चालली असें गृहित धरून आपणच फत्तेखानाच्या हालचालींकडे डोळ्यांत तेल घालून पाहात बसलें पाहिजे, एरव्हीं तरणोपाय नाहीं. असा मनाचा धडा करून तिनें बेगमेच्या 'होला हो' म्हणून तेवढ्यापुरता तो विषय आवरता घेतला.

## प्रकरण अकरावें

# ओळख पटली

पूर्वी ठरल्याप्रमाणें गोमती रात्रीच्या प्रहरीं सर्वांचा डोळा चुकवून या पडक्या घराच्या पिछाडीला येऊन हिरोजीची वाट पाहात उभी राहिली. तिच्या मागोमाग थोड्या वेळानें दुरून एक मनुष्य येतांना तिला दिसला. बाहेर साधारण काळोख, चांदणी रात्र असली तरी आकाश अभ्राच्छादित असून पाऊस येण्याचीं चिन्हें असल्यानें चांद्रणी रात्र असून नसल्यासारखी होती. त्या काळोखांत मधून मधून वीज कडकडे तेवढा काय तो प्रकाश. पण तो प्रकाश म्हणून उपयोगी न पडता उलट अंधाराची भीषणता वाढ-वायला मात्र कारणीभूत होत होता. गोमती दूरवरून त्या येणाऱ्या मनुष्याकडे पाहात असतां एक दोन वेळां वीज चमकली; पण चमकते न चमकते तों ती नाहींशी झाली. काळोखाचा नाश करणारी विद्युल्लता ही निसर्ग देवतेच्या हातांतील तीक्ष्ण पात्याची तरवार खरी. पण त्या तरवारीचा आघात काळो-खाला ठार मारूं शकला नाहीं, नुसती ओझरती चाट लावून गेला. त्यामुळें शिकाऱ्याच्या शरानें अल्पविद्ध झालेला वाघ शिकाऱ्याच्या भयानें दूर पळण्याचें सोडून अक्राळविक्राळ स्वरूप धारण करून शिकाऱ्याच्या नरडीचा चावा घेण्यासाठीं उलट डरकाळ्या फोडीत त्याच्यावरच तुटून पडावा त्याप्रमाणें काळोख पूर्वीपेक्षांही जास्त घनदाट झाला, व आकाशांतही मेघांचा गडगडाट सुरू झाला. त्या धांदलींत गोमतीला पुढ्यांतली वस्तु दिसण्याची देखील मारामार पडूं लागली, मग दुरून येणारा मनुष्य कोठून दिसणार ? वास्तविक त्यामुळें गोमतीला इतकें निराश व्हायला नको होतें. हिरोजी याच वेळीं यायचा, पण जरा पाव घटका उशीर झाला असेल, तो आतां इतक्यांत येईल; रस्त्यानें येतांना दिसलेला मनुष्य दुसरा कोणी असेल अशी तिला आपल्या मनाची कल्पना करून घेतां आली असती, सामान्य माणसानें तशीच कल्पना केली असती. पण गोमतीची मनःस्थिति आज या सामान्य कोटींतील नव्हती. काल रात्रीं हिरोजीची भेट झाल्यापासून तिच्या सभोंवार कल्पनेंतच कां होईना पण परिस्थितीचें एक नवें जग निर्माण झालें

होतें, व गोमती त्या जगाची अधीश्वरी शोभत होती. राजांचा सूड घेण्या-विषयींची तिच्या मनांतील कल्पना कालपासूनच कोमेजूं लागली होती. शिवाय हिरोजीनें तिचा शेवटचा निरोप घेतांना त्या कल्पनेला पुन्हा एकवार जायबंदी केलें होतें. आतां, कोणतीही गोष्ट आपल्या आवडत्या माणसासमोर देखील तत्काळ कबूल करायची नाहीं हा अनेकांचा स्वभावगुणच असतो. तशांत गोमतीही 'मी म्हणेन तें खरें' ह्या न्यायानें वागणारी हटवादी स्त्री असल्यानें तिनें हिरोजीच्या तोंडावर त्याच्या सूचनेला मान्यता दिली नव्हती. तरी पण तिचें हिरोजीशीं असलेलें नातें ध्यानीं घेतां जगांत अशी एकही गोष्ट नव्हती कीं, जी हिरोजीनें तिला करायला सांगावी व तिनें करूं नये.

गोमती कांहीं आज आढळे तशी उपजतच नव्हती. ती वयानें पंधरा सोळा वर्षांची होईतों व त्यानंतर हिरोजीशीं लग्न होण्याची तिला आशा होती तोंपर्यंत ती अत्यंत सात्विक, सद्‌गुणी आणि सोज्ज्वळ अशीच कुमारिका होती. पण हिरोजीशीं विवाहबद्ध होण्याची आशा तिला उरली नाहीं, या एका कारणामुळेंच तिची वृत्ति पालटली व ती सध्याची गोमती बनली. राजांविषयीं तिच्या मनांत कमालीची सूडबुद्धि वसत होती हें खरें, पण ती सूडबुद्धिदेखील तिच्या निराशेच्या उदरीं जन्माला आलेली होती. अर्थात् ह्या सर्व अनर्थांचें मूळ तिच्या वैवाहिक निराशेंत होतें. ती निराशा हिरोजी भेटल्यापासून हळूहळू नाहींशी होऊं लागतांच तिच्या सहवासांत गोमतीच्या आयुष्याच्या आधारानें वावरणारी राजांच्या सूडाची आसुरी इच्छाही अस्ताला जाऊं लागली. हिरोजीनें तिचा शेवटचा निरोप घेतला, तेव्हां 'श्रीफळ आणि तलवार' यांचा अपहार होतां कामा नये, ही सल्ल्याची पहिली अट गोमतीला कळविली होती व गोमतीनें ती जरी तेव्हां तोंडानें मान्य केली नव्हती तरी मनानें मान्य केली होती.

पुढें गोमती रात्रीं घरीं आल्यापासून एकसारखा त्याच गोष्टीचा विचार करीत होती. सूडाचे विचार तिच्या अंतःकरणांत आतां केवळ पडसादानें वसत होते इतकेंच. पण खरे विचार हिरोजीशीं आपली जन्माची गांठ मारली जाणें शक्य आहे किंवा नाहीं याविषयींचे होते. पण थोड्याशा विचाराअंतीं तिला असें कळून आलें कीं, आपण ज्याअर्थी फत्तेखानाशीं ओळख करून राजांच्या वैरिणीची भूमिका एकवार घेतली आहे, त्याअर्थी ती आपण

यथासांग पार पाडलीच पाहिजे. नाहींतर ती अनर्थाला कारण होईल. खानाची एक गोष्ट सोडून दिली तरी थोड्या दिवसांपूर्वी राजांच्या पदरीं नोकर असलेला व आतां राजांचा शत्रु बनून खानाचा नोकर झालेला सुलेमान आपणांला ज्या अर्थी ओळखतो, त्या अर्थी तो आपणांला अखेर पावेतों नडणें अपरिहार्य आहे, हें गोमती जाणून होती. खानाला काय वाटेल याची तिला मोठीशी पर्वा नव्हती. पण सुलेमानला काय वाटेल याची मात्र तिच्या जिवाला एकसारखी हुरहुर लागून राहिली होती. तिच्या मतें सुलेमान ही दुधारी तलवार होती. तो पहारेवाला पडला व त्याला गोमतीनें आपलें अंतःकरण पहिल्या भेटींतच उतावळेपणानें उघडें करून दाखविलें त्यामुळें तिच्या आयुष्यांत व विशेषतः तिनें सध्यां हातीं घेतलेल्या कारस्थानांत त्याला भलतेंच महत्त्व प्राप्त झालें होतें. आतां गोमती खानाच्या बाजूनें कारस्थानें करीत राहील तर ती सुलेमानच्या मार्फत वेळीं हिरोजीच्या कानावर येऊन हिरोजी बिथरायचा. बरें, ह्या कारस्थानांतून अंग काढून घेऊन हिरोजीच्या तंत्रानें वागूं लागावें तर तोच सुलेमान खानापाशीं जाऊन चुगली करायचा कीं, गोमती ही अशी घरभेदी आहे. ह्या दुहेरी पेंचांतून मार्ग कसा काढावा असा गोमतीला मोठा प्रश्न पडला होता. आपल्या मतें तिनें ह्या गोष्टी ह्या कानाच्या त्या कानाला न कळूं देतां शक्यतों बिनबोभाट पार पाडण्याचा क्रम चालू ठेवला होता. तिच्या युक्त्या ती जाणें. पण हिरोजी भेटल्यानंतर आज सकाळीं कुठलीशी एक तलवार व कुठलेसें एक श्रीफळ गोमतीनें खानापाशीं पावतें केलें होतें. ह्या तिच्या थोर कर्तबगारीबद्दल खानाकडून तिला एक मोत्यांचा कंठा बक्षीस मिळाला होता, व हीं सर्व कारस्थानें यथासांग पार पडल्यावर तिला आपली बेगम करण्याचें वचनही खान बेहोशपणानें बोलून गेला होता. ह्या साऱ्या गोष्टी सुलेमानच्या देखतच झाल्या होत्या. त्यानंतरही खान आणि गोमती अंतर्महालांत जाऊन आणखी कांहीं वाटाघाटी करीत बसलीं होतीं. त्या वाटाघाटी कोणत्या होत्या हें मात्र सुलेमानला कळणें शक्य नव्हतें. तें काम आटोपून गोमती माघारीं आली तेव्हां सुलेमान तिला रिवाजाप्रमाणें देवडीवर भेटला व त्यानें खानाची मर्जी गोमतीवर इतकी सुप्रसन्न झाल्याबद्दल गोमतीचें अभिनंदनही केलें. सुलेमानच्या त्या

अभिनंदनांत कोणता गूढार्थ भरलेला आहे हें ओळखणें गोमतीसारख्या चाणाक्ष तरुणीला मुळींच अवघड नव्हतें. पण तिलाही एकंदर रहस्य–स्फोट करायचा नव्हता. त्यामुळें आपण आणि खान ह्या दोघांनीं मिळून अंत-र्महालांत जाऊन काय काय वाटाघाटी केल्या याचा सुलेमानला मागमूसही लागूं न देतां ती जातां जातां एवढेंच उत्तरली, "सुलेमान ! कांहीं झालें तरी तूं एवढें लक्षांत ठेव कीं, गोमती ती गोमतीच आहे."

सुलेमान ह्या गोमतीच्या शब्दांनीं जरा ओशाळल्यासारखा झाला. त्यानें एकदम विषय बदलला व हिरोजीविषयीं गोष्टी बोलण्याला सुरुवात केली; पण गोमतीला आतां गोष्टी बोलत बसायला फुरसत नसल्यानें ती त्याची तशीच तोंडदेखली समजूत करीत मुद्याची अशी कोणतीच गोष्ट त्याच्या हातीं लागूं न देतां तिथून निघून गेली होती.

ह्या घोटाळ्याशिवाय राजांच्या वाड्यांत गोमतीविषयीं आणखी एक निराळाच घोटाळा निर्माण झाला होता. गंडकी व गोमती ह्या वास्तविक कुणाच्या कोण! दोघीही दासी पडल्या. पण गंडकी गोमतीची सवत नसतांही तिचा अलीकडे सवती–मत्सर करूं लागली होती. त्यामुळें गंडकीचें कामांत लक्ष फारच थोडें असे. गोमती चुकते केव्हां व आपण राणीसाहेबांपाशीं जाऊन चुगली करतो केव्हां अशी संधि शोधण्यांतच तिचें मस्तक भ्रमून राही. आदल्या दिवशीं स्वामीमहाराज वाड्याबाहेर जातांच गोमती त्यांच्या मागो-माग उपाध्येबोवांना भेटण्यासाठीं म्हणून गेली, हें गंडकीनें पाहिलें होतें. त्यानंतर तिनें मुद्दाम गोमतीचा पाठलाग करून ती खानाच्या वाड्यांत गेली ही नाजुक गोष्टदेखील आपल्या स्मरणशक्तींत नोंदून ठेविली होती. त्यानंतर गोमती जेव्हां श्रीफळ व नारळ घेऊन कुणाला नकळत राजांच्या वाड्यांतून बाहेर पडली, त्यावेळींही ती कुठें जाते तें पाहाण्यासाठीं गंडकी तिला नकळत तिच्या मागावर होतीच. ती खानाच्या वाड्यांत गेल्याचें गंड-कीनें आपल्या डोळ्यांनीं पाहिलें होतें. हे दोनतीन प्रसंग गंडकीला कपिला-षष्ठीचे योगसे लाभले होते. ह्या योगांचा जिजाबाईराणीसाहेबांच्या मर्जीतून गोमतीला कायमची हुसकून लावण्याच्या कामीं उपयोग करायचा असें तिनें आपल्या मनाशीं ठरविलें होतें. आज गोमती जेव्हां जेव्हां कोणत्या ना कोणत्या कामानिमित्त राणीसाहेबांपासून जरा दूर होई, तेव्हां तेव्हां गंडकी

राणीसाहेबांच्या कानाला लागून गोमती शत्रूला फितुर आहे, असें विष त्यांच्या कानांत ओतण्याचा प्रयत्न करी. पण गोमतीची अपूर्व बुद्धिमत्ता व अतुलनीय स्वामिनिष्ठा, आणि गंडकीचा मत्सरी स्वभाव यांची जिजाबाईला चांगलीच पारख असल्यानें ती असल्या गोष्टी कधीं मनावर घेत नसे.

इतका राणीसाहेबांचा गोमतीवर विश्वास तरी कां असावा असें गंडकीला वाटून तिनें आजच मिळविलेल्या नव्या माहितीचा रामबाण गोमतीवर सोडला. ती राणीसाहेबांच्या कानाशीं लागून गोमतीनें श्रीफळ आणि तलवार हीं चोरून खानाच्या घरीं पोंचती केल्याचें सांगून मोकळी झाली. पण बुडत्याचा पाय खोलांत या न्यायानें राणीसाहेबांनीं ही बातमी ऐकतांच गोमतीचा तिरस्कार करण्याऐवजी गंडकीचा उपहास मात्र केला. कारण गंडकीनें ज्या श्रीफळाविषयीं ही बातमी सांगितली तें श्रीफळ उभयतां राजाराणींनीं स्वामीच्या आशीवार्दांनुसार पूर्वरात्रींच भक्षण केलें होतें व जी भवानी तलवार गोमतीनें वाड्यांतुन चोरून शत्रूच्या घरीं पोंचती केली असा गंडकीचा तिच्यावर आक्षेप होता. तीच तलवार राजांनीं आज दोन प्रहरीं नित्यनियमाप्रमाणें पुजून सध्याच्या कारस्थानांत जाधवराव, खान वगैरे घरभेद्यांच्या विरुद्ध मदत मिळविण्यासाठीं आपले मामा निंबाळकर यांच्याकडे जातांना आपल्या कंबरेला लटकाविली होती.

इतकेंही करून गंडकी जें बोलली तें केवळच खोटें बोलली अशी मात्र जिजाबाईची कल्पना नव्हती. ह्या एकंदर प्रकारावरून ती मनांत एवढेंच उमजून चुकली कीं, गोमती अशा प्रकारचे परोपरीचे डाव खेळून आपल्या शत्रूला खेळवीत असावी व मांजर आणि उंदीर यांचा हा खेळ पूर्ण झाल्यावर शेवटीं आपण असा विजय संपादन केला हें सांगण्यासाठीं योग्य वेळीं पुढें येण्याचा तिचा इरादा असावा.

गंडकीला ह्या सर्वच गोष्टी अर्थातच अनिष्ट होत्या. आपण गोमतीला गुन्हे करतांना इतकी मुद्देमालासह पकडली असतांना देखील राणीसाहेबांचा आपल्यावर विश्वास बसत नाहीं हें आपलें दुर्दैव असें म्हणून कपाळाला हात लावून बसण्यापलीकडे दुसरें तिसरें कांहींच आतां गंडकीच्या हातीं राहिलें नव्हतें. तरीही ‘ जित्याची खोड मेल्याशिवाय जायची नाहीं ’ या न्यायानें गंडकीनें गोमतीचा दुष्टावा करण्याच्या आपल्या दुष्टव्रताला खळ पडूं दिला

नव्हता. आज रात्रीं गोमती जेव्हां सर्व मंडळींचा डोळा चुकवून हिरोजीला भेटण्यास ठराविक वेळीं बाहेर पडली, तेव्हां गंडकीनें मुद्दाम राणीसाहेबांच्या महालांत जाऊन त्यांना जागें केलें व त्यांच्या महालाच्या खिडकीबाहेर बोट दाखवून म्हटलें, " राणीसाहेब ! मी सांगत्यें त्यावर आपला विश्वास बसत नाहीं ना, मग हें पाहा. हा प्रत्यक्ष पुरावा पाहा ! इतक्या रात्रीं गोमती, ती पाहा आपणां सर्वांचा डोळा चुकवून वाड्याबाहेर जाऊन त्या पडक्या वाड्याच्या पिछाडीला आपल्या कुणा साथीदाराची मार्गप्रतीक्षा करीत उभी आहे.

गंडकी जें बोलली तें जिजाबाईनें प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिल्यामुळें तेवढ्यापुरता तरी तिला गंडकीविषयीं अविश्वास वाटला नाहीं. पण गोमती जी इतक्या अपरात्रीं बाहेर गेली ती आपल्या नाशाचीं कारस्थानें रचण्याकरितां बाहेर गेली नसून आपल्या रक्षणाचीं कारस्थानें रचण्याकरितांच गेली असेल, असा गोमतीच्या ठायीं तिचा अजूनही अढळ विश्वास होता.

" बरें, गंडकी ! तूं आतां जा. गोमती कुणाकुणाशीं काय काय बोलते तें मी पाहातें आणि ती आल्यावर तिची योग्य ती चवकशी करतें. तुला त्याविषयीं चिंता करायचें कारण नाहीं. मात्र आतां गोमती माघारी आली कीं, तिला तशीच्या तशीच माझ्याकडे पाठवून दे. " जिजाबाई गंडकीला म्हणाली.

गंडकी मनांतल्या मनांत गोमतीच्या नांवानें जळत हिरमुसलें तोंड करून तिथून निघून गेली. कांहीं वेळपर्यंत जिजाबाई आपल्या महालाच्या खिडकींत बसून पुढें काय काय होतें, गोमती कुणाला भेटते वगैरे गोष्टी पाहात होती. मध्येंच एक माणूस समोरच्या रस्त्यानें जातांना तिकडे गोमतीनें पाहिला तसा इकडे जिजाबाईनें पाहिला. मध्येंच वीज कडकडली आणि लगेच सर्वत्र अंधारी अंधार मुसमुसून राहिला. आकाशांत मेघांचा गडगडाट होत होता. हें सर्व तिकडे गोमती पाहात होती, तसें इकडे जिजाबाईही पाहात होती. क्षणभरानें तो येणारा मनुष्य पूर्वीपेक्षांही स्पष्टपणें तिकडे गोमतीला दिसला तसाच इकडे जिजाबाईलाही दिसला. त्याला पाहतांच जिजाबाई मनांत म्हणाली, " हा मुसलमान कोण आणि ह्याचें गोमतीशीं काम काय ? गंडकी म्हणाली त्याप्रमाणें गोमती खरोखरच शत्रूला सामील असेल कीं काय ? "

गोमतीनें त्या येणाऱ्या मनुष्याला ओळखलें. त्याबरोबर एखाद्या पर्वताच्या उत्तुंग शिखरावरून आपणांला कोणी एखाद्यानें पर्वताखालच्या खोल दरींत लोटून दिलें कीं काय असा तिला भास झाला. तिची अपेक्षा होती कीं, काल ठरल्याप्रमाणें हिरोजी आपणाला येऊन भेटेल. पण आला तो हिरोजी नव्हता; तो सुलेमान होता. थोड्याच वेळांत सुलेमान गोमतीजवळ आला व तिला म्हणाला, " गोमती ! तूं मला ओळखतेस. मी खानाचा नोकर आहें; पण हिरोजी माझा दोस्त आहे व तो तुझा दिलप्यारा आहे. हें जाणून तुम्हां दोघांचेंही कल्याण व्हावें म्हणून मी नेहमीं झटत असतों. "

गोमती सुलेमानला पुरतेपणीं बोलूं न देतां उतावीळपणानें मध्येंच म्हणाली, " पण या वेळीं तूं नेमका इथें कसा आलास ? तुला या वेळीं मी इथें भेटायचें कबूल केलें नव्हतें. "

" पण तूं हिरोजीला भेटायचें कबूल केलें होतेंस. आज हिरोजी मला भेटला तेव्हां त्यानें रात्रीं तुम्हां दोघांत झालेलें सर्व संभाषण मला सांगितलें.

गोमती एकदम दचकून म्हणाली, " आणि मग तूं त्याला इतर गोष्टी देखील सांगितल्या असशील ? मीं श्रीफळ आणि तलवार स्वाधीन केली हें-देखील त्याला आतां कळून चुकलें असेल ? "

" हो ! मी खोटें कशाला बोलूं ! मी सर्व गोष्टी त्याला सांगितल्या व त्यानें सर्व गोष्टी मला सांगितल्या. त्यावरूनच मला वाटलें कीं, तूं केलीस ही फार भयंकर गोष्ट केलीस. "

" कां रे ? शहाजीराजावर सूड घ्यायची तुझी इच्छा आहे ना ? मग तुझ्या इच्छेला पोषक अशा गोष्टी झालेल्या तुला मानवत नाहींत हें कसें काय ? "

सुलेमान गंभीर होऊन म्हणाला " तें खरें. पण गोमती ! मी मर्द आहें आणि राजेही मर्द आहेत. मर्दांचें शासन मर्दांनें करायचें. तें मी माझ्या तलवारीच्या जोरावर राजाचें शासन करायला समर्थ आहें. त्यासाठीं तुझ्या-सारख्या बायकांच्या बांगड्यांचा वशिला मला नको आहे. दुसरें असें कीं, जितकी मला माझ्या प्रतिज्ञेची काळजी आहे, तितकीच माझ्या दोस्ताच्या व त्याची प्रियतमा तूं म्हणून तुझ्याही हिताची काळजी आहे. तूं जो

अविचार केलास त्यामुळें राजांचा नाश व्हायचें बाजूलाच राहून तूं स्वतःचा नाश मात्र करून घेतलास !"

"तो कसा काय?" गोमतीनें खिन्न होऊन विचारलें.

"शहाजीराजांच्या भवानी तलवारीला जें कोण माणूस पापी हेतूनें स्पर्श करील त्या माणसाचें रक्त प्यायला ती तलवार सदाची तान्हेलेली असते, असें काल रात्रीं हिरोजीनें तुला सांगितलें होतें ना ?"

"हो! सांगितलें होतें खरें."

"मग ते त्याचे शब्द कधींही खोटे व्हायचे नाहींत. हें तुला माहीत आहे?"

गोमतीला यावर काय बोलावें हेंच सुचेना. ती गोंधळून गेली. सुलेमान थोडा वेळ थांबून रागीट मुद्रेनें तिच्याकडे पाहात म्हणाला, "गोमती! भवानी तलवारीचा प्रभाव कधीं दडायचा नाहीं." सुलेमान आपल्या म्यानांतून सरकन तलवार बाहेर काढीत म्हणाला, "ही पाहिलीस, हीच ती तलवार."

"पण ती तुझ्या रे हातीं कशी आली?" गोमतीनें भीतीनें थरथर कांपत विचारिलें.

सुलेमान उत्तरला, "खानानें शहाजीराजांचा सूड घेण्यासाठीं ही तलवार मला बक्षीस दिली आहे."

"बरं मग तुझें म्हणणें तरी काय?"

"माझें म्हणणें एवढेंच कीं, हिरोजी माझा दोस्त म्हणून हा सर्व प्रकार त्याला सांगणें हें माझें कर्तव्य होतें. आणि आतां मित्रकर्तव्य म्हणून त्याच्या सांगण्याबरहुकूम मला वागायचें आहे—हिरोजीनें भवानी तलवारीचा प्रभाव तुला सांगितलाच आहे, त्याची प्रचीति तुला आतां या वेळीं पाहावी लागेल."

गोमतीनें ओळखलें कीं, सुलेमान आतां ह्या तलवारीनें आपला घात करायला उठला आहे; पण ही साक्षात् मृत्युदेवता पुढें उभी असतांना देखील गोमती डगमगली नाहीं. ती निर्भयपणानें कांहीं वेळ स्वतःच्या मनाशीं एकंदर परिस्थितीचें निश्चित अनुमान करून म्हणाली, "सुलेमान! मला एक शंका येते आहे. विचारूं कां?"

"शंका कुशंका ऐकत बसायला मला आतां वेळ नाहीं." सुलेमान रागाच्या चढत्या कमानींत उत्तरला.

"पाहूं रे ! जरा तुझा हात पाहूं !" असें म्हणून गोमतीनें तेवढ्यांत चपळाई करून धिटाईनें सुलेमानचा उजवा हात आपल्या हातीं घेतला व डाव्या हातानें त्याची अस्तनी झरझर कोंपरापर्यंत मागें सारून तिथें चांचपटून पाहून समाधानाचा एक दीर्घ उसासा सोडून ती म्हणाली, "ओळखलें, ओळखलें बरें ! तुम्हांला मी ओळखलें. तरी मला कालच जेव्हां मी तुमच्या कानांच्या पाळीवरील तीळ पाहिला तेव्हां असें वाटलें होतें कीं, हा सुलेमान कांहीं खरा सुलेमान नव्हे, शहाजीराजांच्या वतीनें खानाच्या नरडीला डसायला टपून बसलेला साप आहे. आणि आतां तर काय; तुमच्या कोंपराजवळ चामफोड आहे हें मला माहीत होतें. तो मुद्देमाल हा मला सांपडला."

"म्हणजे ? गोमती ! माझ्याविषयीं तुझी कल्पना तरी काय आहे ? मी कोण आहें असें तुला वाटतें ?" सुलेमाननें आपली तलवार अंमळ आंखडती घेत विचारलें.

"तो तुमचा हातच माझ्या वांटणीचें बोलला. तुम्हांला मीं ओळखलें हें तुम्हीं ओळखलेलें नाकबूल केलें तरी तुमचा हातदेखील तें ओळखून चुकला, म्हणून मागें सरला. तुमची वाणी इतका वेळ कठोर होती ती आतां मृदु झाली. तिनेंही याचें कारण मला ओळखलें. पाहूं ! तुमचे डोळे पाहूं !–ह्या अंधारांत नीटसें कांहींच दिसत नाहीं; तरी पाहूं बरें !" गोमतीनें हिरोजीच्या तोंडाजवळ तोंड नेऊन त्याच्या डोळ्यांकडे पाहिलें व म्हणाली, "पाहा ! हे आपले डोळेदेखील जे इतका वेळ लाल-लाल निखाऱ्यांसारखे लाल होऊन माझ्याकडे पाहात होते, ते आतां किती सौम्य झाले पहा ! हिरोजी ! हिरोजी ! हे अवयव तुमचेच खरे; पण ते खरें बोलायला कचरले नाहींत. तुमचें खोटें रूप ह्या अवयवांना देखील रुचत नाहीं; मग मला कोठून रुचेल ? पुरे झालें आतां हें नाटक. एकदां सांगून मोकळे व्हा ना मीच हिरोजी म्हणून !"

"अग वा ! तूं तर अगदीं सरळ माझ्या गळ्यांत पडूं लागलीस !"

"मग काय ? तुम्ही ते नाहीं ना ? नाहीं ना ?"

"नाहीं."

"तर मग मीदेखील ह्या सुलेमानशीं खरें बोलायची नाहीं. सुलेमान ! तुला काय सांगायचें तें मी सकाळींच सांगितलें आहे. तुला तेवढेंच सांगा-

यचें होतें. खानानें श्रीफळ व तलवार मला चोरून आणायला तुझ्यादेखत सांगितलें, तें मी केलें. खान काय किंवा तूं काय, दोघेही मुसलमानच पडलां ना ? मी मेल्यें तरी कधीं मुसलमानाशीं खरें बोलायची नाहीं. कारण खऱ्याची दुनिया मुसलमानांच्या गांवीं नाहीं. ”

“ म्हणजे ? सकाळीं श्रीफळ व तलवार आणून माझ्यासमक्ष खानाच्या स्वाधीन केलीस, व चक्रवर्ती पुरुष निर्माण करण्याचें सामर्थ्य त्या श्रीफळांत आहे असें खानाला वाटून त्यानें तें श्रीफळ आपल्या बेगमेसह अत्यानंदानें भक्षण केलें आणि ही तलवार ही भवानी तलवार राजांचा नायनाट करण्यासाठीं मी त्याच्या विश्वासांतील पहारेकरी राजांचा शत्रु म्हणून मला बक्षीस दिली, हें सारें खोटेंच कीं काय ? ”

“ खोटें कसें ? सारें खरें. जितका सुलेमान हा सुलेमान खरा, तितकेंच तें श्रीफळ खरें व ती भवानी तलवारही खरी. सुलेमान ! आम्ही मराठा-मोळयाच्या बायका म्हणजे तूं काय समजतोस रे ? आम्ही मुसलमानांच्या डावपेंचांनीं फसूं असें तुला वाटलें नव्हे ? बाबा रे ! ही गोमती तुझ्या व खानाच्या दोघांच्याही बारशाला जेवलेली आहे. काय ? मला ठार करायला तुला हिरोजीनें सांगितलें आहे ना ? मग आतां कां थांबलास ? कर मला ठार ! आतां कां भितोस ? ”

सुलेमान पुन्हा तलवार म्यानांत घालीत शांत होऊन म्हणाला, “ गोमती ! तूं मोठी छट आहेत. इतक्या शिताफीनें तूं खानाच्या डोळयांतलें काजळ काढून घेऊन पळालीस ! ”

“ मग ! उगाच नाहीं हिरोजी माझ्यावर इतका भाळला होता तो.” गोमती डौलानें हंसत हंसत म्हणाली.

“ एकूण तूं शहाजीराजांच्या नाशावर टपलेली होतीस हें खोटें म्हणायचें तर ? ”

“ तें खरें कीं खोटें, तें मी तुझ्यापाशीं कशाला सांगूं ? मला काय सांगायचें तें मी हिरोजीपाशीं सांगेन—पण नाहीं. मी हिरोजीला देखील कांहीं सांगायची नाहीं आतां. मला काय सांगायचें तें मी राजांपाशीं सांगेन, व त्यांच्याकडून त्याची खाशी कानउघाडणी करायला लावीन. बरें मग जाऊं मी ? ” असें विचारतां विचारतां गोमतीनें सहज मागें वळून पाहिलें. तों जिजाबाई-

च्या महालाची खिडकी तिला उघडी दिसली व तिथल्या दीपप्रकाशांत कोणीतरी खिडकींत बसल्याचा भास झाला. राणीसाहेबांच्या महालांत राजा —राणीशिवाय दुसरें कोण असणार ! त्यांतून राजे आज आपल्या आजोळीं गेल्याचें गोमतीला माहीत होतें. अर्थात् ह्या राणीसाहेबच असाव्या अशी गोमतीची खातरजमा व्हायला वेळ लागला नाहीं. राणीसाहेबांपाशीं गंडकीनें चुगली केली असेल, म्हणून त्या आपणाकडे पाहात आहेत, हेंही त्या चाणाक्ष मुलीनें तेव्हांच ओळखलें. पण आपला दाम खरा असल्यावर आपल्याला भय कसलें असा विचार करून ती न डगमगतां सुलेमानला म्हणाली, "त्या पाहा राणीसाहेब खिडकींतून पाहात आहेत. आतां करूं का ओरड हा खानाचा पहारेवाला मला ठार मारायला आला आहे म्हणून ! म्हणजे तुझी व तुला माझा खून करायला शिकविणाऱ्या त्या हिरोजीची, दोघांचीही चांगलीच खोड मोडेल."

आतां राणीसाहेबांसमोर आपली फजिती होणार असें पाहून सुलेमान गडबडला. त्याची गडबड उडालेली पाहून गोमतीनें जास्त जोरानें पण वाढत्या उल्हासानें विचारलें, "आतां हा सुलेमानी कावा सोडून ओळख देतां कीं मी नेऊं राणीसाहेबापाशीं तक्रार कीं तुमच्या सैन्यांतले शिपाई असे मुसलमानांचे वेश घेऊन आम्हांला छळतात म्हणून ? मग मी जुन्या ओळखीदेखी कांहींदेखील आठवायची नाहीं हो ! राणीसाहेबांना काय किंवा दुसऱ्या कुणाला काय, हिरोजी व गोमती यांची ओळख आहे हेंदेखील माहीत नाहीं. त्यांना जर मीं असें सांगितलें, राणीसाहेबांची दासी आहें मी; व मी एकटी असें पाहून माझ्याशीं लगट हिरोजीनें केली. तर मग पुढें काय होईल तें तुमचें तुम्ही पाहा ! आतां या घटकेला हिरोजी भेटला तर गोमती त्याची आहे. नाहीं तर मग ती त्याला मेली व तो तिला मुकला."

"असें कसें होईल ? असें होईल कसें ?" सुलेमान गोमतीचा हात धरून तिला खिडकींतून राणीसाहेब पाहात होत्या म्हणून जरा आडोशाला ओढून म्हणाला. "गोमतीच्या तोंडचे शब्दच सांगत आहेत, गोमती हिरोजीला मिळणार कीं हिरोजी गोमतीला मुकणार तें. नुसती शब्दांची भीति दाखवायची तीदेखील गोमतीला दाखवितां येईना, 'तो तिला मेला' एवढी ठसठशीत भाषादेखील जिला हिरोजीबद्दल वापरतां येईना,

ती राणीसाहेबांना किंवा राजेसाहेबांना सांगून हिरोजींचें काय पारिपत्य करायला लावील तें तिचें तोंड दिसतेंच आहे !"

" पाहा बरें ? मी ओरडेन ! "

" ओरडशील ? तूं ओरडशील तर मी तुझें तोंड असें–हें असें बंद करून टाकीन. सांग, आतां कशी ओरडशील ? "

गोमतीचें तोंड बंद झालें खरें. पण तें कसें बंद झालें हें त्या अंधारांत कोणालाही दिसण्यासारखें नव्हतें. एवढें मात्र खरें की गोमतीनें इतक्या धीटपणानें सुलेमानचा प्रतिकार न करतां त्याला तेवढ्यापुरतें तरी आपलें करग्रहण करूं दिलें, तें तो सुलेमान खरा नसून खरा हिरोजीच आहे व त्यानें खानाच्या डोळयांत धूळ फेंकण्यासाठीं मुसलमानी वेष व नांव उसनें घेतलें आहे हें ओळखूनच करूं दिलें. आणि हिरोजीनें तरी श्रीफळ व तलवार यांच्या घालमेलीबद्दल गोमती निर्दोषी आहे, इतकेंच नव्हे तर त्या निमित्तानें खानाच्या डोळयांत धूळ फेंकण्याच्या बाबतींत तिनें आपल्यावरही ताण केली आहे, हें ओळखूनच तिच्याशीं इतकें आपुलकीचें वर्तन ठेवलें.

" मग काय ? सुलेमान आणि बिजली ही जोडी छत्रपति जन्माला येईपर्यंत कायमच राहायची ना ? " गोमतीनें जरा वेळानें सुलेमानला विचारलें.

" हो. जोडी कायम राहायची. पण खानाशीं वागतांना तूं स्वतःला मात्र जपलें पाहिजेस. तसेंच माझा आणि तुझा संबंध पूर्वीपासून असा आहे हें राणीसाहेबांच्या किंवा राजेसाहेबांच्या कानावर मुळींच जातां कामा नये."

" त्याची काळजी तुम्हांला. मी असल्या किती खानाना पुरून उरेन. इतकेंही करून तो जातीवर गेलाच, त्याचे डोळे माझ्यावर खुपू लागलेच, तर द्रौपदीची अब्रू घ्यायला टपलेल्या कीचकाला बल्लवरूपी भीमानें जसें यमसदनीं पाठविलें तशी त्या सैतानाची वाताहत लावायला हा सुलेमानी हिरोजी तिथें हजर आहेच. मग मला कसलें भय ? "

" ठीक आहे. आतां आपण आपापल्या कामगिरीवर जावें हें बरें. पण तूं एक मात्र लक्षांत ठेव, राणीसाहेब तुला विचारतील, तूं त्या मुसलमानाशीं कां बोलत होतीस म्हणून."

" त्याची काळजी तुम्हांला नको म्हणतें ना ? तें माझें मी पाहून घेईन."

असें म्हणून गोमती वाड्याकडे वळली. तिच्या मागोमाग सुलेमानही दुसऱ्या वाटेनें खानाच्या वाड्याकडे चालता झाला.

सुलेमानचा तर्क कांहीं खोटा नव्हता. गोमती वाड्याच्या आंत पाऊल टाकते तोंच गंडकी समोर येऊन म्हणाली, "गोमती ! राणीसाहेब तुझ्यावर रागावल्या आहेत. त्यांनीं तुला आतांच्या आतां माझ्याबरोबर महालांत बोलाविलें आहे."

गोमतीनें ओळखिलें कीं, राणीसाहेबांना आपला संशय आला असावा. पण तो दूर करायचें सामर्थ्य तिच्या अंगीं असल्यानें ती जरादेखील न डगमगतां गंडकीबरोबर राणीसाहेबांच्या महालांत गेली.

"गोमती ! तूं आतां कोणाशीं बोलत होतीस ?" जिजाबाईनें रागानें विचारलें. आतां गोमतीची कशी फजिती होते हें पाहाण्यासाठीं गंडकी जवळच उभी होती.

गोमती म्हणाली, "राणीसाहेब ! आपल्या मनांत माझ्याविषयीं काळें आलें आहे हें मीं ओळखलें. पण मी बोलत होतें तो आपलाच बातमीदार होता. यापेक्षां जास्त कांहीं तूर्त आपण मला विचारूं नये."

"कोण तो बातमीदार ?" जिजाबाईनें विचारलें.

"राणीसाहेब ! भिंतीला कान असतात." गोमती गंडकीकडे मुद्दाम पाहून म्हणाली, "लुब्री केव्हां कशी लावालावी करतील याचा कांहीं नेम नसतो."

जिजाबाईनें गोमतीच्या बोलण्यांतील आशय ओळखला. लगेच तिनें गंडकीला बाहेर जायला सांगितलें, आणि नंतर गोमतीला विचारलें, "गंड-कीची तुझ्याविरुद्ध अशी तक्रार आहे कीं--"

"तें मीं ओळखलें. गंडकी इतका गोंधळ माजवील असें मला स्वप्नच पडलें होतें. पण असा गोंधळ माजवायचा तरीसुद्धां माणसाच्या अंगीं अक्कल असावी लागते हें तिला कळलें नाहीं. श्रीफळ आणि तलवार ह्याविषयींच गंडकी बोलली ना ?"

"होय"

"तर मग तो एकंदर प्रकार असा आहे." असें म्हणूच गोमतीनें जिजाबाईला अंतर्महालांत घेऊन सर्व गोष्टी खऱ्याखुऱ्या सांगितल्या. सांगि-

तल्या नाहींत अशा फक्त दोनच गोष्टी. पैकीं पहिली हिरोजीच्या व तिच्या प्रेमसंबंधविषयींची; ती सांगणें अप्रयोजक होतें. दुसरी गोष्ट आजवर तिच्या मनांत वसणाऱ्या राजांविषयींच्या सूडाची. पण आतां ती सूडबुद्धि मावळल्यावर तिच्या निवेदनाचें महत्त्व तरी काय राहिलें ?

प्रकरण धारावें

## माहुलीच्या किल्ल्यावर

फत्तेखानानें बेगमेपाशीं जरी राजनिष्ठ राहाण्याचें वचन दिलें होतें तरी तो अखेर दिल्लीचा बादशहा शहाजहान याच्या मीरजुम्ला नांवाच्या सरदाराला सामील झालाच. जाधवराव आणि फत्तेखान यांची दोस्ती अगोदरच जमलेली असल्यामुळें जी योजना फत्तेखानाची तीच जाधवरावांची असें समजणें कांहीं वावगें झालें नसतें. मीरजुम्ला ज्या वेळीं दिल्लीहून दक्षिणेकडे आपल्या अफाट फौजेसह यायला निघाला त्या वेळीं फत्तेखान आणि जाधवराव हे उघड उघड शहाजीशीं विरोध करून त्याला जाऊन मिळाले. पण तरी देखील फत्तेखानावरचा बेगमेचा विश्वास उडाला नाहीं. ह्या दोन महिन्यांत बेगम आणि फत्तेखान यांची पूर्वीपेक्षां कितीतरी जास्त दिलजमाई झाली होती. जुलेखा बेगमेची इतकी जिवश्चकंठश्च मैत्रीण; पण तिचा आतां पूर्वीचा तो बोज बेगमेपाशीं राहिला नव्हता. दोन महिन्यांपूर्वी जी बेगम रात्रीं बेरात्रीं जुलेखेच्या हातीं खानाला निमंत्रण पाठवायला लाजली तीच बेगम आज खानाशीं हास्यविनोद करायला व परोपरीनें आमोदप्रमोदांचे चाळे करायला, मद्याचे पेले भरून आणायला किंवा पंख्यानें वारा घालायला जुलेखेला लाजेनाशी झाली. ह्या दोन महिन्यांतील फत्तेखान बहुधा महत्त्वाच्या राजकारणाच्या गुंतागुंती सोडविण्याच्या निमित्तानें बेगमेच्या महालांत पडलेला असे. वस्तुतः शहाजीराजे हे वजीर. पण आतां बेगमेपाशीं वजिराची पूर्वीइतकी किंमत राहिली नव्हती. जनांत दिसायला

ते अजून वजीर होते, सर्व राज्यसूत्रें त्यांच्या हातीं होतीं, बेगम त्यांची मधून-मधून भेटही घेई, त्यांच्याशीं वाटाघाटीही करी; पण ह्या सर्व गोष्टी बेगम केवळ इतरेजनांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठीं करी. फत्तेखान हा आपला मित्र आहे, ही गोष्ट तिला फोडायची नव्हती. आणि म्हणूनच शहाजीराजे फत्तेखानाचे प्रतिस्पर्धी म्हणून फत्तेखानाच्या सुरक्षिततेसाठीं त्यांना राखून घेणें हें तिचें काम होतें. वस्तुतः अलीकडे राजकारणांत बेगमेचें अंग असें मुळींच नव्हतें. ती फत्तेखानाच्या संगतींत विलासविहारांत दंग होऊन गेल्यावर राज्याच्या भानगडीचा विचार करण्याला तिला फुरसत कुठून मिळणार ! एखादा व्यसनी मनुष्य दारू, अफू किंवा चंडोल अशा मादक पदार्थांचें सेवन करून बेहोश झाल्यावर त्याची ब्रह्मानंदी टाळी लागते व त्याचा स्वतःचा देहच त्याला सांभाळतां येईनासा होतो; आणि त्याला सभोंवारच्या जगाकडे पाहाण्याचेंही भान उरत नाहीं. अशीच हुबेहूब बेगमेची अवस्था होती. तिकडे शहाजीराजे राजकारणाच्या भानगडी पाहात होते, फत्तेखान त्यांच्याशीं झगडत होता, जाधवराव वगैरे अनेक मंडळी शहाजीराजांविरूद्ध सामील होती; अशा स्थितींत वस्तुतः बेगमेनें जरा दूरदर्शीपणानें वागायला पाहिजे होतें. पण तसें झालें मात्र नाहीं. त्यामुळें फत्तेखानाला नव्हे नव्हे तीं कारस्थानें रचायला फावलें. मीरजुम्ला निजामशाहीवर चालून येतो आहे ही बातमी जेव्हां शहाजीराजांनीं बेगमेच्या कानावर घातली तेव्हां बेगमेनें फत्तेखानाला त्याच्याविरुद्ध शहाजीराजांना मदत करायला सांगितलें. फत्तेखानानेंही तें कबूल केलें. पण त्याप्रमाणें केलें मात्र नाहीं. मुळांतच जर मीरजुम्ला हा फत्तेखान, जाधवराव वगैरे मंडळींच्या अंतःस्थ शिकवणीवरून चालून येत होता तर त्याच्याशीं तीच त्याची साथीदार मंडळी कशी लढणार ! आपणाला गोत्यांत आणायचा हा या सर्व मंडळींचा डाव आहे हें शहाजीराजे ओळखून चुकले होते. पण तसें बेगमेपाशीं बोलायची सोय नव्हती, त्यामुळें प्राप्त परिस्थितीला जसें तोंड देतां येईल तसें देणें त्यांना अपरिहार्य होऊन बसलें होतें. शहाजीराजांच्या मनांत अजूनही अढळ स्वामीनिष्ठा होती. प्राप्त संकटांतून निजामशाही, बेगम व तिची दोन्ही मुलें यांना सुरक्षित कसें राखतां येईल हा मोठा पेंचाचा प्रश्न त्यांचेसमोर होता. कारण इकडे पाहावें तर फत्तेखानाविरुद्ध बेगमेपाशीं एक

शब्दही काढण्याची आतां सोय उरली नव्हती. बरें, फत्तेखानाच्या चाळयां-कडे उपेक्षाबुद्धीनें पाहावें; तर तसेंही करतां येण्यासारखें नव्हतें. या एकंदरींत वाटाघाटींतील फत्तेखानाचा डाव उघड उघड असा होता कीं, राजांना निजामशाहींतून हुसकून लावून आपण त्यांच्या जागीं वजीर बनावें, व बेगम अनायासें आपल्या मुठींत आली आहे तिच्या जिवावर निजामशाहीचा उप-भोग आपण घ्यावा. इतकें सारें साधलें नाहीं तर प्रथम दिल्लीच्या सरदाराला सामील होऊन शहाजीराजांना उलथून पाडायचें व मग पुढचे बेत हळूहळू साधायचे असाही फत्तेखानाचा मानस होता.

जाधवरावांची मनोवृत्ति फत्तेखानाहून बरीचशी भिन्न होती. त्यांना शहा-जीविषयीं संताप वाटत असे, व भोसले वंशाचा नक्षा उतरण्यांत त्यांना समाधानही वाटलें असतें. पण ह्या चुरशीच्या सामन्यांत शहाजीराजाचें समूळ वाटोळें व्हावें असें त्यांना कधींही वाटलें नाहीं. तसें वाटणें शक्यही नव्हतें. ते किती झाले तरी सासरे जांवई पडले. जिजाबाई ही जाधवरावांची एकुलती एक आवडती कन्या, तिच्या दुःखाला कारण होईल अशी गोष्ट करायला जाधवराव सहसा धजावले नसते. ते फत्तेखानाच्या वतीनें मोंगल सरदाराला सामील झाले खरें; पण त्यांत त्यांचा हेतु शहाजीला बुडविण्या-चाच केवळ नव्हता, तर निजामशाहीचा पराभव करून दिल्लीच्या बादशहा-मार्फत निजामशाहीची वजिरी आपल्याकडे मिळविण्याचा होता. पण खानानें इकडे जसें बेगमेला घेरलें होतें, तसेंच तिकडे जाधवरावांनाही घेरलें होतें. जाधवराव व शहाजी या सासरेजावयांमधून विस्तवदेखील जात नव्हता.

अशी एकंदर परिस्थिति असतां दिल्लीचा सरदार मीरजुम्ला आपल्या अफाट सैन्यासह निजामशाहीवर चालून येत असल्याच्या बातम्या येऊन धडकूं लागल्या. त्याचें पारिपत्य करण्यासाठीं म्हणून फत्तेखान आणि जाधव-राव जे सामोरे गेले ते त्यालाच जाऊन मिळाले. जरूर त्या उपायांनीं शहा-जीचा मोड करण्याची मोकळीक खानानें बेगमेपासून अगाऊच मिळविली होती. त्यामुळें खान उघडउघड जाऊन शत्रूशीं सामील झाला तरी त्यांतही खानाचा एखादा अंतःस्थ राजकारणी डावपेंच असेल असें बेगमेला माना-यला जागा होती. मीरजुम्लाखानाच्या मनांतून थेट दौलताबादेवर चालून जाऊन लढाई द्यायची होती. पण अशा मैदानमुलखाची लढाई आपणाला

जास्त मारक होईल, हें शहाजीराजांनीं ओळखून ताबडतोब बेगम व अल्प-वयी सुलतान यांच्यासह कोंकणांतील माहुली किल्ल्यांत जाऊन ठाणें दिलें. या वेळीं बेगमेची विश्वासू दासी जुलेखा खानाचा विश्वासू पहारेकरी सुलेमान व शहाजीराजांचा सारा कबिला त्यांच्या दासदासींसह त्यांच्याबरोबर होताच. जिजाबाईला हा तिसरा महिना असल्यामुळें तिला परोपरीचे डोहाळे लागूं लागले होते. शहाजीराजांना जिजाबाईच्या गर्भवासांत भावी शककर्ता छत्रपति वसत आहे हें माहीत असल्यानें जिजाबाईचा कोणताही डोहाळा अपुरा म्हणून ठेवायचा नाहीं, असा त्यांनी जणूं निश्चयच केला होता. म्हणूनच ह्या लढाईच्या वेळींही ती म्हणाली म्हणून त्यांनीं तिला बरोबर घेतलें. माहुलीच्या किल्ल्यांत जुलेखा व गोमती, तसेंच बेगम व जिजाबाई यांना एकमेकींना भेटण्याचें प्रसंग अनेकवार येऊं लागले. त्यांचा परस्पर परिचयही बराच दाट झाला; पण इतर दृष्टींनीं तो गडवास शहाजीराजांना व्हावा तितका सुखावह झाला नाहीं. राजे सर्व मंडळीसह किल्ल्यावर जाऊन पोंचतांच मीरजुम्लाखानानें किल्ल्यासभोंवार आपल्या अफाट सैन्याचा वेढा दिला. तेव्हांपासून चार सहा महिने त्यांच्या लढाया चालल्याच होत्या. पण फत्तेखान वगैरे मंडळींच्या चोरट्या फितुरीमुळें त्या लढाईचा निश्चित असा शेवट कांहींच होईना.

असा निजामशाहीवर संकटाचा कहर गुदरला असतां पेटत्या चितेवर पोळी भाजून खाण्याचें आंगवळणीं पडलेल्या खानाची निरनिराळीं अंतस्थ कारस्थानें सुरूच होतीं. तिकडे जिजाबाई गरोदर होती तशीच इकडे दैव-वशात खानाची बेगमही गरोदर होती. त्यामुळें खानाला खात्रीलायक वाटूं लागलें होतें कीं, हा गोमतीनें चोरून आणून दिलेल्या श्रीफळाचाच गुण आहे; आतां आपणाला पुत्र होणार व तो अकबरासारखा—नव्हे, अकबरा-पेक्षांही पराक्रमी असा चक्रवर्ती बादशहा शोभणार. मात्र आपण शहाजी-राजांना स्वामीनीं दिलेलें श्रीफळ चोरून आणून भक्षण केलें व त्याचा प्रभाव म्हणून आपली बेगम गर्भवती झाली ही गोष्ट उजेडांत न येण्याची शक्य तितकी खबरदारी प्रथमपासूनच त्यानें घेतली होती; कारण ही निराळी तयारी उजेडांत आली असती तर मग बेगम बिथरली असती.

मीरजुम्ला, फत्तेखान, जाधवराव वगैरे मंडळीला वश झाला व त्यानें दिल्लीच्या शहाजहान बादशहाच्या मनावर ह्या मोहिमेची आवश्यकता ठसवून आपल्या योजनेला संमति मिळविली. त्यांतील अंतस्थ हेतु असा कीं आज निजामशाहीचा धनी अल्पवयी आहे व त्याची आई बेगम तर बोलून चालून बायको, अर्थात् निजामशाही जिंकून दिल्लीच्या साम्राज्याला जोडून टाकायला सोईस्कर अशी हीच वेळ आहे. आपण निजामशाही नेस्तनाबूद करण्याच्या दिल्लीपतीच्या आकांक्षेचें साफल्य तेव्हांच करूं व मग त्या कृतज्ञतेला जागून बादशहा आपणांला निजामशाही राज्याचा एकतंत्री सुभेदार नेमील. मीरजुम्ला व फत्तेखान या दोघां स्वार्थी माणसांच्या दुकलींत जाधवराव 'बीचमें मेरा चांदभाई' या न्यानानें लुडबुडत होते. ते विशेषतः मीरजुम्लाखानाच्या तंत्रानें वागत होते. याचें कारण शहाजीचा मोड झाल्यावर रिकामें झालेलें वजीरपद मीरजुम्लानें फत्तेखानाला न कळत जाधवरावांना देण्याचें अभिवचन दिलें होतें. पण दोघां खानांच्या खासगी बैठकींत योग्य वेळीं जाधवरावांच्या तोंडाला पानें पुसण्याचे बेत घाटत होते त्यांची जाधवरावांना तरी कुठें दाद होती !

अशीं दोघां खानांची कारस्थानें रंगाला येऊं लागलीं, तरी जिजाबाईच्या पोटीं छत्रपती अवतार घेणार ह्या जनवार्तेनें त्या दोघांनाही अत्यंत अस्वस्थ करून सोडलें होतें यांत संशय नाहीं. फत्तेखानानें श्रीफळ चोरून नेण्याची शक्कल लढविली होती खरी; पण तरीही जिजाबाई स्वामींच्या आशीर्वादानुसार व देवीच्या वरानुसार गर्भवती व्हायची ती झालीच ! आतां, श्रीफळ आपण भक्षण केलें त्या अर्थी छत्रपती आपल्या वंशांत जन्माला येणार हें फत्तेखानाला माहीत होतें. पण ते मीरजुम्लाला कळूं नये, त्याला कळल्यास तो ज्याप्रमाणें शहाजीराजांच्या पुत्राला नामशेष करण्यासाठीं टपून बसलेला आहे त्याचप्रमाणेंच आपल्याही पुत्राच्या जिवावर उठायला कमी करणार नाहीं. शिवाय शहाजीराजांना ते नव्या राज्याची अपेक्षा करतात याबद्दल तो राजद्रोही म्हणे. तोच आरोप त्याच्यावर लागू झाला असता. यास्तव इकडे गुपचुप आपल्या घरांत भावी बादशहा जन्मूं द्यायचा व शहाजीराजांच्या घरांत पुत्रजन्म झालाच तर तोच छत्रपतीचा अवतार असा बोभाट सुरू आहे त्याचा फायदा घेऊन त्याचा नायनाट करायचा, अशा अनेक मसलती

फत्तेखानानें आपला विश्वासू नोकर सुलेमान व विश्वासांतील बातमीदारीण गोमती यांच्या साह्यानें पार पाडण्याचें ठरविलें होतें.

ह्या एकंदर कारस्थानांत गोमती व सुलेमान यांची मात्र कमाल होती. त्या दोघांनींही आपल्या अजब करामतीनें शहाजीराजे आणि जिजाबाई यांचा इतका विश्वास व इतकें प्रेम संपादन केलें होतें कीं राजांना वाटे ह्यांच्या ह्या कारस्थानधुरंधरतेपुढें आपली राजकार्यधुरंधरता फिकी आहे. वस्तुस्थिति ही कांहींशी—नव्हे, बहुतांशीं तशीच होती. सुलेमान व गोमती नव्हे हिरोजी व बिजली यांनीं फत्तेखानाचा इतका विश्वास संपादन केला होता कीं खान त्यांच्याशीं वागतांना धनी व नोकर हें नातें विसरून बरोबरीच्या नात्यानें वागे, व शहाजीराजांच्या घरांत छत्रपति जन्माला येण्यापूर्वीच जिजाबाईला पळवून नेण्याच्या कामगिरीवर त्यानें ह्या दोघांची नेमणूक केली होती. एवढें मोठें कार्य शिरावर घेतल्यामुळें त्या दुकलीला मीरजुम्लाची कृपाही अनायासें लाभली होती.

आज गोमतीवर फत्तेखानानें याहीपेक्षां आणखी एक अत्यंत जबाबदारीची कामगिरी सोपविली होती. ती बेगमेच्या मनांत आपणांविषयींच्या आदरभावाचा नंदादीप निरंतरचा खेळत राहील अशी बेगमेसमोर जेव्हां जेव्हां सवड सांपडेल तेव्हां तेव्हां बेमालूम बतावणी करण्याची होय. त्यासाठीं त्यानें आज मुद्दाम गोमतीला बेगमेकडे रवाना केलें होतें. गोमतीनें ह्या नव्या जबाबदारीचाही अत्यानंदानें अंगिकार केला. कारण ह्या नव्या कामगिरीमुळें आपणाला बेगमेच्या अंतरगृहांत प्रवेश मिळून बेगमेची एका काळीं अत्यंत विश्वासांतील पण अलीकडे बेगम फत्तेखानाच्या हातांतील बाहुली झाल्यामुळें तिच्या अविश्वासाला पात्र झालेली दासी जुलेखा हिला आपल्या कटांत सामील करून घेऊन तिचा दुधारी तरवारीसारखा उपयोग करणें अत्यंत सुलभ जाईल अशी गोमतीची खात्री होती.

शहाजीराजे, जिजाबाई, बेगम व अल्पवयी निजामशहा, मीरजुम्लाच्या अफाट सैन्याच्या खड्या पहाऱ्यांत माहुलीच्या किल्ल्यावर कोंडून पडली असतांना तेव्हांच्या राजकारस्थानांची गुंतागुंत जितकी सोडविण्याला अवघड होती त्याहूनही ही अंतःपुरांतील कारस्थानांची गुंतागुंत सोडविण्याला जास्त अवघड होती.

प्रकरण तेरावें

# जिजाबाईचे डोहाळे

शास्त्रीबुवा पुराण वाचीत होते व जिजाबाई राणीसाहेब जवळ बसून ऐकत होती.

**युद्धासि गुंतला अर्जुन । इकडे काय झालें वर्तमान ।**
**चक्रव्यूह गुरुद्रोण । रचिता झाला अद्‌भुत ।।**

" वाचा पाहूं शास्त्रीबुवा ! ती ओंवी पुन्हा वाचा. " जिजाबाई म्हणाली. अर्जुन युद्धाला गुंतला तों गुरुद्रोणांनीं इकडे चक्रव्यूह रचिला, हें ऐकून तिला तिच्या सध्यांच्या परिस्थितीची जाणीव झाली. शहाजीराजे मीरजुम्ला-शीं झगडून निजामशाही तारण्यासाठीं रक्ताचें पाणी करीत आहेत, व इकडे जाधवराव शत्रूचे साह्यकारी होऊन राजांच्या विरुद्ध गुरुद्रोणांप्रमाणें चक्रव्यूह रचण्याच्या ऐन रंगांत आहेत, हें चित्र तिच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें.

शास्त्रीबुवांनीं पहिली ओंवी पुन्हा वाचून त्याबरोबरच पुढें वाचायला प्रारंभ केला:—

**नकूळ सहदेव पांचाळ । अवघे युद्ध करिती सबळ ।**
**परी चक्रव्यूह भेदावया बळ । कोणासही दिसेना ।।**

" खरेंच. ज्याचा तो योद्धा पुढें आल्याशिवाय इतरांच्या हातून काय व्हायचें आहे ! " जिजाबाई म्हणाली. " बरें, पुढें वाचा."

**" धर्म म्हणे असता पार्थ । तरी हा व्यूह भेदिता निश्चित ।**
**तों पुढें होऊनी सुभद्रासुत । धर्मरायासी विनवीतसे ।। "**

" धन्य ! सुभद्रादेवी ! धन्य तुझी ! पुत्र व्हावा तर असा अभिमन्यु-सारखा व्हावा. पुढें वाचा पाहूं ! "

**म्हणे मज आज्ञा द्याल जरी । तरी हा व्युह भेदीन निर्धारीं ।**
**धर्म म्हणे त्या अवसरीं । तूं बालक कीं सुकुमार ।।**

मग बोले पार्थनंदन । ' आम्हां क्षत्रियां रण होंचे धन ।
ताता तुमचे कृपें करून । व्यूह भेदून जाईन मी ॥
श्याम वर्ण राजीव नयन । आजानुबाहु सुहास्यवदन ।
जो पांडवांसि प्राणांहून । आवडता पांचासहि ॥
ऐसा तो उत्तरावर । रथावरी चढला सत्वर ।
उदयाद्रीवरी दिनकर । तैसा तेजाळ दिसतसे ॥

" शाबास ! एवढासा पराक्रमी बालक चक्रव्यूह भेदायच्या इच्छेनें इतक्या त्वरेनें रथावर देखील चढला ! धन्य धन्य ! सुभद्रादेवी ! धन्य तुझी ! धन्य त्या वीरमाता, कीं ज्यांना अशा वीरांचें मातृपद प्राप्त होतें." जिजाबाई संतुष्ट चित्तानें म्हणाली. " शास्त्रीबुवा ! अशाच वीरांच्या कथा तुम्ही रोज मला ऐकवीत जा. मला इतर शिळोप्याच्या गोष्टी किनी मुळींच आवडत नाहींत. हें अभिमन्यूचें आख्यान मी आजवर किती वेळां ऐकलें आहे, तरी पुनः पुनः तें ऐकावेंसेंच वाटतें. शास्त्रीबुवा उद्यां तुम्ही जयद्रथवधावर पुराण सांगा."

" हो ! पण आज हें अभिमन्युआख्यान पुरें करतों कीं ! आपल्या गर्भवासांतल्या अभिमन्यूसाठीं आहे हें."

" शास्त्रीबुवा ! म्हणूनच तुमचें आदिलशाहींत पटलें नाहीं. नाहींतर वडील बंधु एवढे मोठे सरदार असतांना तुम्ही असे साधे शास्त्रीबुवा राहिला नसतां." जिजाबाई स्मितपूर्वक उद्गारली.

क्षणभर शास्त्रीबुवा बुचकळ्यांत पडले, राणीसाहेब हा आपला उणेपणा दाखवीत आहेत कीं काय ? पण जिजाबाईच्या चर्येवरील कृतज्ञतापूर्ण प्रसन्नतेनें शास्त्रीबुवांचा संशय दूर झाला. आदिलशाहीचा दिवाण मुरार जगदेव पंडित, याचा हस्तक रायाराव हा शास्त्रीबुवांचा वडील बंधु ! रायाराव नुसता नांवाचा ब्राह्मण आहे, त्याची करणी चांडाळाची आहे, असें जिजाबाईचें ठाम मत होतें. शिरवळ-पुणें-पन्हाळा या प्रदेशांत आदिलशाहीचा कारकून या नात्यानें त्यानें अनर्थ केले होते. सतत आठ वर्षांपूर्वी आदिलशाही व निजामशाही यांच्यांतील बेबनावाचा फायदा घेऊन त्यानें त्या प्रांतात भयंकर धुमाकूळ मांडला होता, व पुणें आणि त्याच्या आजूबाजूचा टापू लुटून जवळच

भुलेश्वरला दौलतमंगल हा लहानसा किल्ला आदिलशहाच्या आज्ञेनें बांधवून तिथें आपलें ठाण माडलें होतें. रायारावाची ही नीच करणी मूळपासूनचीच. म्हणूनच त्याला विटून शास्त्रीबुवा अगदीं लहानपणीं घराबाहेर पडले ते काशीला वेदाभ्यास शिकत होते. तिथून आपल्या वडिलांचा मित्र मलठणकर दादोजी कोंडदेव कुळकर्णी निजामशाहींत कारकून होता त्याच्या आश्रयाला आले. दादोजी हा शहाजीराजांचा चाहता व त्याहीपेक्षां जिजाबाईचा मोठा अभिमानी. शहाजीराजे अथवा जाधवराव यांच्याशीं याचें फारसें पटत नसे. पण जिजाबाई मात्र त्याला फार आवडे. तिला तो आपली मुलगी मानी. तिच्यामार्फत आपण शहाजीराजांना दक्षिणेकडील मुसलमानांच्या जुलमी सत्तेला आळा घालायला लावूं; मुसलमान दाक्षिणेंत देवाधर्माचा उच्छेद करतात, हिंदु बायकांची विटंबना करतात, गो–ब्राह्मणांना छळतात हा जाच शहाजीराजेच मनांत आणतील तर थांबवायला समर्थ आहेत असा दादोजी कोंडदेवाचा भरंवसा. तें कार्य आपण जिजाबाईच्या हस्तें यशस्वी करण्याची त्याला दांडगी उमेद. ह्या आपल्या विचारांशीं ह्या शास्त्रीबुवांचे विचार पूर्ण-पणें जुळतात असें दादोजी कोंडदेवानें पाहिलें, आणि शहाजीराजांपाशीं त्यांची मुद्दाम शिफारस करून त्यांना जिजाबाईच्या तैनातींत पुराण सांगण्यासाठीं शास्त्री नेमून घेतलें. शास्त्रीबुवांचा जाज्ज्वल्य स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान जिजाबाईच्याही आतां पूर्ण परिचयाचा झाला होता. त्यांतही तिला माहीत नसलेली एक गोष्ट म्हणजे तिला दिवस गेलेले कळतांच तिच्या गर्भवासाला आलेल्या भावी शककर्त्याचें चारित्र्य तेव्हांपासूनच उज्ज्वल करण्याचें महान कार्य या वेळेपासूनच शास्त्रीबुवांनी दादोजी कोंडदेवांच्या सूचनेनुसार मनावर घेतलें होतें.

जिजाबाईनें काढलेल्या नव्या विषयाला लीलया बगल देण्याच्या हेतूनें शास्त्रीबुवा कांहीं बोलणार, इतक्यांत गोमती घाईघाईनें पुढें आली आणि म्हणाली, " राणीसाहेब ! आपल्या सभोंवार शत्रु गराडा घालीत आहे हें आपणांला माहीत आहेच. यातून आपण आतां लवकर मोकळें व्हायला हवें. "

गोमतीच्या बोलण्यावर जिजाबाई कांहीं बोलणार तोंच गंडकी पुढें येऊन म्हणाली, " खरेंच राणीसाहेब ! महाराजांचें देखील मत आपण

सकाळीं नाहीं का ऐकलेंत ? आणि आपलीही इच्छा माहेरी जाण्याची आहे. मग आपण दोन दिवस लवकरच कां जात नाहीं ? ”

गंडकीचें बोलून संपतें न संपतें तोंच शहाजीराजे स्वतः तिथें आले आणि जिजाबाईला म्हणाले, “ राणीसाहेबांची निघण्याची तयारी झाली का ? ” जिजाबाई लाजून अंमळ दूर उभी राहून म्हणाली, “ पण इकडच्यावर इतकीं संकटें हरघडी कोसळत असतां मी एकटीच माहेरीं कशी जाऊं ? ”

“ तर मग काय रणकंदनांत आपण अशाच उभ्या राहाणार ? शत्रु दिवसें-दिवस प्रबळ होत आहे. आतां आम्हांला जगायचें तर उघड उघड शत्रूची फळी फोडून बाहेर पडायचा प्रयत्न केला पाहिजे. या वेळीं बेगमसाहेबा आणि निजामशहा यांचें रक्षण कसें होईल याचीच मला काळजी आहे—”

“ पण, राजेसाहेब ! आपली ही काळजी फुकट आहे, बेगमसाहेबांना स्वतःच्या जिवाची किंवा स्वतःच्या मुलांची मुळींच काळजी वाटत नसून खानाच्या नादानें आपणांला काळजींत पाडायचा मात्र त्या कसून प्रयत्न करीत आहेत. ” गोमती म्हणाली.

“ काय, बेगमसाहेबा इतक्या खानाच्या मुठींत गेल्या.”

“ होय. बेगमसाहेबा आतां पूर्वीच्या राहिल्या नाहींत. हल्लींच्या बेगम-साहेबा म्हणजे खानाच्या हातांतील कळसूत्री बाहुलें आहेत.”

“ मग त्यांचा विचार तरी काय आहे ? ” राजांनीं विचारलें.

“ त्यांचा विचार आपणांला सांगितला तर आपण तोंडांत बोटें घालाल. आपण मिरजुम्लाच्या मगरमिठींतून बेगमसाहेबांना आणि त्यांच्या मुलांना सोडवूं पाहातां. पण बेगसाहेबांनीं खानाच्या वतीनें आपल्याविरुद्ध मीरजुम्लाशीं बोलणें चालविलें आहे.”

“ ही गोष्ट खरी का ? ”

“ खरी म्हणजे आपल्या विश्वासांतल्या हेरानें हेरलेली ही बातमी आहे. आणि त्याची प्रचीतीही आपल्यांला इतक्यांतच येईल. म्हणून सांगतें, राणीसाहेबांना शिंदखेडला पाठविण्याचा बेत तूर्त रहित करावा, आणि तूर्त एवढेंच करावें कीं त्यांना ह्या माहुली किल्ल्यावरून काढून जवळपास दुसऱ्या एखाद्या आपल्या खास मालकीच्या आणि मजबुतीच्या किल्ल्यांत नेऊन ठेवावें.”

" मला वाटतें, त्यापेक्षां आपण शिवनेरीवर जाऊन राहावें. शिवनेरीला शह द्यायची कांहीं शत्रूची माय व्याली नाहीं." जिजाबाई म्हणाली.

" पण बेगम एकाएकीं इतकी उलटली कशी याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें. मी पुन्हा एकवार बेगमेला भेटून तिची स्पष्ट कानउघाडणी करणार आहें." शहाजीराजे म्हणाले.

" राजेसाहेब ! आपण कृपा करून माझें ऐका. यापुढें विषाची परीक्षा पाहूं नका. बेगमसाहेबांचें नांव आतां सोडा; आणि आपल्या व राणीसाहेबांच्या रक्षणाची कांहीं तजवीज करा. आपण जर बेगमसाहेबांना सडे भेटायला गेलां तर न जाणो ती वेळीं आपणांला दगाफटका करायलाही कमी करणार नाहीं. इतकेंच काय, पण आपण किल्लापार व्हायचें मनांत आणलें तरीही आपला मार्ग आपणांला वाटतो तितका सुरक्षित नाहीं. एका बाजूनें खानाचे शिपाई दबा धरून बसले आहेत तर दुसऱ्या बाजूनें जाधवरावांचें सैन्य सज्ज आहे. कोणत्याही वाटेनें गेलें तरी फळी फोडूनच जावें लागेल. मला भय वाटतें तें आणखी कसलें नाहीं. खानाचे शिपाई वेळीं राणीसाहेबांच्या जीवालाही बरेंवाईट करण्याला कमी करणार नाहींत." गोमती म्हणाली.

" आणि हें सारें जाधवरावांना सहन होईल ?" शहाजीराजांनीं विचारलें.

" हो ! सहन होईल म्हणजे ? जाधवरावांनीं मोंगलांना तसें वचन दिलेलें आहे असें ऐकल्यें. आज जाधवराव सोयऱ्याधायऱ्या भोंसल्यापेक्षां मोंगलांना जास्त आपलेपणानें ओळखतात. मला कांहीं खरेंखोटें माहीत नाहीं; पण बेगमसाहेबांच्या महालांत मी गेलें असतां जुलेखेकडून मला जी बातमी कळली त्यावरून मला तरी माहीत कीं, जाधवराव या वेळीं जांवई, मुलगी सगासोयरा कुणालाही ओळखायला तयार नाहींत. जाधवरावांनीं म्हणे भावी छत्रपतीला जगापार करण्याचा विडा उचलला आहे व त्याबद्दल मीरजुम्लानें शहाजहान बादशहाकडे रदबदली करून त्यांना दौलताबादेची वजिरी मिळवून द्यायचें वचन दिलें आहे. फतेखान जाधवरावांना ह्या कार्यांत सामील आहे."

" काय ? बाबांना इतका म्हातारचळ लागला ? आपली लेक, आपला जांवई, आपले सगेसोयरे, आपला देश, आपला धर्म, ह्या सर्व गोष्टींपेक्षां

त्यांना परक्या मोंगलांची हांजी हांजी करणें मान्य झालें काय ? ” जिजाबाई रागावून म्हणाली.

“ पाहा. राणीसाहेब ! तुमच्या वडिलांचे हे म्हातारपणचे वेडे चाळे पाहा. उद्यांच्या छत्रपतीला मारायची आजपासून तयारी करणाऱ्या ह्या देशद्रोही जाधवाला जर मी आज देहान्त प्रायश्चित दिलें तर तो माझा अन्याय होईल का ? त्यामळें मी वडिलांचा उपमर्द केल्याच्या पापाचा धनी होईन का ? राणीसाहेब ! तुम्ही सांगतां कीं म्हाताऱ्या माणसाची गय करावी. पण गय करतां करतांच हा गळयाला फास लागायची वेळ आली. मी आजच्या निजामशाहीचा शास्ता, उद्यांच्या छत्रपतींचा जन्मदाता, आणि देवगुरूंच्या आज्ञेनें गोब्राह्मणप्रतिपालनाचें व्रत स्वीकारून त्याच्या सांगतेप्रीत्यर्थ सदा तळमळणारा शहाजीराजा जाधवरावांचे असे अत्याचार कोठवर सहन करूं ? हा त्यांचा अपराधच असा भयंकर आहे कीं, असल्या अघोरकर्म्याला ह्या जगांत जिवंत ठेवल्यानें मीही त्याच्या पापांचा वांटेकरी होईन. यासाठीं राणीसाहेब ! मी आपणांला एवढेंच विचारतों कीं मी माझें कर्तव्य करीत असतां, तुमच्या पित्याला अघोर शासन करण्याचें माझ्या वांट्याला आलें तर त्याबद्दल तुम्ही मला दोष देणार नाहीं ना ? ”

“ मी दोष कशी देईन ? आपण हाच प्रश्न मागें एकदां मला विचारला होता. आपणांला आठवतें का ? ज्या दिवशीं आपण अखेरचे शिंदखेडहून आलां त्या दिवशींच मीं आपणांला सांगितलें होतें कीं, जाधव अन्यायी आहेत, यापुढें त्यांचा कैवार मला घ्यायचा नाहीं. आपण त्यांचें योग्य तें पारिपत्य करा. ” जिजाबाई संतप्त मुद्रेनें म्हणाली. बोलतां बोलतां तिचा चेहरा संतापानें रक्तवर्ण होऊन त्यावर घर्मबिंदु चमकूं लागले. तेथल्या सर्व मंडळीला तें पाहून वाटलें कीं, ही साक्षात् न्यायदेवताच जाधवरावांच्या घोर अन्यायांबद्दल त्यांना शासन करण्यासाठीं आज भूतलावर अवतरली आहे.

शहाजीराजांनाही जिजाबाईचे हे स्वाभिमानाचे व न्यायनिष्ठुरतेचे बोल ऐकून समाधान वाटलें व विस्मयही वाटला. त्यांना काय वाटलें तें त्यांनीं बोलून दाखविलें. “ राणीसाहेब ! आपण इतक्या कर्तव्यतत्पर आहां आणि आपण आतां लवकरच पुत्रवती होणार आहां, हें पाहूनच एखादा निष्णात ज्योतिषी आपल्या बाळाचें भविष्य वर्तवूं शकेल. ”

गोमती मध्येंच म्हणाली, " राणीसाहेबांना जीं रोज लढाईचीं, गोहत्या करणाऱ्या मुसलमानांना मारल्याचीं, देवदेवालयें बांधल्याचीं आणि तीर्थयात्रा केल्याचीं स्वप्नें पडतात तीं शुभलक्षणेंच होत. तसेंच त्यांना पोथ्यापुराणांतून सुद्धां वीरांच्या कथा तेवढ्याच ऐकायला आवडतात. राणीसाहेब साध्या असल्या तरी कितीदा वीरासनच घालून बसतात आणि शिकारीस जातां जातां इतका अचूक नेम मारून शिकार करतात कीं, पट्टीच्या शिकाऱ्यालाही त्यांच्यापुढें हात टेकावे लागतील. या डोहाळ्यांचा अर्थ काय, असें जेव्हां मी शास्त्रीबुवांना विचारलें—"

बोलतां बोलतां गोमतीनें जवळच उभे असलेल्या शास्त्रीबुवांकडे पाहिलें. त्याबरोबर शास्त्रीबुवा आपल्या लाघवी भाषेंत म्हणाले, " मी प्रथमपासूनच सांगतों आहें कीं, हीं राजचिन्हें आहेत. शककर्ता पराक्रमी वीर उदरीं जन्माला येणार त्याच्या जन्मवेळेचे हे शुभशकून आहेत."

" राणीसाहेबांना आज मी कितीक दिवस पाहातें आहें. त्यांना रोजरोज पालखींत बसून शिवालयांत जावेसें वाटतें आणि शिवपूजा करावीशी वाटते." गोमती म्हणाली.

" याचाच अर्थ राणीसाहेबांच्या उदरीं साक्षात् शिवप्रभु अवतार घेणार. त्या शिवजन्माचे हे शुभशकून आहेत." शास्त्रीबुवा जिजाबाईकडे पाहात प्रसन्न मुद्रेनें म्हणाले.

जिजाबाईनें लगेच आपल्या गळ्यांतील कंठा काढून शास्त्रीबुवांना अर्पण केला व ' तुमच्या बोलण्याप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्यावर मी तुमचें तोंड साखरेनें भरीन आणि देवाब्राह्मणांची हत्तीवरून मिरवणूक काढायला लावून त्यांचा गौरव करीन ' असें म्हणून त्यांना नमस्कार केला.

शास्त्रीबुवांचा गौरव झालेला पाहून गंडकीशिवाय इतर सर्वांना आनंद झाला. गंडकी मात्र तें पाहून कांहींशी कष्टी झाली. कारण तिच्या अंगीं राणीसाहेब किंवा राजेसाहेब यांना प्रसन्न करून त्यांच्याकडून असें पारितोषिक मिळविण्याची पात्रता नव्हती. असो.

" बरें, गोमती आणखी काय खबर ? " राजांनीं विचारलें.

" खबरी पुष्कळ आहेत. पण पहिल्यानें आपण राणीसाहेबांना शिवनेरीवर पावत्या करण्याची खबरदारी घ्या. तसें करतांनादेखील आपल्या वाटेंत

अडचणी आहेत. शत्रूचे लोक वाटेंत दबा धरून बसलेले आहेत, आणि त्यांच्या कारस्थानांत सामील होऊन राणीसाहेबांना प्रवासाला लावून पकडून द्यायच्या कामगिरीवर मी आलेली आहें."

"ती बिजलीची कामगिरी झाली; पण आतां आम्हांला माहिती सांगते ही गोमती आहे." शहाजीराजे म्हणाले.

"आणि म्हणूनच बिजलीनें केलेल्या कारस्थानाचा अंत लावून त्याचा निःशेष करण्याला ही गोमती येथें उभी आहे. आजच्या आज जर राणी-साहेबांना इथून हलविलें गेलें नाहीं तर इथें अतिप्रसंग झाल्याशिवाय खास राहणार नाहीं. यासाठीं मी सांगतें असेंच केलें पाहिजे."

"अग पण! तूं म्हणतेस अशा रीतीनें जर राणीसाहेबांना पाठवून दिलें तर आपण होऊन शत्रूच्या जबड्यांत उतरल्यासारखें व्हायचें नाहीं का?"

"त्याची काळजी आपण कशाला करतां? आमच्यावर आपण पूर्ण विश्वास ठेवा, आणि मी सांगतें तसें करा. राणीसाहेबांची पालखी शत्रूच्या सैन्यांतून सुरक्षितपणें पलीकडे नेऊन शिवनेरीला पावती करायचें आमच्या जिमेला लागलें."

"मग काय राणीसाहेब! माहेरीं जायचा आपला बेत रद्द झाला का?" शहाजीराजांनीं विचारलें.

"कुणाची माय आणि कुणाचें माहेर! मी तर म्हणतें, मी माहेरींही जात नाहीं आणि शिवनेरीलाही जात नाहीं. आपले पाय सोडून कुठेंही दूर जाण्याची माझी इच्छा नाहीं." जिजाबाई म्हणाली.

"राणीसाहेब! असा हट्ट धरून कसा चालेल! आपण माझें ऐका, आणि मुकाट्यानें शिवनेरीला जा. आपले दिवस पूर्ण होत आले आहेत आणि शत्रु तर कसा नाशावर टपून बसला आहे हें तुम्ही पाहातच आहां."

जिजाबाई यावर कांहीं बोलली नाहीं. सर्वानुमतें आज रात्रीं जिजाबाई शिवनेरीवर जायचें घाटत होतें, तोंच हिरोजी अकस्मात तिथें येऊन पुढें उभा राहिला.

"राजेसाहेब!—"

"मीं सर्व गोष्टी राजेसाहेबांना सांगितल्या आहेत." गोमती हिरोजीला पुढें बोलूं न देतां म्हणाली, "आतां आपलें ठरल्याप्रमाणें रात्रीं व्यवस्था करायची."

" तें तर ठरलेंच आहे. तें राजेसाहेबांना तूं सांगितलेंस ना ? "

" होय. आतां आणखी दुसरें काय घेऊन आलास ? " गोमतीनें विचारलें.

" दुसरी बातमी अशी कीं राजेसाहेब ! जाधवरावांच्या जिवालादेखील शक्य तर दगाफटका करायचा खानाचा विचार आहे. आज मला त्याच कामगिरीवर जाधवरावांकडे जायचें आहे. " हिरोजी म्हणाला.

" कोणत्या कामगिरीवर ? जाधवरावांना कैद करायच्या ? "

" नाहीं. "

" तर मग ? "

" हें पाहा. उभयतां खानांनीं आजचा सारा दिवस एकत्र बसून खल करून जाधवरावांना खलिता लिहिला आहे. तो खलिता कांहीं अजून माझ्या हातीं पडला नाहीं; पण त्याचा सारांश मला माहीत आहे. कारण मी त्यांचीं खलबतें खडान् खडा ऐकत असतों. त्या खलित्याचा आशय असा कीं जाधवरावांनीं आपले जांवई व आपली लेंक पकडून त्यांना मीरजुम्लाच्या स्वाधीन करावें. असें करण्यांत शहाजीराजांशीं बेइमान झाल्याचा आरोप फत्तेखानावर यायचा अनायसें टळेल, व आपल्या जातीगोताशीं देखील बेइमान झाल्या-बद्दल जाधवरावांची सर्व हिंदुसमाजांत छीः थूः होऊन शिवाय निजामशाही-च्या वजिराला पकडून दिल्लीपतीच्या सरदाराच्या स्वाधीन करण्यांत त्यांनीं राजद्रोह केला, ह्या आरोपाबद्दल ते शासनालाही पात्र होतील. फत्तेखान मग वजीर होणार व जाधवरावांना शासन करणार. असे एका दगडानें दोन पक्षी मारायचा त्यांचा इरादा आहे. "

" एकूण अजून जाधवरावांनीं आम्हां दोघांना पकडायचें अभिवचन खानाला अजून दिलेलें नाहीं तर ? " शहाजीराजांनीं विचारलें.

" नाहीं. त्यांनीं फक्त आपल्याविरुद्ध दिल्लीपतीच्या बाजूनें लढून आपला व बेगमेचा मोड करून बादशहातींत निजामशाही सामील करायचें तेवढें मान्य केलें आहे. मीरजुम्लानें मग बादशहापाशीं रदबदली करून फत्तेखानाला निजामशाहीची सुभेदारी मिळवून देण्याचें वचन दिल्यामुळें फत्तेखानाला ही योजना मान्य आहे. " हिरोजी म्हणाला.

" मीं खानसाहेबांना दुसऱ्या दोघां साथीदारांशीं बोलतांना ऐकलें तें निराळेंच. तें असें कीं जाधवरावांनीं तें सारें कबूल केलें आहे. " गोमती म्हणाली.

" तें कांहीं खरें नव्हे. खान कण्या घालून कोंबडीं झुंजविण्यांत मोठा पटाईत आहे. तो कुणाला केव्हां काय सांगेल व केव्हां कशी टोपी फिरवील याचा कांहीं नेम सांगतां यायचा नाहीं. मात्र बेगम व तिचे मुलगे यांची वाट लावायचा उभयतां खानांचा निश्चय झाला आहे एवढें खरें. " हिरोजी म्हणाला.

" ही गोष्ट आपणाला बेगमसाहेबांच्या तोंडावर सिद्ध करतां येईल का ? " शहाजीराजांनीं विचारलें.

हिरोजी थोडा वेळ विचार करून म्हणाला, " हो ! तसा प्रयत्न करीन. पण तोंवर आपण मात्र सावध राहिलें पाहिजे. खान केव्हां कसा दगा देईल याचा नेम सांगतां यायचा नाहीं. "

" खान असा दगा करतो काय ? खानाला खाऊन पुरे पडूं. तूं आतांच्या आता एक गोष्ट मात्र कर. " राजे म्हणाले.

" काय करूं ती आज्ञा व्हावी. सुदैवानें आज पूर्वीचा पहारेकरी माझ्या जागीं आल्यानें मी मोकळा आहें, म्हणूनच जाधवरावांना खलिता पोंचविण्याचें काम माझ्यापाशीं आलें आहे. "

" तो खलिता आण इकडे माझ्या हातीं दे. " राजे म्हणाले.

" हें काय ? आपण खलिता घेऊन काय करणार ? " जिजाबाईनें मध्येंच संशयानें विचारलें.

" तें मग सांगतों. " राजे हिरोजीकडे वळून म्हणाले. " तूं असाच थेट पागेचा घोडा घेऊन व फलटणच्या आसपास जगपाळराव निंबाळकर मामासाहेब कुठें असतील त्यांची चौकशी करून त्यांना हा सर्व प्रकार निवेदन कर, म्हणजे ते परस्पर जाधवरावांच्या पारिपत्याची तजवीज करतील. "

" जशी आज्ञा. मी जाऊन एवढें काम करून येतों. तोंवर आपण ह्या शत्रूंशीं टक्कर द्या म्हणजे झालें. खान आतां माझ्या फासांत अडकणार यांत जरादेखील संशय नाहीं. पण त्याला मी मात्र जाग्यावर असलों पाहिजे. पण तें जाधवरावांचें पत्र ? त्याचें काय ? "

" हो ! तेंच मी म्हणत होतें." जिजाबाई म्हणाली.

" तें तूर्त माझ्यापाशींच असूं द्या." शहाजीराजे जिजाबाईकडे वळून म्हणाले. " राणीसाहेब ! एकंदर तानमान पाहून मी पुन्हां एकवार जाधवरावांना भेटून त्यांची समजूत पाडण्याचा प्रयत्न करीन, त्यावेळीं मला ह्या पत्राचा उपयोग करून घेतां येईल. ते वळले किंवा तोंपर्यंत आपण होऊनच ताळ्यावर आले तर ठीक, नाहींपेक्षां मग परमेश्वर काय करील तें खरें."

" बरें तर. मी निंबाळकराकडे जाऊन येतों व आपल्याला काय ती खबर सांगतों." असें म्हणून हिरोजी गोमतीकडे स्नेहाळू दृष्टीनें पाहात तिथून निघून गेला. लगेच शहाजीराजेही बेगमेला भेटण्यासाठीं म्हणून गेले. यानंतर थोडा वेळ गोमती आणि जिजाबाई यांचें जिजाबाईच्या डोहाळ्यांबद्दल थट्टाविनोदपर संभाषण चाललें होतें पण त्यांत अर्थातच गंडकीला भाग घेण्याचा धीर झाला नाहीं. त्यांचें संभाषण चाललेलें असतांना तेवढ्यांत जुलेखा आली व जिजाबाईशीं बोलण्याची इच्छा दर्शवूं लागली, त्यामुळें त्या दोघींच्या थट्टाविनोदाला खंड पडला.

प्रकरण चौदावें

## जुलेखेची दिव्य स्वामिनिष्ठा

" राणीसाहेब ! मी आपणांपाशीं आज एक भीक मागण्याला आलेंये आहें." जुलेखा जिजाबाईसमोर पदर पसरून म्हणाली.

जिजाबाई तिला हात देऊन वर उठवीत म्हणाली, " जुलेखे ! असें काय ? तुला काय पाहिजे, सांग ना."

" माझी धनीण आणि तिचीं मुलें–तुम्हीआम्ही ज्याचें अन्न खातों त्या राजघराण्याची अब्रू आणि जीवित ही सुरक्षित राहावी एवढी भिक्षा मागायला मी आपणांपाशीं आलें आहें." जुलेखा हात जोडून म्हणाली.

गोमतीनें पुढें होऊन विचारलें, " जुलेखे ! इतकी चिंता करण्यासारखें आजच काय घडलें ? आतांच राजेसाहेब बेगमसाहेबांची समजूत करण्यासाठीं तिकडे गेले आहेत, ते तुला भेटले नाहींत का ? "

" ते भेटले. त्यांना मी महालाच्या बाहेरच त्यांच्यासमोर पदर पसरून विनंति केली व ती त्यांनीं मान्यही केली. पण ते बेगमसाहेबांपाशीं जाऊन त्यांना दोन समजुतीच्या गोष्टी सांगूं लागले तेव्हां बेगमसाहेबांचें त्यांच्याशीं जें उद्धटपणाचें वर्तन पाहिलें, त्यांतच बेगमसाहेबांचा, त्यांच्या सर्व दौलतीचा व त्यांच्या सर्व वंशाचा सत्यानाश सांठविलेला आहे असें मला वाटतें. इकडे राजांनीं बेगमसाहेबा आणि तिचीं मुलें यांच्या संरक्षणासाठीं धडपड करावी, आणि तिकडे बेगमसाहेबांनीं बददानत, हलकट अशा या खानाच्या मोह-पाशांत सांपडून राजांसारख्या राजवटीच्या कर्त्या पुढाऱ्यांना पायानें दूर लोटूं पाहावें. अशीं दौलतीच्या नाशाचीं अवलक्षणें बेगमसाहेबांना आठवूं लागलीं आहेत, असेंच नाहीं तर काय ? "

" एकूण बेगमसुद्धां शत्रूला फितुर झाली आहे ही गोष्ट खरी तर ? " जिजाबाईनें विचारलें.

" खरीखोटी असें राणीसाहेब ! मी तरी कोणत्या तोंडानें म्हणूं ? जर ती गोष्ट खोटी असती तर बेगमसाहेबांच्या रक्षणासाठीं असें वेळीं अवेळीं तुमच्यापाशीं येऊन पदर पसरून तुमचे पाय धरावे लागले नसतें. अन्नदात्याच्या हितासाठीं झटणें हें प्रत्येक कृतज्ञ माणसाचें कर्तव्य आहे. राजांनीं आजवर निजामशाहीशीं नेकी पाळली व ते तशींच पुढेंही पाळतील याविषयीं मला शंका नाहीं; पण आपल्या कर्त्या कारभाऱ्यांनीं आपल्याशीं इतकें नेकीनें वागावें, इतकी दानत बेगमसाहेबांची आजच्या मितीला तरी उरली नाहीं. म्हणून मला आज तुमच्यासमोर असा पदर पसरावा लागतो आहे. तिकडे बेगमसाहेबांनीं राजांच्या सर्वनाशाचीं कारस्थानें रचावीं आणि राजांनीं मात्र इकडे बेगमसाहेबांच्या संरक्षणाची काळजी वाहावी, म्हणजे अपकारांची फेड उपकारांनीं करण्यासारखें आहे. राजे थोर आहेत, राजनिष्ठ आहेत, दिलपाक दिलदर्या आहेत. राजांच्या तोडीचा कर्ता पुरुष निजाम-शाहींत नांवालादेखील दुसरा मिळायचा नाहीं. पण राजे झाले तरी देखील माणूस आहेत. आपण पोलादाच्या तीक्ष्ण सुरीनें वाघाचे दांत पाडा-

यचें म्हटलें तरी त्या सुरीलादेखील शेवटीं एखादा करकोचा पडायचा. याच न्यायानें आजवर बेगमसाहेबांची गेल्या आठ नऊ महिन्यांत राजांशीं जी वर्तणूक आहे व सध्यां तर राजांना पार चिरडून टाकण्याचें निंद्य प्रयत्न जे बेगमेनें आरंभिलें आहेत ते सारे ध्यानीं घेतां राजांनीं तरी बेगमसाहेबांशीं स्वामिभक्तीनें कां वागावें हा एक प्रश्नच आहे. म्हणून मी आज राणीसाहेब ! आपल्या पायापाशीं आल्यें आहें. ”

“ पण बेगमेनें तरी राजांच्या व आम्हां सर्वांच्या नाशाचे बेत केले आहेत हें सर्व खरें ना ? ”

“ तें खोटें असें म्हणण्याला तोंडच नाहीं राणीसाहेब ! ” जुलेखा गोमती-कडे पाहात म्हणाली, “ पण मी त्याबाबतींत आपल्याला एवढेंच आश्वासन देऊं शकतें कीं, बेगमसाहेबांचा तसला कोणताही मनोरथ सिद्धीला जायचा नाहीं. याच्या मोबदला आपल्यापासून मला एवढेंच आश्वासन पाहिजे आहे कीं, राजांच्या हातून बेगमसाहेबा आणि तिचे पुत्र यांचें रक्षण होईल. ”

“ आतां तूं जेव्हां राजांना भेटलीस, तेव्हां राजे काय म्हणाले ? ”

“ तेव्हां ते ‘हो’ म्हणाले. पण त्यांचें व बेगमसाहेबांचें संभाषण झालेलें जें माझ्या कानीं आलें, त्यावरून मला तरी वाटतें कीं, ज्याला स्वाभिमान नाहीं तोच मनुष्य याउप्परही असल्या धन्याशीं इमानदारी राखूं शकेल. पण खरा मर्द असल्या बहकलेल्या माणसाला मार्गावर आणण्यासाठीं तलवार घेऊन त्याच्या मानेवर घालण्यासाठीं उठेल. ”

“ पण असें बेगम बोलली तरी काय ? ”

“ तें आपणांला राजे सांगतील. बेगमसाहेबा बोलून काय बोलणार ? फत्तेखानासारख्या फसव्या गारुड्याच्या नागसुरानें गुंगलेली नागीण ती, त्या तालासुरावर नाचण्यापेक्षां ती दुसरें काय करणार ! मीं त्यांना कानीं कपाळीं ओरडून सांगितलें कीं, ह्यांत फत्तेखानाचा डाव वेगळा आहे. पण बेगम-साहेबांची समजूतच पडत नाहीं त्याला मी तरी काय करूं ? जे आजवर मी त्यांना सांगितलें तेंच आतां राजेसाहेबांनींही त्यांना सांगितलें. पण बेगम-साहेबांनीं तें कधींही मनावर घेतलें नाहीं. उलट त्या अलीकडे राजांना वजिरातीवरून दूर करून त्या अपशकुनी कावळ्याला—त्या फत्तेखानाला वजीर करण्याच्या विचारांत आहेत.”

" मग मी यांत काय करावें असें तुझें म्हणणें आहे ? "

" माझें म्हणणें एवढेंच कीं, " जुलेखा हात जोडून म्हणाली. " आतां राजे माघारी आले म्हणजे ते संतापलेले असतील त्यांना समजुतीच्या दोन गोष्टी सांगून जरा शांत करा. आणि मग त्यांना अशा दोन समजुतीच्या गोष्टी सांगा कीं, अखेरपावेतों ते बेगमसाहेबा आणि त्यांचीं दोन मुलें याच्या रक्षणासाठीं झटतील. राणीसाहेब, मला इतकी काळजी वाटतें ती ही कीं, फत्तेखानाचा उद्देश बेगमसाहेबांच्या मुलांना ठार करून बेगमसाहेबांनाहीं सर्वस्वीं बुचाडायचा आहे."

" हो ! तें मी त्यांना कितीतरीं परींनीं समजावून सांगितलें; पण त्यांची समजुतच पडत नाहीं. " जिजाबाई म्हणाली. " विषवृक्षाच्या छायेखालीं बेगमसाहेब सध्यां आहेत. त्यांना कल्पवृक्षाची छाया या वेळीं तापदायकच वाटायची. बेगमसाहेबांच्या वयाची आणि एवढया अफाट वैभवाची धनीण अशी चंचल आणि विलासलोलुप विधवा विषयासक्तीच्या भरांत असले वेडेचार करणार नाहीं तरच आश्चर्य ! मी राजांना सांगून पाहातें; पण मी तरी म्हणतें, असले नालायक धनी जगांत जगावे तरी कां ? बेगमसाहेबांना आपल्या शिरावरची जबाबदारी कळत नाहीं का ? राज्यकारभार हा पोरखेळ आहे असें बेगमसाहेबांना वाटतें कां ? स्वतः त्या बेतालपणानें वागूं लागल्या आहेत आणि हलकट लोकांनाही डोक्यावर घेऊन नाचूं लागल्या आहेत. ' विनाश-काले विपरीतबुद्धिः ' म्हणतात तें यालाच. " तेवढयांत शहाजीराजे परत आलेले पाहून जुलेखा आणि गोमती दोघींही मर्यादशीरपणें बाजूला सरल्या.

राजांनीं आज बेगमेशीं बोलतांना नरसिंहावतार धारण केला असावा व त्या दोघांची चांगलीच खडाजंगी उडाली असावी, असें राजांच्या क्रोधाविष्ट चर्येवरून स्पष्ट दिसून येत होतें. तें पाहून जिजाबाई, गोमती व जुलेखा तिघीही घाबरल्या.

" बेगमसाहेबांशीं कांहीं कमीजास्त बोलाचाली झाली वाटतें. ! " जिजाबाईनें राजांच्या अंमळ पुढें जाऊन हळूच विचारलें.

शहाजीराजांनीं जिजाबाईचा प्रश्न ऐकला न ऐकल्यासें करून जुलेखेकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहात विचारलें, " कोण ही ? "

" महाराज ! " जुलेखा घाबरून राजांसमोर येऊन हात जोडून उभी राहिली.

" तूं बेगमेची दासी ना ? " राजांनीं पूर्वीच्या कटु स्वरांत विचारलें.

" होय महाराज ? काय आज्ञा आहे ? जुलेखेनें आपल्या पायांकडे पाहात जोडल्या हातांनीं विचारलें.

" पहारेकरी ? " राजांनीं जुलेखेच्या उत्तरास प्रत्युत्तर न देतां दरवाजाकडे पाहात हांक मारली.

" आज्ञा सरकार ! " असें म्हणून एक पहारेकरी समोर येऊन मुजरा करून आज्ञेची वाट पाहात उभा राहिला.

जिजाबाईला राजांच्या ह्या कृत्याचा अर्थच कळेना. तरी पण तिला संशय आला कीं, आतां राजांच्या कोपाची वीज जुलेखेच्या माथीं कडाडणार. जिजाबाई पुन्हा पुढें होऊन इतकें रागावयाला काय झालें असें राजांना विचारणार, तोंच राजांनीं पहारेकऱ्याला आज्ञा केली, " ह्या दगलबाज दासीला कैद कर."

राजांचा हा चमत्कारिक हुकूम ऐकून सर्वांनाच मोठा विस्मय वाटला. याचा कुणाला कांहीं अर्थच कळेना. जुलेखा तर घाबरून गेली, व जिजाबाईच्या मागें जाऊन उभी राहिली. जिजाबाईनें पुढें होऊन पहारेकऱ्याला हातानें गप्प राहायची खूण करून शहाजीराजांना म्हटलें, " हें असें काय हें ? जुलेखेचा काय अपराध झाला ? "

" बेगमेसह सर्वांनीं माझ्याविरुद्ध कट केला आहे, व त्या कटांत ही ज्या अर्थी बेगमेची दासी आहे त्या अर्थी ही सुद्धां सामील असलीच पाहिजे." शहाजीराजे आवेशानें उद्गारले.

" राजेसाहेब ! " जुलेखा पुढें होऊन म्हणाली, " मी बेगमसाहेबांची दासी, त्या अर्थी आपण सुक्याबरोबर ओलें जाळूं पाहातां हें बरोबर आहे. पण आपणांला जर आठवत असेल–आपण कां रागावलां आहां हें मला माहीत आहे. आतां आपण व बेगमसाहेब बोलत होतां तेव्हां मी तिथें होत्यें, व बेगमसाहेब आतां फार बहकत चालल्या, त्यांनीं आपलें मन दुखविल्यानें त्यांत त्यांचाच नाश होईल हें ओळखून ह्या सर्व गोष्टी राणीसाहेबांच्या कानांवर घालण्यासाठींच मी ही आतांच इथें आल्यें. मी आल्यें

ती राणीसाहेबांना सांगून. बेगमसाहेबा व त्यांचीं दोन लेंकरें तींच माझीं लेंकरें असें मीं मानल्यें. ह्या मायलेंकरांचें रक्षण आपल्याकरवीं होईल अशी कांहीं सोय करण्यासाठीं मी आल्यें. राजेसाहेब ! आपणांला वजिरी द्यावी कीं फत्ते-खानाला द्यावी याविषयीं बेगमसाहेबांचें द्विधा मन झालें असतां त्यांना तेव्हां हिताच्या दोन गोष्टी सांगून आपल्या बाजूनें बोलणारी मीच होत्यें. मी एक सामान्य दासी व आपण एवढे मोठे वजीर; आपल्या बाजूनें मी बोलल्यें यांत कांहीं मी शतकृत्य केलें नाहीं. पण हें सारें सांगण्यांत माझा हेतु एवढाच कीं, आपण संशय घेतां तशी मी दगलबाज नाहीं. ही गोमती सांगेल, पाहिजे तर राणीसाहेबही सांगतील. "

" महाराज ! आपल्या रागाला डोळे नाहींत, म्हणूनच आपण असे चोराला सोडून संन्याशाला सुळीं देऊं पाहात आहां. आपण ह्या जुलेखेची खरी किंमत अजून ओळखली नाहीं." जिजाबाई म्हणाली.

" राणीसाहेब ! तुमचीदेखील जर जुलेखेच्या भलेपणाविषयीं खात्री असेल, तर मग आम्ही आमची चूक कबूल करतों. " जवळच पहारेकरी उभा होता त्याला बाहेर जायला सांगून राजे जुलेखेकडे पाहात म्हणाले. " सब्जाच्या बनांत एवढीच एक तुळस उगवली आहे हें आम्हांला तरी कसें ओळखता यावें ? "

" पण आतां तरी ओळखतां आलें ना ? " जिजाबाईनें विचारलें.

" हो ? " राजे जुलेखेकडे वळून म्हणाले. " जुलेखे ! तुझ्या धनि-णीचीं सारीं कारस्थानें तुझ्या ओळखीचीं असतीलच."

" हो ! " त्या कारस्थानांना पुरून पडणारी आपण सर्व मंडळी आहों. " जुलेखा गोमतीकडे पाहात म्हणाली. " खरें ना गोमती ? "

" मी गोमती नव्हे; मी बिजली ! " गोमती म्हणाली.

" बरें; बिजली. " जुलेखा हंसून उद्गारली. " पण हें खरें ना ? "

" तें खरें. पण तूं आतां मला हांक मारतांना जशी चुकलीस तशीच जर पुन्हा बेगमसाहेबा, फत्तेखान, मीरजुम्लाखान किंवा फत्तेखानाचा पहारेकरी तो सुलेमान यांच्यादेखत चुकलीस तर अर्थाचा अनर्थ होईल, लक्षांत ठेव."

" बरें, बरें ! ठेवलें लक्षांत. " जुलेखा पुन्हा हंसत म्हणाली.

गोमतीनें आपल्या शत्रूच्या मालिकेंत सुलेमानचें अर्थात् हिरोजीचें नांवही इतक्या चतुराईनें गोंवलेलें पाहून राजे व जिजाबाई यांना तिच्या चाणाक्ष-पणाचें मोठें कौतुक वाटलें.

" सुलेमानला जुलेखा ओळखतें का ? " राजांनीं विचारलें.

" हो ! मी त्याला ओळखतें. चांगला ओळखत्यें. असले भोळसट पहारेकरी खानाच्या पदरीं आहेत म्हणून तर आम्हांला—मला काय किंवा गोमतीला—चुकल्यें, बिजलीला काय दोन्ही खानांच्या वाड्यांत चालणाऱ्या बित्तं बातम्या कळतात. " जुलेखा म्हणाली.

" म्हणजे ? तुम्ही दोघींनीं मिळून सुलेमानला बनविण्याचा उद्योग आरं-भिला आहे वाटतें ? " जिजाबाई म्हणाल्या.

" तर ! त्याच्याशिवाय कसें चालेल? " जुलेखा म्हणाली.

" आहे बुवा ! तुम्हा दोघींचीही शहामत आहे खरी ! " राजे गोमती व जुलेखा ह्या दोघींकडे कौतुकपूर्ण नजरेनें पाहात म्हणाले. " पण काय ग गोमती ?—"

" महाराज ! मी बिजली ! " गोमती मध्येंच म्हणाली.

" खरेंच; बिजली !—बिजली ! तुझें व जुलेखेचें एक गोत्र कसें जमलें ग ? "

" याचें कारण असें कीं महाराज ! ज्याचें अन्न खावें त्याच्या अन्नाला जागावें ही इमानदारी आम्हां दोघींच्याही ठायीं सारख्याच उत्कटतेनें वसत आहे. मला राणीसाहेबांच्या व त्यांच्या उदरीं वास करणाऱ्या भावी छत्र-पतींच्या कल्याणाची काळजी आहे, तशीच जुलेखेला आपल्या मरहूम पतीच्या राजघराण्याची व त्याच्या वंशाची काळजी आहे." गोमती म्हणाली.

" महाराज ! बेगमसाहेबांच्या बहकत्या मनोवृत्तींना आळा घालणें मला आतां शक्य नाहीं. कारण धन्याचा धनी कोण आहे ? पण त्यांच्या दोघांही मुलांना मीं अंगाखांद्यावर खेळवून लहानाचे मोठे केले आहे; त्यांचें कल्याण होण्यासाठीं जपणें हें माझें काम आहे. आपण गादीचे एकनिष्ठ सेवक आहां, आपणांला ह्या गादीचा अभिमान आहे म्हणून—"

" जुलेखे ! तूं म्हणतेस तें खरें. पण बेगम तर मला म्हणते कीं, मी निजामशाही बुडवायला टपून बसलों आहें. ह्या संशयाच्या पिशाच्यानें

त्यांना पछाडलें असल्यानें त्या माझ्यावर जरादेखील विश्वास ठेवायला तयार नाहींत फत्तेखान व मीरजुम्ला तर त्यांचा नाश करायला टपून बसले आहेत, त्या शत्रूंच्या हातून त्यांचा बचाव करण्यासाठीं माझ्या मनांतून त्यांना आजच्या आज युक्तिप्रयुक्तीनें किल्ल्याबाहेर काढांयचें होतें, पण त्या माझ्यावर विश्वासून यायला तयारच नाहींत! इतकेंच काय पण मला व माझ्या बायकामुलांनाही किल्ल्याबाहेर जाऊं द्यायचें नाहीं, एथल्या एथें फत्तेखानाला सांगून कैद करायला लावायचें असा त्यांचा मानस दिसतो. अशा परिस्थितींत मी बेगमसाहेबांचें किंवा त्यांच्या मुलांचें रक्षण कसें करणार? आतां याला उपाय एकच; फत्तेखानाचीं कारस्थानें बेगमसाहेबा, त्यांचे मुलगे व निजामशाही यांचें वाटोळें करणारीं आहेत अशी बेगमसाहेबांची खात्री पटल्याशिवाय त्यांच्या ह्या बेलगामी वृत्तीला आळा घालतां यायचा नाहीं."

गोमती थोडा वेळ विचार करून व जरा जुलेखेला बाजूला घेऊन तिच्याशीं कांहीं खलबत करून नंतर शहाजीराजांपाशीं येऊन म्हणाली, "महाराज! बेगमसाहेबांना खानाचें खरें स्वरूप कळून येईल अशी व्यवस्था आम्ही करतों."

"माझी तर आतांच्या संभाषणावरून अशी खात्री झाली आहे कीं, फत्तेखानाशीं बेगमसाहेब निका लावायलाही तयार होतील." राजे म्हणाले.

"होतील! इतक्या उल्लू त्या बनतील; हें आम्हांला माहीत आहे." जुलेखा म्हणाली.

"मी फत्तेखानाच्या विश्वासांतील बातमीदारीण. सर्व गोष्टी खानाच्या मनाजोग्या जुळवून आणल्यावर माझें सुलेमानशीं लग्न लावून देण्याचें कबूल करून आज भोंसल्याकडे चालणारी मनसबदारी माझ्या पतीला मिळवून देण्याचें त्यानें कबूल केलें आहे व मीरजुम्लाखानानें बेगमसाहेबांचा त्यांच्या मुलांसह नाश करून जिजाबाई राणीसाहेबांना किंवा निदान त्यांच्या पोटीं जन्माला येणाऱ्या भावी छत्रपतीला पकडून त्यांच्या स्वाधीन करण्याबद्दल मी ज्याला पति म्हणून पसंत करीन त्याच्या नांवानें जाधवरावांची मनसबदारी देण्याचें वचन दिलें आहे. तेव्हां फत्तेखानाच्या वतीनें बेगमसाहेबांशीं निक्याची गोष्ट काढून त्यांचा रुकार मीच घेतला; आतां त्यांचा निका लागायला कांहीं फार दिवसगत लागायची नाहीं. अर्थात् मी मनसबदारीण होणार. मीरजुम्लाखानाच्या

अटीप्रमाणें राणीसाहेबांना किंवा तें साधलेंच नाहीं तर त्या बाळंत होतांच त्यांच्या मुलाला चोरून नेऊन खानांच्या स्वाधीन केलें, म्हणजे शिंदखेडची मनसबदारी मला मिळणार आहे ! ”

“ एकूण तूं एवढ्या मोठ्या मनसबदारीसाठीं सुलेमानची—एका मुसलमानाची बायको होणार म्हणायची ! ” जिजाबाई विनोदानें म्हणाली.

“ हो ! होणार तर ! एवढी दौलत चालून येते आहे; ती मी हातची बरी दवडीन ! ” राजा—राणींच्या देखत आपण कल्पनेबाहेर विनोद केला ही चूक केली, हें मनोमन ओळखून गोमती शरमिंदी झाली. व तिनें चटकन विषयांतर केलें, “ तें जाऊं दे. बेगमसाहेबांना फत्तेखानाचें खरें स्वरू कळून येईल अशी तजवीज मी करत्यें. ”

“ ह्या उपायानें तरी जर बेगमसाहेबा ताळ्यावर आल्या, तर मग आपण त्याचें रक्षण करणार ना ? ” जुलेखेनें शहाजीराजांना विचारलें.

“ हो ! रक्षण करीन म्हणजे ? मी अखेरपावेतों निजामशाहीशीं इमानें-इतबारें वागेन अशी शपथ घेतली आहे. आजदेखील मी बेगमसाहेबांवर इतका संतापलों, व त्या संतापाच्या भरांत त्यांना त्यांच्या लवाजम्यासह कैदेंत टाकण्याचाही माझा निश्चय झाला होता. अजूनदेखील बेगमसाहेबा जर खानाच्या तोंडानें पाणी पिऊन आत्मघात व आपल्या बरोबरच आमचाही घात करूं पाहातील, तर त्यांना मी खरोखर नजरकैदही करीन. पण ती कशासाठीं ? त्यांना मोंगल सरदाराच्या स्वाधीन करण्यासाठीं किंवा निजामशाही बळकावण्यासाठीं नव्हे; सर्वांना इथून शत्रूच्या जबड्यांतून उचलून दौलताबाद राजधानींत सुखरूपपणें पोंचविण्यासाठीं. ”

“ ठीक आहे तर. आपण दोन तीन दिवसांत इथून शिवनेरीकडे कूच करायच्या उद्योगाला लागा. राणीसाहेबांचे देखील दिवस आतां अगदीं पूर्ण भरत आले आहेत. मृग नक्षत्र लागलें कीं पाऊस केव्हां येईल याचा जसा नेम नसतो, तसेंच बायकांना नऊ महिने संपून दहावा महिना लागला, कीं त्या कधीं बाळंत होतील याचा नेम नसतो. ”

“ गोमती ! किती ग तूं तोंडाची चहाटळ आहेस ? ” जिजाबाई मध्येंच अनुरक्त स्वरानें म्हणाली.

अशा वेळीं व अशा प्रसंगीं राणीसाहेबांनीं आपल्या आवडत्या दासीला चहाटळ म्हणणें म्हणजे तिचा उत्तमोत्तम गौरव करणेंच होय. गोमतीला ही पदवी फारच मानवली. ती हंसत हंसत पण अंमळ वरमत म्हणाली, " राणीसाहेब ! मी यांत कसला हो चहाटळपणा केला ? "

" गोमती ! पुरुषाच्या देखत असल्या गोष्टी बोलतात का ग ? " जिजाबाई रागाचा लटका आविर्भाव आणून म्हणाली.

गोमती लाजून अधोवदन होऊन जरा बाजूला सरली, व डाव्या हाताचें आंगठ्या जवळचें बोट आपल्या हनुवटीवरच्या खळग्यावर टेंकून चोरटें हंसें हंसत पण ओंठाखालीं ओंठ दाबून त्या हास्याची मुस्कटदाबी करीत किलकिल्या नजरेनें जुलेखेकडे पाहूं लागली. जुलेखेनेंही तिच्याकडे पाहिलें व तसेंच चोरून स्मित हास्य केलें. गंडकी हा सारा गोड प्रकार दुर्मुखल्यासारखी बाहेर उभी राहून पाहात होती.

" चला, आपण जाऊं. मला बेगमसाहेबांना भेटायचें आहे." गोमती म्हणाली.

" चल." असें म्हणून जुलेखाही तिच्या मागोमाग चालूं लागली.

" एकूण आपण आतां पुन्हा एकवार बाबांची भेट घेणार? " जिजाबाईनें शहाजीराजांना विचारलें.

" हो ! त्यांची मला एकवार भेट घेतलीच पाहिजे. ह्या एकंदर प्रकारावरून माझी अशी कल्पना होऊं पाहात आहे कीं, मामासाहेब नेमस्त वृत्तीचे असले तरी आपल्या हातानें आपल्या वंशवृक्षावर कुऱ्हाड हाणायला तयार होण्याइतके कुऱ्हाडीचे दांडे खास नाहींत. ते खलग्रहांच्या फेऱ्यांत सांपडून कुठेंतरी फसत असले पाहिजेत. भोळेपणा मामासाहेबांच्या ठायीं बराच आहे."

" खरेंच ! बाबा फार भोळे आहेत. माझीदेखील अशी खात्री आहे कीं आपण व मी उभयतां जाऊन जर त्यांना भेटलों व खानाचा कावा त्यांना नीट समजावून सांगितला, तर ते खात्रीनें ताळ्यावर येतील."

" म्हणजे ? तुम्हीदेखील माझ्याबरोबर येणार कीं काय ? "

" तर ? मी एकटी कां मागें राहूं ? "

" इतकें भय तुम्हांला वाटतें ? राणीसाहेब ! भावी छत्रपतीच्या मातेला हा भित्रेपणा शोभत नाहीं."

" पण हा भित्रेपणा नव्हेच मुळीं ! भित्रेपणा कशाला म्हणायचें ? कोण पाहील का, कोण पकडील का, असल्या भयानें पतीच्या प्राणाची देखील पर्वा न करतां लपतछपत जाणारी स्त्री भित्री. मी तर राजरोस आपणांबरोबर शत्रूच्या छाताडावरून चालत पुढें यायला तयार आहें. आपण एकवार भावी छत्रपतीचें महिमान तर पाहा ! महाराज ! आपल्या ह्या अडचणी तर कांहींच नाहींत. भगवान वासुदेव अवतारायचे, तेव्हां त्यांना पकडून ठार करण्यासाठीं कंसानें किती कडेकोट बंदोबस्त केला होता बरें ! वसुदेव बाल-वासुदेवांना घेऊन निघाला तेव्हां बंदिखानाच्या लोहशृंखला आपोआप तटातट तुटल्या व दरवाजे मोकळे झाले. दुथडी तुडुंब भरून घोः घोः वहाणाऱ्या यमुनेनें दुभंगून त्या देवाधिदेवाला वाट करून दिली. तशाच माझ्या वाटें-तील अडचणीही जशा येतील तशा आपोआप दूर होतील. भगवंतांच्या अवताराचा महिमा हा असा आहे." बोलतां बोलतां जिजाबाईनें आकाशाकडे डोळे लावून हात जोडून विनविलें, " भगवान ! हा माझा अहंकार नव्हे; माझ्या उदरीं गर्भरूपानें वास करणारा महापुरुष हे आत्मविश्वासाचे बोल माझ्या मुखांतून वदवीत आहे ! "

जिजाबाईचा हा दृढविश्वास पाहून त्यांना नको म्हणायचें शहाजीराजां-च्याही अगदीं जिवावर आलें. त्यांनीं तिला शक्यतों बरोबर येण्याचें वचन देऊन विनोदानें विचारलें, " राणीसाहेब ! अशा संकटाच्या वेळींदेखील तुम्हांला अवतारी पुरुषांच्या आठवणी होतात व धीर येतो, हे शुभशकूनच म्हणायचे !—"

पण प्रेमळ पतिपत्नींचा प्रणयसंवाद चोरून ऐकणें किंवा त्यांचा अभियुक्त शृंगार चोरून पाहाणें आपणाला शोभणार नाहीं. राजा-राणीकडे या वेळेपुरती आपण पाठच फिरविली पाहिजे.

## प्रकरण पंधरावें

# दासीचें कारस्थान

जुलेखा आणि गोमती बेगमेच्या महालांत गेल्या त्या भीतभीतच गेल्या. कारण शहाजीराजांनीं आतांच सांगितलेल्या वृतांतावरून बेगम फार संतापली असेल अशी त्या दोघींचीहि खात्री होती. गोमतीला पाहातांच बेगमेनें एकदम हाक मारून विचारलें, ' बिजली ! तूं खानाकडून आलीस ना ? '

" होय, बेगमसाहेबा ! " बिजली उत्तरली. इतक्यांत गोमतीच्या मागोमाग जुलेखा उभी असलेली बेगमेला दिसली. त्याबरोबर बेगमेच्या मनात कुतर्क आला कीं, बिजलीदेखील जुलेखेच्या तंत्रानें वागूं लागली कीं काय ? म्हणून तिनें बिजलीला विचारलें, " बिजली ! अलीकडे तुझी जुलेखेशीं फारच गट्टी जमलेली दिसते ! "

" होय बेगमसाहेबा ! जुलेखेच्या मनांत आपल्या राजवंशाविषयीं जितका अभिमान आहे तितकाच अभिमान मलाही आहे. आतांपर्यंत मी खानाशीं व आपणांशीं किती नेकीनें वागत आलें हें आपणांला माहीतच आहे. यांत माझा जर कांहीं स्वार्थ असेल, तर तो एवढाच कीं, बेगमसाहेबांच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी घडून याव्या व माझ्या सर्व नाशाला कारण होणाऱ्या शहाजीराजांचा सर्वनाश झालेला पाहून माझे डोळे निवावे. खानाची मी बंदी दासी खरी; पण माझा ओढा माझ्या राजाकडे जेवढा आहे, आपल्याठायीं माझी जेवढी निष्ठा आहे, तेवढी खानाच्या ठायीं अर्थात् नाहीं. मी आतांपर्यंत खानाच्या वतीनें आपल्याशीं बोलत व वागत आल्यें तीं आपल्या हितासाठीं म्हणून; पण बेगमसाहेबा ! अलीकडे मी खानाचीं जीं मनोगतें ओळखूं शकल्यें त्यावरून मला असें वाटूं लागलें आहे कीं, शहाजीराजे खानापेक्षां शतपटीनें चांगलें." गोमती म्हणाली.

" बेगमसाहेबा ! मी तर आपणांला पूर्वीपासून हेंच सांगत होतें. " जुलेखा म्हणाली.

बेगमेनें एकवार जुलेखेकडे तिरस्कारी दृष्टीनें पाहून तिच्याकडे दुर्लक्ष करून गोमतीला विचारलें, " बिजली ! आजच तुला खानाविषयीं इतका तिटकारा वाटूं लागला यांचें कारण काय ग ? "

" बेगमसाहेबा ! मी जर खुल्या दिलानें बोललें तर कसूर माफ होईल का ? खरें बोलायचें तर कधीं कधीं कडूही बोलावें लागतें. "

" बोल. तुला काय बोलायचें तें खुल्या दिलानें बोल. "

" तर मग जुलेखेला इथून अंमळ दूर जायला सांगा. " गोमती जुलेखेकडे पाहून कांहीं चोरटा नेत्रसंकेत करीत, पण त्याचा बेगमेला माग-मूसही लागूं न देतां म्हणाली.

" जुलेखे ! तुझे मुलगे तुझी वाट पाहात असतील, त्यांच्यापाशीं तूं जा कशी ! "

" आज्ञा बाईसाहेबा ! " असें म्हणून जुलेखा गोमतीकडे पाहून स्मित-हास्य करीत तिथून निघून गेली.

" बेगमसाहेबा ! " बिजली एकवार सभोंवार पाहात म्हणाली. " आपलें खानावर किती निष्कपट प्रेम आहे हें मी जाणतें; पण खान मात्र मोठा कपटी आहे. प्रेमाच्या हुलकावण्या दाखवून आपला केसानें गळा कापायचा त्याचा विचार आहे. आपल्या दोघांही मुलांवर खानाची दृष्ट पडली आहे आणि वेळीं निजामशाही बळकावण्याच्या मोहाला पडून तो आपलाही घात करायला मागेंपुढें पाहाणार नाहीं. दोघां खानांचें संभाषण माझ्या कानीं आलें आहे त्यावरून मी हें बोलतें आहें. "

" खान इतका दुष्टबुद्धीचा पूर्वीं कांहीं नव्हता. " बेगम कांहींशीं आश्चर्यचकित होऊन म्हणाली. " मग आतांच खानाची वृत्ति पालटण्याचें कारण काय बरें ? "

" बेगमसाहेबा ! त्याला अप्रत्यक्षतः कांहींशीं मी कारण झाल्यें आहें. शहाजीराजांना स्वामींनीं पुत्रप्राप्तीसाठीं म्हणून जें श्रीफळ दिलें तें मी शहाजी-राजांवर सूड घेण्यासाठीं म्हणून खानाच्या स्वाधीन केलें. अत्यंत गुलदस्तांतली गोष्ट आहे ही. कोठें बोलायची नाहीं. जर का माझ्या तोंडून ही बातमी फुटली असें खानाच्या कानावर गेलें तर माझी धडगत नाहीं. पण एवढें मात्र खरें कीं, त्या श्रीफळाच्या प्रसादानें खानाची बायको गर्भवती झाली असून तिच्या पोटीं भावी निजामशहा जन्माला येणार असा खानाचा दृढ भरंवसा आहे. अर्थात् आपल्या ह्या भावी पुत्राला निजामशाहीचें तख्त आयतें मिळावें म्हणून खान आजपासूनच आपल्या मुलांना पाण्यांत पाहूं लागला आहे. इत-

केंच काय पण बेगमसाहेबा ! आपण मला अभय देत असाल तर मी याही पुढचीही एक भयंकर गोष्ट, ज्या गोष्टीशीं आपला हितसंबंध निगडित झाला आहे, जिच्यावर आपल्या मुलांबाळांचें व राजवैभवाचें भवितव्य अवलंबून आहे अशी गोष्ट आपल्या कानांवर घालीन."

"सांग, काय तें सांग. तुला अभय आहे."

"तर मग बेगमसाहेबा ! आतां मी आपल्याला खरें सांगत्यें. आपल्या दोघां पुत्रांना कोणत्या ना कोणत्या उपायानें ह्या जगांतून नाहींसें करण्याच्या कामावर खानानें माझी नेमणूक केली आहे."

बेगम संतापानें लाल होऊन म्हणाली, "बिजली, हें खरें बोलतेस तूं ?"

"तर, बेगमसाहेबा ! मी खोटें कशाला बोलूं ? मी बोलतें ही गोष्ट इतकी भयंकर आहे कीं, अशा गोष्टी खोट्या बोलल्यानें माझें शीर जागेवर राहायचें नाहीं अशी माझी खात्री आहे. पण माझ्या धन्याविषयीं मला जितका अभिमान वाटतो त्याहीपेक्षां मला माझ्या राजाविषयीं अभिमान जास्त वाटतो. म्हणून मला ही गुप्त गोष्ट आपल्या कानांवर घालावी लागली."

"खरोखरच खान एवढा निमकहराम आहे का ?"

"असें, बेगमसाहेबा ! मला आज तर खात्रीनें वाटूं लागलें आहे."

"अजूनही याच्यावर माझा विश्वास बसत नाहीं. आजवर खान जो माझ्याशीं इतका सलगीनें वागला तो अशा कपटबुद्धीनें वागला असेल तर बादशहाची बेगम म्हणजे त्याला काय वाटली ? खानाचा असा दुष्ट हेतु आहे ही गोष्ट तूं पुराव्यानें सिद्ध करून देशील का ?"

"बेगमसाहेबा ! मी गरीब दासी. ह्या गोष्टीची रुजुवात मीं कुठवर करीत बसूं ? आपण मोठ्या, खानसाहेब मोठे; आपली त्यांची उद्यां दिल-जमाई होईल; पण त्यांत माझें गरीबाचें मात्र मरण होईल."

"पण तूं खानाविरुद्ध जें बोललीस तें खरें आहे असें सिद्ध करून जर दिलें नाहींस तरीदेखील तुझें मरण ओढवेल हें पक्कें लक्षांत ठेव." बेगम क्रुद्ध स्वरानें म्हणाली.

"एकूण बेगमसाहेबा ! मी बादशहाच्या व आपल्या हितासाटीं एवढी गुलदस्तांतली गोष्ट बोलल्यें त्या उपकारांची फेड आपण अशी अपकारानें करणार तर ?"

" तर मग खान इतका दगलबाज आहे, अशी तूं माझ्या मनाची खात्री करून दे. "

" तशी खात्रीही मी योग्य वेळीं करून देईन. पण बेगमसाहेबा ! त्यामुळें आपला प्रेमभंग केल्याचें पाप लागेल. "

" बिजली ! कसलें प्रेम आणि कसला प्रेमभंग घेऊन बसलीस तूं ! खानासारख्या कुतरड्याला मी गफलतीनें, माझ्या बरोबरीनें गादीवर बसायला दिलें तरी खानानें आपली पायरी विसरायला नको होती. मी बेगम, कशी झाली तरी एवढ्या मोठ्या निजामशाहीची राज्यकर्ती आहें. इतके नोकर माझी नोकरी करण्यासाठीं रात्रंदिवस हात जोडून माझ्यापुढें उभे असतात, त्यांतला हा एक नोकर. पिंजऱ्यांतले पोपट, दरवाजांतले कुत्रे, पागेंतले हत्ती, घोडे, हीं जशीं माझ्या करमणुकीचीं साधनें, तसाच एक खान ! देहाशीं पायपोसाचा संबंध जडला तरी तो पायांपुरताच जडतो. घोडा कितीही उमदा असला तरी तो नेहमीं स्वाराच्या मांडीखालींच असायचा. प्रत्येक मनुष्य जोंवर आपली मर्यादा संभाळून असतें तोंवर ठीक असतें. खान माझा प्यारा होता–नव्हे आहे, हें सारें तुला माहीत आहे. तें तुझ्यापासून चोरून ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. खानाला मी माझा वजीर करायचें कबूल केलें आहे हेंही खरें. पण कुत्र्याला मोकळीक दिली म्हणून तो तोंड चाटायला वळवळूं लागला तर–"

" बेगमसाहेबा ! खानाची ती महत्त्वाकांक्षादेखील जर सद्धेतुमूलक असती तरी माझें कांहीं म्हणणें नव्हतें. पण त्यांतदेखील खानाचा डाव मोठा दुष्टपणाचा आहे. मी स्पष्ट बोलतें म्हणून कसूर माफ असावी; पण वजीर होऊन आपणांशीं निका लावल्यानें, खान आजच्या राजवंशाचा अध्वर्यु होऊं पाहात आहे. समजा, खानाची बेगम आतां इतक्यांतच बाळंत झाली आणि तिला पुत्र झाला म्हणजे तोच स्वामींच्या श्रीफळाच्या प्रभावानें निजामशाहीचा उद्यांचा वारस झाला. त्या पुत्राचा वारसाहक्क प्रस्थापित करण्यासाठीं खऱ्या वारसदार बादशहाला व त्याच्या भावाला जगांतून नाहीसा करण्यासाठीं खान अत्यंत अधीर झाला आहे. आतां यांतून आपणांला योग्य तो मार्ग आपण आंखावा. आपण सांगाल त्या वेळीं आणि सांगाल त्या प्रकारानें मी आपल्या सेवेला हात जोडून तयार आहें. आपल्या व आपल्या शहाजाद्यांच्या जिवावरील हें संकट टळावें म्हणून मी मरायलादेखील तयार

आहे. पण त्यापूर्वी माझी आपणांला अशी विनंती आहे कीं, खानाच्या कावेबाजपणाबद्दल आपण एकवार आपली प्रत्यक्ष खात्री करून घ्यावी. न जाणों, खान आमच्या तोंडावर असें बोलला यांत त्याचा एखादा अन्य डावही असूं शकेल ! ”

“ आतां मला सांग, मीं काय केलें म्हणजे मला खानाच्या मनाचा खरा अंत लावतां येईल ? ”

“ आपणांला पसंत असेल तर मी युक्ति सांगतें.” गोमती एकवार संशयी मुद्रेनें सभोंवार पाहात म्हणाली. “ आपल्या दोघांही शहाजाद्यांवर विषप्रयोग करायचें काम खानानें माझ्यावर सोंपविलें आहे व मला एकटीला तें काम होणार नाहीं म्हणून मीं आपल्या दासीला फितुर करून घ्यायचें खानापाशीं कबूल केलें आहे. जुलेखा अजून खानाच्या नीटशी परिचयाची नाहीं. यासाठीं या संधीचा फायदा घेऊन आपण जर खानाच्या अंतरंगाचा ठाव घेण्याचें मनांत आणलें तर साधण्यासारखें आहे.”

“ मग सांग कीं मी काय करूं तें सांग. त्याप्रमाणें करायला माझी तयारी आहे.”

“ पण या कामीं आपणांला जुलेखेचें सहाय्य अवश्य पाहिजे आहे.”

जुलेखेचें नांव ऐकतांच बेगम क्षणभर गप्प बसली. ती कां गप्प बसली हें ओळखून गोमती म्हणाली, “ बेगमसाहेबा ! जुलेखेला आपण तर ओळखतांच पण मीही ओळखतें. असली एकनिष्ठ दासी आपल्याला उभ्या जन्मांत दुसरीकडे मिळायची नाहीं.”

“ ठीक आहे.” बेगम आपल्या मनाशीं काय करायचा तो निश्चय करून बिजलीला म्हणाली, “ जा आणि जुलेखेला बोलावून घेऊन ये. तोंवर मी माझ्या महालांत आहे.”

गोमती जुलेखेला बोलावण्यासाठीं बाहेर गेली.

प्रकरण सोळावें

# खान गुरफटला गेला

"सादतखान ! "

फत्तेखानाच्या डेऱ्याच्या पहाऱ्यावर रात्रीं मध्यरात्रीच्या सुमाराला निद्रादेवीच्या अंकित होऊं पाहाणाऱ्या सादतखान पहारेकऱ्यानें डुकल्या घेतां घेतां आपणाला कोणीं हांक मारलेली अर्धवट ऐकून निद्रेच्या निशेंतच अर्धवट वर मान करून विचारलें, कोण आहे ? "

" मी आहें. " उत्तर मिळालें.

पण तें ऐकण्यापूर्वीच सादतखानाला पुन्हा निद्रेनें घेरलें.

" सादतखान ! पुन्हा झोंपी गेलास का ? दरवाजा उघड." पुन्हा जरा मोठ्यानें प्रश्न विचारला गेला.

" कुणी काय ही बकबक चालविली आहे ? " असें विचारीत चरफडत सादतखान डोळे चोळीत चोळीत उठून बसला. पाहतो तों गोमती एका बुरखेवाल्या व्यक्तीला बरोबर घेऊन उभी !

" बिजली ! तूं माणूस आहेस कीं हैवान आहेस ? " सादतखान अंगाला थोडे आळोखे पिळोखे देत म्हणाला. " तुला रात्र, दिवस, झोंप कांहीं आहे कीं नाहीं ? "

" अरे बाबा ! कामें असल्यावर कसली दिवसरात्र व कसली झोंप घेऊन बसलास ? तूं अगोदर दरवाजा उघड. मला कांहीं अत्यंत जरूरीच्या कामासाठीं खानसाहेबांची भेट घ्यायची आहे. " गोमती म्हणाली.

" बिजली ! तूं आतां कोणीतरी एखादा उमदा जवान गाठून शादी कर." सादतखान दरवाजा उघडतां उघडतां म्हणाला. " खरें; खानसाहेब तुझी सुलेमानशीं शादी करून देणारच आहेत. मग तुझी ही रात्रीं बेरात्रीं हिंडायची संवय आपोआप मोडेल. पण काय ग ! अखेर बेगमसाहेबांचा आमच्या खानसाहेबांशीं निका लावायचा ठरवलास का ? "

" अरे वेड्या माणसा, जरा हळू बोल ! केवढ्यानें बोलतोस ? भिंतीला देखील कान असतात ! " गोमती दरवाजाकडे वळतां वळतां म्हणाली.

" अग ! आतां त्यांत हळू बोलायचें तें काय? मियाबिबी राजी तो क्या करेगा काजी ? " गोमतीबरोबरच्या बुरखेवाल्या स्त्रीकडे निरखून पाहात म्हणाली. नंतर गोमतीच्या कानाशीं तोंड नेऊन सादतखानानें हळूंच विचारलें, " पण ही कोण तुझ्याबरोबर आणली आहेस? बेगमसाहेबांना आमच्या खानसाहेबांशिवाय करमेना म्हणून त्या तर नाहीं ना बुरखा घेऊन तुझ्याबरोबर आल्या? "

" चूप ! चूप ! असें कांहीं तरी बरळूं नकोस. खानसाहेबांना जर कळलें तर तुझी कबर बांधायची पाळी यायची.

" खरेंच ! या अल्ला ! या खुदा ! कसूर माफ ! " सादतखान ती बुरखेवाली स्त्री बेगम असावी असा गोमतीच्या बोलण्याचा गर्भितार्थ गृहित धरून दोन्ही हातांनीं थोबाडींत मारून घेत म्हणाला. " बिजली, माझी चूक झाली. कसूर माफ करो, बहन ! भूल हो गई ! पण खानसाहेबांना हें सांगू नकोस, आणि बेगमसाहेबांनीं हें ऐकलें असलें तर त्यांचीदेखील तूंच कशी ती समजूत घाल. भूल झाली खरी ! "

गोमती सादतखानाच्या बडबडीकडे दुर्लक्ष करून म्हणाली, " बरें पण खानसाहेबांना हांक मारून जागे करशील कीं नाहीं ? "

" माझ्यावर खानसाहेब रागावतील. त्याच्यापेक्षां तूंच जाऊन त्यांना जागे करीनास ? " सादतखान म्हणाला.

" पण खानसाहेबांच्या बेगमसाहेबा असतील ना त्यांच्या महालांत ? " गोमतीनें विचारलें.

" नाहीं. त्या दुसऱ्या महालांत आहेत. आतां बेगमसाहेबांना दिवस पूर्ण होत आले आहेत. केंव्हां बाळंत होतील याचा नेम नाहीं. म्हणून त्या आतांशा नेहमीं बाळंतघरांतच झोंपी जात असतात. "

"बरें; तूं खानसाहेबांचा महाल तरी आम्हांला दाखव कीं ! "

" चल, दाखवितों. " असें म्हणून सादतखान आपल्या जोडीदार पहारेकऱ्याला जागा करून पहारा सांभाळायला सांगून खानसाहेबांची झोंपण्याची जागा गोमतीला दाखविण्यासाठीं तिच्याबरोबर गेला. तिथें एक तुर्की दासी दरवाजावर पहारा करीत होती. पण तिनेंही गोमतीला ओळखून आंत जाण्याला प्रतिबंध केला नाहीं. गोमतीला एकट्यानें आंत जाणें प्रशस्त वाटेना. तिनें

त्या दासीला सांगितलें, " अमीना ! खानसाहेबांना मी आल्यें आहें असें सांग जा. "

" आणखी कोण आलें आहे म्हणून सांगूं ? " अमीनेनें विचारलें.

" आणखी म्हणावें, तुम्हीं सांगितली ती बिजलीची मैत्रीण तिच्याबरोबर आली आहे. " गोमती म्हणाली.

अमीना आंत गेली. तेवढ्यांत गोमतीनें आपल्या बरोबरच्या बुरखेवाल्या स्त्रीला हळूहळू बरेंच कायसें सांगितलें. त्या स्त्रीनें तिच्या प्रत्येक शब्दाला होकार दिला.

थोड्याच वेळांत अमीना बाहेर आली व म्हणाली, " खानसाहेब तुम्हां दोघींनाही बोलावीत आहेत. "

गोमती त्या बुरखेवाल्या स्त्रीला घेऊन आंत गेली.

" आओ ! आओ ! बिजली बेगम ! आओ ! क्या खबर लायी हो, बोलो. " खान हुक्का पीतपीत म्हणाला.

" खानसाहेब ! आपणाला बेगमसाहेबांनीं उद्यां रात्रीं आपल्या महालांत बोलाविलें आहे. " गोमती म्हणाली.

" काय, मी किल्ल्यावर येऊं ? "

" होय. "

" आणि शहाजीराजे तिथें आहेत. त्यांना पकडायची आम्ही खटपट करीत असतां—"

" त्यासाठींच तर आपण तिथवर आलें पाहिजे, म्हणजे आम्ही योग्य तो बेत करून शहाजीराजांना त्या वेळीं कांहीं जरुरीच्या कामासाठीं म्हणून बेगमसाहेबाच्या महालांत बोलावून आणूं आणि कैद करून आपल्या स्वाधीन करूं. उगाच नखाच्या कामाला कुऱ्हाडी कशाला लावायच्या ? राजे असे पकडले गेले कीं, राणीसाहेबांना मी मोठ्या चतुराईनें किल्ल्याच्या बाहेर काढून थेट आपल्या किंवा मीरजुम्लाखानांच्या स्वाधीन आणून करत्यें. "

" छे ! छे ! तसें करूं नकोस. राजांना पकडायची कामगिरी जाधवरावां-च्याच हातून पार पडली पाहिजे. त्यांत आमचा एक डाव आहे. आपण शक्य तर जिजाबाईलाच तिथल्या तेथें कैद करूं किंवा तेंही साधलें नाहीं तर पुढचा बेत तुला माहीत आहेच. "

" होय. बरें तर, तसें करूं."

" पण मी असा उघड उघड गडावर एकटाच आलों तर वेळीं शहाजी-राजे दगा फटका करतील. बरें, माझे सैनिक घेऊन आलों तरी त्यांना संशय येईल. त्यापेक्षां बेगमसाहेबाच इकडे आल्या तर कसें होईल ?

" बेगमसाहेबांना येतां येणें शक्य नाहीं. कारण शहाजीराजांनीं त्यांच्या महालासभोंवार खडा पहारा ठेवून त्यांना नजरकैदेंत ठेवलें आहे. तेव्हां आपणच तिकडे जावें हें उत्तम. आतां आपणांला कुणी ओळखलें तर पंचाईत होईल खरी. पण —"गोमती कांहीं वेळ विचार करून म्हणाली, " हो ! असेंच करायचें."

" कसें करायचें ?" खानानें विचारलें.

" असें करायचें." गोमती म्हणाली. " मी उद्यां रात्रीं दिवेलागणीच्या वेळीं इथें येईन त्या वेळीं आपण एक पालखी तयार ठेवायला लावा व आपल्या सर्व लोकांना आगाऊ वर्दी देऊन ठेवा कीं, आपल्या बिबीसाहेबा किल्ल्यावर बेगमसाहेबांच्या भेटीला जायच्या आहेत. मी पालखीबरोबर असलें, म्हणजे राजांच्या बाजूचा कोणीदेखील पहारेकरी पालखी अडवायचा नाहीं. त्यांना मी अगोदरच काय सांगावयाचें तें सांगून ठेवीन. त्या पालखींतून आपण किल्ल्यावर यावें व बेगमसाहेबांची भेट झाल्यावर तसेंच परत यावें."

गोमतीची ही युक्ति ऐकून तिच्याबरोबरच्या बुरखेवाल्या स्त्रीला हंसूं येत होतें; पण ती आंतल्या आंत हंसें दाबीत होती. खानाला थोडयाशा विचारा-अंतीं गोमतीची ही युक्ति पसंत पडली.

तेवढा भेटीचा बेत ठरल्यावर खानानें गोमतीबरोबर आलेल्या बुरखे-वाल्या स्त्रीला उद्देशून विचारलें, " ही कोण बेगमेची दासीच ना ?"

" होय." असें म्हणून गोमतीनें खानाला जरा बाजूला घेऊन हळुहळू पण त्या बुरखेवाल्या स्त्रीला ऐकूं जाईल अशा बेतानें त्याच्या कानांत सांगि-तलें, " खानसाहेब ! मी मोठ्या सावधगिरीनें ह्या दासीला वश केली आहे. तिच्याशीं आपण फार बोलायचा प्रयत्न करूं नका. मुळींच बोलला नाहीं तरी चालेल. मी तिला सर्व कांहीं सांगून ठेवलें आहे. ती जुलेखेच्या फार मर्जी-तली आहे. सुलतान व शहाजादा यांना जुलेखा आतांशा प्रत्यक्ष बेगमसाहेबांवर देखील विसंबून ठेवीत नाहीं. पण ह्या दासीवर मात्र जुलेखेचा पूर्ण विश्वास

आहे. दोघांही शहाजाद्यांच्या खाण्यापिण्याच्या व निजण्याउठण्याच्या वेळीं त्यांची तब्येत राखण्याचें काम हीच दासी करते."

"पण ती तुझ्या सांगण्याप्रमाणें करण्याला कबूल आहे ना?" खानानें विचारलें.

"हो! कबूल आहे. पण तिची एक मात्र अट आहे."

"ती कोणती?"

"तिचें असें म्हणणें आहे कीं, आपण ह्या कारस्थानांत सामील आहों ह्या गोष्टीचा कुणाला मागमूसदेखील लागतां कामा नये. बेत साधला, तर तो अपराध जुलेखेचा असें एकमुखानें सिद्ध झालें पाहिजे. आणि मग तिथें बेगमसाहेबांपाशीं राहाणें तिला जड जाईल म्हणून आपण तिला आपल्या पदरीं पट्टदासी केलें पाहिजे."

"एवढेंच ना? त्याला माझी कबुली आहे." खान म्हणाला.

"तर मग आता आपणच तिला सांगा कसें कसें करायचें तें, म्हणजे तिची समजूत पडेल." गोमती जरा मोठ्यानें म्हणाली.

"मी कशाला आणखी निराळें सांगू? तूंच सांग." खान म्हणाला.

"आपण काल ठरल्याप्रमाणें विषाची पुडी आणून टेविली आहे का?" गोमतीनें विचारलें.

"होय. आणली आहे." खान लगेच आपल्या बिछान्यापाशीं गेला व उशीखालून एक चांदीची नक्षीदार डबी काढून ती त्या बुरखेवाल्या स्त्रीच्या हातीं देऊन म्हणाला, "दोघांही शहाजाद्यांना सरबतांतून यांतली एकेक चिमटी पूड विरघळवून रात्रीं ते झोंपीं जातांना पाजायची; कीं काम झालें."

"पण खानसाहेब! दोघेही शहाजादे मारले गेल्यामुळें बेगमसाहेबा दुःख होऊन आपणांशीं निका लावायला नाराज झाल्या तर मग कसें होईल? मग आपले सारेच बेत फसतील. याचा कांहीं विचार केला आहे का?"

"हो! त्याचा विचार मीं केला आहे. बेगम आधीं बिथरायची नाहीं. माझ्यावर तिचा पूर्ण विश्वास आहे. मी असल्या कामांत सामील होईन असें तिला स्वप्नांत देखील खरें वाटायचें नाहीं. पाहिजे तर तूं तिला सांगून पाहा. शहाजीराजांनीं काय आजवर थोडें थोडकें सांगून पाहिलें? पण त्याचा काय उपयोग झाला? पण इतकेंही करून जर बेगम तेवढ्या संशयावरून माझ्याशीं

गैरवांका वागूं लागली, तर मग तिचें नशीब आणि ती ! मग त्या डबींतली आणखी एक चिमूट तिच्यासाठीं खर्च करावी लागेल, इतकेंच काय तें."

"बरं तर ! आम्ही येऊं आतां ?" गोमतीनें विचारलें.

"हो ! पण हे सर्व बेत तूं बिनबोभाट पार पाडशील ना ?" खानानें प्रश्न केला.

"हें काय विचारायला हवें ?"

"आणि शहाजीराजांच्या राणीला शक्य तर तिथल्या तिथें उद्यां कैद करायचें आहे."

"सारें माझ्या ध्यानीं आहे."

"पण काय ग बिजली ! तूं इथवर कुणीं अडविल्याशिवाय कशी ग येऊं शकलीस ?" खानानें मध्येंच विचारलें.

"कशी म्हणजे ? ह्या दासीला केली बेगमसाहेब आणि पालखींतून घेऊन आल्यें. बेगमसाहेबांची पालखी चालली आहे असें सांगतांच आम्हांला अडवायची कुणाची छाती आहे ? खानसाहेब ! तीं आमचीं कारस्थानें आम्ही जाणों. इतरांना त्यांतलें कांहींदेखील कळायचें नाहीं. पण ह्या सर्व गोष्टी नीट पार पडल्यावर आपण मला भोंसल्यांची पुणें सुभ्याकडील जहागीर देणार ना ?"

"अग एकट्या भोंसल्यांचीच कां ! आमचा दुसरा डाव सुलेमान ज्या कामगिरीवर गेला आहे तो साधला आणि मी बादशहा झालों तर तुझ्या नवऱ्याला माझा वजीरदेखील करीन."

"ठीक आहे. ह्या वचनाला अखेरपावेतों जागा म्हणजे झालें."

"अलबत ! तुझ्या करामतीवर तर माझ्या मनोरथांचा अर्धामुर्धा डोल्हारा अवलंबून आहे, तुला मी कधींच विसरणार नाहीं." खान म्हणाला.

लगेच गोमती त्या बुरखेवाल्या स्त्रीला बरोबर घेऊन खानाच्या वाड्या-बाहेर आली. कांहीं अंतरावर पालखी तयार होती, तिच्यांत ती बुरखेवाली स्त्री बसली. पालखी चालू लागली. तिच्याबरोबर गोमती चालली.

प्रकरण सतरावें

# खानाचा शेवट

"एकूण बेगमसाहेबा ! मी जें इतकें दिवस सांगत आलों, त्याची प्रचीति आपल्याला आली म्हणायची !"

" होय. प्रचीति आली. पण आतां पुढें कसें करायचें ?"

" त्याची आपण काळजी करूं नका. जोंवर ह्या शहाजीराजांच्या छत्राखालीं निजामशाही आहे तोंवर या राजवंशांतील मनुष्याच्या एका केंसालाही धक्का लावण्याची कुणा खानाची छाती नाहीं."

गोमती आपल्याबरोबर बुरखेवाल्या स्त्रीला जी घेऊन गेली ती खुद्द बेगमच होती. निजामशहाच्या–आपल्या पतीच्या हयातींतदेखील जी बेगम फत्तेखानाच्या सौंदर्याला व मधुर भाषणाला भुले, पतीच्या पश्चात् जी बेगम विषयांध बनून फत्तेखानाला आपला दिलप्यारा मानीत आली व त्याच्या नादानें करूं नये तीं अनन्वित कृत्यें करण्यास तयार झाली, तीच बेगम आतां इतकी शुद्धीवर आली याचें कारण अपत्यवात्सल्य ! फत्तेखानाच्या नादानें तिनें आपल्या अब्रूची माती करून घेतली. ती बेगमच पडली, मोठ्या माणसाचे दोष उघड उघड बोलून दाखवायला सामान्य लोकांना धैर्य नसतें, म्हणून बेगमला कोणी फत्तेखानाची रखेली म्हटलें नसेल इतकेंच. पण मनांत जो तो ओळखून होता कीं, बेगम बहकली आहे. प्रथम प्रथम बेगमेनें कांहींशी लोकापवादाची पर्वा केली; पण पुढेंपुढें ती निढावली. आणि आतां ह्या दुर्लौकिकावर पांघरूण घालून त्याबरोबरच स्वत:च्या हीन वासनेच्या पूर्ततेचा राजरस्ता तिला आतां फत्तेखानाशीं निका लावून उजळ माथ्यानें आक्रमायचा होता. साहसी, विलासलोलुप, कुमार्गगामी, बेताल अशा सत्ताधारी बेगमेच्या अशा बेलगामी वृत्तीला आळा घालण्याचें सामर्थ्य तेव्हां निजामशाहींतील एकाही कर्त्यापुरुषाच्या अंगीं तेव्हां उरलें नव्हतें. पण तें सामर्थ्य अपत्यवात्सल्याच्या भावनेच्या ठायीं होतें. पतीच्या देखत पापाचरणाकडे तिचें मन धांव घेत होतें. विषयोपभोगापुढें वैभव, लौकिक, अब्रू, सदाचार हीं सारीं क:पदार्थ आहेत, असें तिच्या मनानें घेतलें होतें. त्या बेगमेला जेव्हां कळलें कीं, फत्तेखान

राज्यतृष्णेला बळी पडून आपल्या दोघां शहाजाद्यांना ठार करायला तयार झाला आहे, तेव्हां मात्र तिचें अंतःकरण कळवळलें. ती ह्या गोष्टीचा नक्की तपास लावण्यासाठीं गोमतीनें सांगितल्याप्रमाणें बुरखेवाल्या दासीचा वेष घेऊन खानाच्या डेऱ्यांत गेली; आणि तेथें जेव्हां तिला खानाचें खरें स्वरूप कळलें, तेव्हां तिच्या मनाची खात्री झाली कीं, खान हा माणूस नाहीं; सैतान आहे. तो आपल्या पोटच्या गोळयांना ठार करणार अशी बेगमेची खातरजमा होतांच तिच्या डोळयांतील विषयाची धुंदी खाडकन उतरली व तिचें तिलाच वाटूं लागलें कीं, आपण हें काय केलें !

फत्तेखानाच्या डेऱ्याबाहेर पडल्याक्षणापासून बेगम पूर्वीची ती राहिली नाहीं; आपल्या अपत्यांचा नायनाट करण्याला टपून बसलेल्या ह्या नरपशु-वर सूड घेण्याची संधि कधीं एकदां लाभते याचा विचार करीत व त्या-संबंधांचें नाना बेत गोमतीशीं करीत ती किल्ल्यावर आली. तिला पाहिजे होती ती संधि कांहीं फार दूर नव्हती. दुसऱ्या दिवशीं फत्तेखान पालखींतून बेगमेच्या भेटीला यायचा होताच. पूर्वसंकेतानुसार त्याला आणण्यासाठीं गोमती तिकडे दिवसा उजेडींच गेली होती. ह्या नरपशूचें पारिपत्य करा-यचें झालें तरी तें आपल्यासारख्या बायकोमाणसाच्या हातून बिनबोभाट पार पडायला जड जाईल म्हणून तिनें शहाजीराजांना मुद्दाम बोलावून आणून यापुढें त्यांच्या सल्ल्यानें वागण्याचें ठरविलें होतें.

गोमतीकडून काल रात्रीं खानाच्या डेऱ्यांत घडलेला सर्व वृत्तांत राजांना यापूर्वींच कळल्यामुळें ते बेगमेच्या बोलण्यावरून तिला भेटायला आले तेच आपल्या सैन्याची जय्यत तयारी करून आले होते. त्यांच्या व बेगमे-च्या सुदैवानें तिकडे फलटणकडे जगपाळराव निंबाळकर खानाचीं हाडें मोडण्यासाठीं ससैन्य पवित्र्यावर उभे असल्याची शुभवार्ता हिरोजीनें आज दोन प्रहरींच आणली होती, व तो पुन्हा पूर्ववत् सुलेमान बनून खानापाशीं नोकरीवर रुजूही झाला होता. खानानें जेव्हां त्याला जाधवरावांकडील काम-गिरीचें काय म्हणून विचारलें तेव्हां त्यानें बेडरपणें बात झोंकून दिली कीं, जाधवराव आपला जांवई व आपली लेंक यांना वाटेंत पकडून त्यांचें पारिपत्य करण्याला तयार आहेत ! इतके जाधवराव मानमरातबाच्या आशेनें आपल्या पोटच्या पोरीवर किटाळ आणण्यालाही तयार झाले, ह्या-

बद्दल तर खानाला आनंद झालाच; पण हा थेरडा जाधवराव किती नेभळट व पागल आहे, अशा समजुतीनें त्याला झालेला आनंद पूर्वनिर्दिष्ट आनंदाहूनही और होता. शहाजी व जिजाबाई जाधवरावांच्या हातीं पकडली गेलीं म्हणजे आजचा शत्रु तर नाहींसा झालाच, शिवाय यदाकदाचित जिजाबाईला पुत्र झाला झाला असता व तो देवीच्या वरानुसार छत्रपति निपजता तर त्याचीही वाताहत लावण्याची सोय झाली असती. वजिराला पकडण्याचें काम जाधवरावांनीं केलें हा राजद्रोह केला, ह्या सबबीवर जाधवरावांनाही पकडून गाडण्याचीही सोय झाली. असें आज आपणाला एका दगडानें तीन पक्षी टार मारता येणार ! आणि एवढ्यांतच आपली बेगम बाळंत होऊन तिला पुत्र झाला तर तो श्रीफळाच्या प्रभावानें बादशहा होणारच होणार ! सारांश, आज आपल्या आयुष्यांत जिकडे तिकडे शुभशकूनच शुभशकून होत आहेत अशा समजुतीनें खानाच्या आनंदाला व उत्साहाला पारावर राहिला नव्हता. एवढा पराक्रम आपण केला असें आजच्या भेटींत बेगमेच्या कानांवर घालताच बेगम आपणाशीं निका लावून आपणाला वजिरी देण्याला किती उतावळी होईल, हीं सुखस्वप्नें खानाला गुंगवूं लागलीं.

इकडे शहाजीराजे व बेगम यांची भेट झाली. व बोलणें होऊन दिलसफाईही झाली. आतां शत्रूची फळी फोडून बाहेर कसें पडायचें याचा विचार करण्यासाठीं राजांनीं बेगमेला सर्वांच्या सुरक्षितपणाबद्दल अंतःकरणपूर्वक आश्वासन देऊन तिचा निरोप घेतला. इतक्यांत खानाची पालखी येत आहे अशी मध्यरात्रीच्या सुमाराला गुप्तवार्ता घेऊन हिरोजी नव्हे-खानाच्या विश्वासांतील सुलेमान पुढें आला. त्याच्या स्वागताची तयारी करण्यासाठीं बेगमेनें जुलेखेला हांक मारून सांगितलें, "जुलेखा ! हें पाहा, आमच्यासाठीं शराबेचे पेले जेव्हां भरून आणशील तेव्हां आज मी तुझ्याकडे देऊन ठेवली आहे ना, ती सगळी पूड एका प्याल्यांत टाकायची व नेमका तोच प्याला खानसाहेबासमोर ठेवायचा राहील लक्षांत ?"

"होय बेगमसाहेबा !" असें म्हणून बेगमेच्या साहसाचा विस्मयपूर्ण विचार करीत जुलेखा तेथून निघून गेली.

थोड्याच वेळांत बेगमेच्या महालासमोर एक पालखी येऊन उतरली. गोमती—नव्हे बिजली पालखीबरोबर होतीच. ती चपळाईनें पुढें येऊन बेग-

मेला म्हणाली, " बेगमसाहेबा ! शांतपणा सोडूं नका. असल्या शत्रूचा गळा कापायचा तो तरवारीनें कापण्यापेक्षां केंसानें कापण्यांतच खरें चातुर्य असतें. आपण डगमगूं नका, मी आपल्या बाजूला उभी आहें. "

" बेगमसाहेबा! आपला हुकूम ऐकतांच बंद्या गुलामासारखा धांवत आपल्या भेटीला आलों." असें म्हणत फत्तेखान पालखींतून उतरला तो तसाच गोमतीनें वाट दाखविल्याप्रमाणें आंत बेगमेच्या महालांत गेला. तिथें बेगम बसलेली पाहून तिच्या अगदीं शेजारीं बसून तो म्हणाला, " इतक्या तांतडीनें आपण मला कशाला बोलविलें ? "

बेगमेनें गोमतीला खूण करतांच गोमती महालाच्या बाहेर जाऊन दरवाजाच्या आड खानाच्या अकलेचे तारे आतां कसे काय तुटतात तें ऐकत उभी राहिली.

" फत्तेखान ! मीं तुम्हांला अशासाठीं बोलावलें कीं,–पण माझ्यापाशीं खरें बोलाल ना ? " बेगमेनें विचारलें.

" म्हणजे ! बेगमसाहेबा ? आपणांला माझा इतक्या दिवसांचा परिचय असतांना अजूनदेखील आपणांला माझा विश्वास वाटत नाहीं का ? "

" तसें नव्हे; पण मीं असें ऐकलें आहे कीं, शहाजीराजे सामोपचारांनीं वजिरी सोडावयाला तयार नाहींत. "

" तें तर मीं आपणांला यापूर्वीच सांगितलें आहे."

" इतकेंच नव्हे; पण त्यांच्या मनांत याहूनही दुष्टपणाचा एक विचार उत्पन्न झाल्याचें मला कळलें आहे. माझ्या दोघां मुलांना ठार करून सारी निजामशाही बळकावण्याचा त्यांचा बेत आहे. "

" अफ्सोस ! पाहा ! तुम्हीं विश्वासानें शहाजी भोंसल्याला वजिरी दिली त्याचे हे परिणाम पाहा. ही हिंदूंची दानत ! " फत्तेखान मिशीला पीळ भरीत ओठ मिटीत रागावल्यासारखें करून म्हणाला.

" असल्या अपराधाबद्दल तुम्ही शहाजीराजांना काय शिक्षा करूं शकाल ? " बेगमेनें विचारलें.

" बेगमसाहेबा ! वजिरांचा हा धडधडीत राजद्रोहाचा गुन्हा आहे. वजिरासारख्या जबाबदार माणसानें आपल्या बादशहाविरुद्ध असलीं कटकारस्थानें उभारणें ह्या गुन्ह्याला दुसरी जोडच नाहीं. साधी देहान्त शिक्षा, कडे-

लोट करणें किंवा हत्तीच्या पायीं देऊन मारणें असल्या शिक्षाही ह्या अपराधाच्या मानानें सौम्यच ठरतील. ”

बेगमेनें जुलेखेला हांक मारली, “ जुलेखा ! ”

“ आज्ञा बेगमसाहेबा !” असें म्हणून जुलेखा समोर येऊन हात जोडून उभी राहिली.

“ खानसाहेब आले आहेत. त्यांची सरबराई ? ”

जुलेखा पुन्हा बेगमेला अभिवादन करून आंत गेली. ती थोड्याच वेळांत शराबेने भरलेले दोन सोन्याचे पेले व खानसाहेबांसाठीं सोन्याचा हुक्का घेऊन आली. बेगमेनें त्यांतला एक पेला आग्रहानें खानाच्या हातीं दिला व दुसरा आपल्या ओंठीं लावला.

बेगमसाहेबांची शराब पिऊन झाली व खानानेंही आपला पेला रिकामा केला. बेगम पुन्हां बोलूं लागली, “ फत्तेखान ! राजांनीं माझ्याशीं दगलबाजी केली आहे यांत शंका नाहीं. त्या त्यांच्या अपराधाबद्दल त्यांना शिक्षा करायची ती तशाच विश्वासघातानें करावी, असें मला वाटतें. ” बेगमेनें जुलेखेला पुन्हा हांक मारून सांगितलें, “ जुलेखा ! हे पेले घेऊन जा आणि एक छानदारशी पट्टी खानसाहेबांकरितां घेऊन ये.”

बेगमेनें अगोदरच वर्दी दिल्याप्रमाणें जुलेखेनें पान, पट्टी, हुक्का, शराब वगैरे आगाऊच सर्व सिद्धता करून ठेविली होती. बेगमेनें पट्टी म्हणतांच तिनें ताबडतोब दोन पट्ट्या आणून त्यांतली एक खानाच्या व दुसरी बेगमेच्या हातीं दिली.

पट्टी तोंडांत टाकीत बेगम म्हणाली, “ फत्तेखान ! राजांसारख्या राजेद्रोही माणसाला मी स्वत: जातीनेंच शासन करणें चांगलें. उद्यां राजांना मुद्दाम गौरवानें घरीं बोलावून त्यांना शराबमधून विष पाजून ठार करायचा माझा मानस आहे. यावर तुमचें मत काय आहे ? ”

“ बेगमसाहेबा ! मला वाटतें, तुम्ही अत्यंत दयाळू अंतःकरणानें राजांना ही शिक्षा करीत आहां. तुमच्या जागीं मी असतों तर—पण जाऊंद्या. मी तरी तुमच्या इच्छेआड कशाला येऊं ? ”

बोलतां बोलतां बेगम एकाएकीं उठून आंत गेली व लगेच त्या महालाचे दरवाजे लागले गेले. पाव घटका झाली तरी बेगम कांहीं महालांत परत

आली नाहीं. आणि जरी एका घटकेनंतर कधीं परत आली असती तरी त्याची खानाला दाद लागली नसती. कारण तेवढ्यांत खानानें प्यालेल्या शराबेंतील अंमली पदार्थानें आपला प्रभाव दाखवायला सुरुवात केली होती.

कारभारी मंडळीला बोलावून जेव्हां बेगमेनें फत्तेखानाला कैद केल्याचें सांगितलें तेव्हां त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. हें कसें शक्य झालें? खानाला पूर्णपणें भाळून जाऊन त्याच्या लहरींची सांवली बनलेली बेगम एकदम त्या खानाला चुटकीसरशी या कानाचें त्या कानाला न कळतां दूर झुगारूं शकते, या घटनेनें त्यांच्याही छातींत क्षणभर धडकी भरली. कारण प्रत्येक कारभारी जरी खानाचा मनांतून द्वेष करीत होता, तरी त्याची मनांतील इच्छा खानाप्रमाणेंच आपण बेगमेला आपल्या तंत्रानें वागायला लावावें अशीच होती. ती इच्छा सहज साधणारी तर नाहींच; पण त्या इच्छेमुळें खानाची जी गत झाली तीच आपली होणार नाहीं कशावरून? ह्या भीतीनें जो तो बेगमेशीं जरा नमून बोलूं लागला. तें पुढचें पुढें पाहातां येईल असा विचार करून तूर्त फत्तेखान अनायासें बेगमेच्या रोषाला पात्र झाल्यामुळें बंदिवान झाला याबद्दल बेगमेला धन्यवाद देणारांत हमीदखान प्रमुख होता. त्यानें बाकीच्या कारभाऱ्यांच्या संमतीनें फत्तेखानाची नीट बंदोबस्तानें दूरच्या एखाद्या बळकट किल्ल्यावर बंदींत ठेवण्याची व्यवस्था तांतडीनें करण्याची कामगिरी आपल्या हातीं घेतली.

तिकडे शहाजीराजे त्या संधीचा फायदा घेऊन आपलो सर्वांची सुटका कशी करून घेतां येईल या विचारांत गढून गेले होते. सुलेमान व त्याचे आणखी इतर साथीदार तिथें हजर होते त्यांनीं कांहीं वेळ राजाशीं काय मसलत करायची ती करून पुढचा मार्ग आंखला होता. बेगमेनें इकडे फत्तेखानाला कसें कैद केलें ही गोष्ट राजांना गोमतीकडून तेव्हाच समजली. त्यामुळें राजांच्या मार्गांतील एक कांटा अनायासें नाहींसा झाला होता. गोमतीही सुलेमानशीं खलबत करण्यांत इतका वेळ अगदीं चूर होऊन गेली होती. अखेर सर्व सिद्धता झाली तेव्हां सुलेमाननें पुढें होऊन राजांना हात जोडून विनंति केली, "महाराज, आतां आपण चलायचें. खानाची पालखी अनायासें आपल्या हातीं आली आहे. व खानाची बेगम बेगमेला भेटायला आली असल्याचें

सर्वांना माहीत आहे. तेव्हां दोन्ही बेगमा परत जात आहेत ह्या सबबीवर आपणांला येथून बिनबोभाट बाहेर जातां येईल."

शहाजीराजांना ही युक्ति मान्य करण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. कारण त्यांची एक गोष्ट निराळी. पण जिजाबाई व बेगम ही मंडळी त्यांच्या बरोबर जायची होती. त्यांनीं या योजनेला मान्यता दिली व जिजाबाईला हांक मारून पालखींत बसायला सांगितलें. तेव्हां जिजाबाई उत्तरली, " आमच्याविषयीं आपण इतके भितां का ? आपणांला मी काल सांगितलें ना कीं, जोंपर्यंत भावी छत्रपती माझ्या उदरीं आहेत तोंपर्यंत आम्हांला संकटांची कांहींच कदर नाहीं. आपण पहिल्यानें बेगमसाहेबांना आणि त्यांच्या मुलांना सुरक्षितपणें राजधानीला पोंचविण्याची व्यवस्था करा. आणि मग आम्ही आमच्या सुटकेची व्यवस्था पाहूं. बेगम आणि त्यांचीं मुलें यांच्या रक्षणाची तजवीज करणें हें आपलें कर्तव्य आहे." यावर आणखी बराच वेळ भवति न भवति होऊन अखेर सर्वानुमतें बेगम व तिचीं मुलें यांनाच प्रथम राजधानीला सुरक्षितपणें पोंचतें करावें असें ठरलें. हिरोजीनें ती कामगिरी आनंदानें आपल्या शिरावर घेतली. व तो बेगमसाहेबांकडे ह्या योजनेची वर्दी देण्यासाठीं गेला. गोमतीनें आपणांजवळ राहावें अशी जिजाबाईची उत्कट इच्छा होती. पण गोमती तें कबूल करीना. तिनें हात जोडून सांगितलें, " राणीसाहेब, माझी कामगिरी अजून संपली नाहीं. मला अजून मीरजुम्लाखानाला दिलेलें वचन पूर्ण करायचें आहे; त्यासाठीं फत्तेखानाची बेगम बाळंत होईतों मला माहुली सोडतां यायची नाहीं. माझी कामगिरी पूर्ण झाली, कीं मी आपल्या पायापाशीं ठेवलेली आहे."

जिजाबाईला गोमतीचीं सारीं कारस्थानें माहीत असल्यामुळें तिनेंही फारसे आढेवेढे घेतले नाहींत. इतक्यांत बेगम व तिचीं मुलें तिथें आलीं. राजांनीं आणखी दोन पालख्या देऊन त्यांतून बेगमेची नीट समजूत पाडून तिला व तिच्या मुलांना जुलेखेसह रवाना करून दिलें. मात्र कशीही वेळ आली तरी ह्या मंडळींच्या केंसालाही धक्का लागूं नये म्हणून ह्या तीन पालख्या उचलणारे भोई राजांनीं आपल्या पदरचे दिले. हे भोई म्हणजे राजांच्या पदरचे निवडक लढवय्ये वीर होते.

बेगमेनें पालखींत बसतां बसतां राजांना पुन्हां एकवार जवळ बोलावून सांगितलें, " राजे ! आतां झाल्या त्या गोष्टी होऊन गेल्या. पण यापुढें माझा

सर्व विश्वास तुमच्यावर आहे. एवढ्या अफाट राज्यांत आमच्याशीं सच्चेपणानें वागणारा असा एक पुरुष निघाला आणि ते तुम्ही. तुम्ही आमच्याशीं यापुढेंही नेकीनें वागावें व पराक्रमी पुरुष आपल्या वंशांत जन्माला यावा ही तुमची इच्छा खुदानें पूर्ण करावी. निजामशाहीचे नोकर म्हणून नाहीं तर दोस्त म्हणून तुमची जेणेंकरून भरभराट होईल तें तें आम्हांला प्रियच आहे. तुमच्या राणीसाहेबांना नीट जपा. एक शत्रु सांपडला तसाच दुसऱ्याचाही मोड करायचें तुम्हांला सांगायला नकोच. आम्ही राजधानींत पोंचतांच तुम्हांला पुत्ररत्न झाल्याची बातमी कानीं येतांक्षणींच नजराणा पाठवून देऊं."

लगेच सर्वांचे निरोप प्रतिनिरोप होऊन बेगम आपल्या मुलांसह पालखींतून निघाली. त्यांना फत्तेखानाच्या गोटापार करून देण्यासाठीं फत्तेखानाची अत्यंत विश्वासू बातमीदारीण गोमती बरोबर गेली. इकडे शहाजीराजे जिजाबाईला घेऊन बाहेर जाण्याच्या उद्योगाला लागले.

## प्रकरण अठरावें

# पुढील बेत

जिजाबाईला पकडण्याविषयीं मीरजुम्लाखानाची चळवळ जेव्हां जोरांत दिसूं लागली, तेव्हां राजरोसपणें जिजाबाईला घेऊन जाणें शहाजीराजांना सुरक्षितपणाचें वाटेना. पण जिजाबाईचा तर असा हट्ट कीं, पतीला सोडून दूर म्हणून राहायचें नाहीं. आतां काय करावें याचा राजांना मोठा पेंच येऊन पडला. तेंवढ्यांत गोमती उजाडतां उजाडतां मीरजुम्लाखानाला भेटून तिकडे काय कारस्थानें करायचीं तीं करून तिथें आली. तिनें जेव्हां ही परिस्थिति पाहिली, तेव्हां ती म्हणाली, " राणीसाहेब ! आपला महाराजांबरोबर जाण्याचा निश्चय कायम आहे ना ? "

" होय." जिजाबाई म्हणाली.

" तर मग मी एक युक्ति योजली आहे ती सांगत्यें. पण माझ्या शब्दाचा अनादर नाहीं ना होणार ? " गोमतीनें शहाजीराजांकडे पाहात विचारलें.

" तुझ्या शब्दाचा आणि अनादर ? मुळींच व्हायचा नाहीं. तूं आपल्या कारस्थानपटुत्वानें आम्हां साऱ्या राजकार्यधुरंधर माणसांना तोंडांत बोटें घालायला लावलें आहेस. सांग; तुझी काय ती युक्ति सांग. " राजे म्हणाले.

" मी आतांच मीरजुम्लाखानांना अशी भूल पाडून आल्यें आहें कीं, जिजाबाईराणीसाहेबांच्या पोटांत दुखतें आहे, त्या आतां किल्ल्यावरच बाळंत होणार. तेव्हां अशा स्थितींत त्यांना पकडण्याच्या भरीला पडण्यांत अर्थ नाहीं. "

" म्हणजे तुझ्या व खानाच्या मतें मी इथेंच बाळंत होणार ? " जिजाबाईनें विनोदपूर्ण स्वरानें विचारलें.

" ऐका तरी ! " गोमती म्हणाली. " राणीसाहेब ! हीच मी जर मध्यें-मध्यें बोलल्यें असत्यें, तर आपण मला बडबडी म्हणालां असतां, लुब्री म्हणालां असतां, आणखी काय वाटेल तें म्हणालां असतां ! "

" होय. तसा लुब्रेपणा आतां माझ्याकडून झाला खरा. "

" तसें कांहीं मी म्हणत नाहीं; आपणांला तसें म्हणायला मला का वेड लागलें आहे ? पण आपलें सांगितलें. तेव्हां खुनापाशीं मीं कबूल केलें आहे कीं राणीसाहेब बाळंत होतांच त्या रात्रीं त्यांना पुत्र झाला तर तो चोरून त्याला नेऊन द्यायचा. " गोमती आपल्या तोंडून अभद्र उच्चार झाल्यामुळें परमेश्वराचें नांव घेऊन हळूहळू पांच वेळां थोबाडींत मारून घेऊन म्हणाली, " आतां राजेसाहेबांनीं शत्रूशीं उघड सामना देण्याची तयारी केलीच आहे. तो सामना त्यानीं द्यावा. मीं फत्तेखानाच्या बेगमेला दौलताबादेला पोंचविण्याचें कबूल केलें असल्याचें मीरजुम्लाखानाला सांगून त्याच्याकडून तशी मोकळीकही मिळविली आहे. "

" अग ! पण खानाची बेगम जर तुझ्यावर इतक्यांत उलटली तर ?"

" पुन्हा तेंच ! राणीसाहेब ! मी इतकी का बोंडल्यानें दूध पिणारी आहे ? माझें बोलणें पुरें ऐकून तरी घ्याल कीं नाहीं ? "

" बरें, बोल बाई ! "

" राणीसाहेब ! रागाऊं नका. एवढा मोठा खान जर मी मारला, बेगमसाहेबांना देखील जर मारलें, तर खानाच्या बेगमेचें काय घेऊन बसलां ?"

" सांग. तूं पुढें काय बेत ठरविला आहेस, तो सांग. " शहाजीराजे म्हणाले.

" पुढचा बेत असा कीं पालखींतून राणीसाहेबांनीं थेट राजरस्त्यानें बाहेर पडावें व आपण आपल्या सैन्याच्या एका तुकडीला इथें खानाशीं लढायला सांगून किल्ल्याच्या मागच्या वाटेनें राणीसाहेबांना जाऊन मिळावें. तोंवर राणीसाहेब किल्ल्यावर बाळंत झाल्या कीं त्यांना मूल होईल तें खानाच्या स्वाधीन करण्यासाठीं मला इथें राहाणें अवश्य आहे. "

" पण राणीसाहेब पालखींतून निघाल्या व खानानें विश्वासघात करून त्यांच्यावर हल्ला केला तर ? " शहाजीराजांनीं विचारलें.

" खान विश्वासघात कसा करील ? खानासारखे दुष्ट लोक आमच्यासारख्या बायकामाणसांकडून असलीं कारस्थानें पूर्ण करून घेतात, तो आमच्यावर त्यांचा विश्वास असतो म्हणूनच. महाराज ! आपणांसारखे मर्द त्यांचा तरवारीनें गळा कापायला उठतात म्हणून ते त्यांचे शत्रु मी कांहीं त्याचा तरवारीनें गळा कापणार नाहीं; केंसानें गळा कापणार ! मी मी म्हणणाऱ्या चतुरांची चतुराई व तपस्व्यांची तपस्यादेखील स्त्रीसमोर फिकी पडते."

जिजाबाई हंसत हंसत राजांकडे व पुन्हां गोमतीकडे पाहात म्हणाली, " गोमती ! तूं म्हणतेस त्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. महाराज, असेंच करायचें; मला हें मान्य आहे. त्यांतूनही खानानें माझ्यावर हल्ला केलाच तर चार सेवक सशस्त्र माझ्याबरोबर असावे. पण इतकें तरी कशाला ! मी म्हणतें, एकटा हिरोजी माझ्याबरोबर असला कीं माझें काम भागेल. "

" खरेंच, राणीसाहेब ! मी तरी तेंच सुचविणार होत्यें. मात्र आपण एक करा. " गोमती म्हणाली.

" काय करूं ? सांग."

" सांगत्यें. पण हिरोजी आला का ? "

" तो आतां इतक्यांत येईल." राजे म्हणाले.

" आंत या राणीसाहेब ! आपणांला मी काय करायचें तें सांगत्यें." असें म्हणून गोमती जिजाबाईला आंत घेऊन गेली. जातां जातां तिनें गंड-

कीला हाक मारून सांगितलें, " गंडकी ! हिरोजी जर आला तर त्याला राणीसाहेबांनीं भेटायला सांगितलें आहे म्हणून सांग व आंत पाठवून दे."

गोमतीनें वस्तुतः गंडकीला हा हुकूम केला असें नाहीं; गंडकीला मात्र वाटलें कीं, ही टवळी आपणावर हुकमत चालवणारी कोण ! हीच गोमती एकटी असतांना असें बोलती, तर गंडकीनें तिच्या शब्दाला मान देण्याचें साफ नाकारलें असतें. पण राणीसाहेब गोमतीच्या बरोबर होत्या व त्यांनीं अलीकडे गोमतीचें फारच प्रस्थ माजवून ठेविलें होतें, तेथें गंडकीचा नाइलाज होता.

" मग काय राणीसाहेब ! तुमचा बेत कायम झाला म्हणायचा ? आतां आम्हीं आमच्या उद्योगाला लागतों." शहाजीराजे जिजाबाईला बाहेर येतांना पाहून म्हणाले.

" होय. पण आपण बाबांशीं पुन्हा एकदा सामोपचाराचा प्रयत्न करून बघायचें कबूल केलें आहे तें लक्षांत आहे ना ?" जिजाबाईनें विचारलें.

" होय. मला कांहीं त्याचा फारसा उपयोग होण्याची आशा वाटत नाहीं. तरी पण प्रयत्न करून पाहायचा." राजे म्हणाले.

हिरोजी नव्हे सुलेमान बेगमेला सुरक्षितपणें दौलताबादेकडे रवाना करून व कांहीं सैनिक तिच्या रक्षणाला देऊन परत आला, तो जिजाबाईचा निरोप ऐकतांच तसाच तिकडे गेला. गोमती व जिजाबाई यांनीं तोंपर्यंत असें ठरविलें कीं, खुद्द जिजाबाईनें बेगमेसारखा पेहराव करावा व हिरोजी आणि आणखी कांहीं त्याच्या तोडीचे लढवय्ये यांनींही स्त्रीवेश घेऊन बेगमेच्या लवाजम्याऐवजीं पालख्यांतून बेगमेबरोबर अर्थात् जिजाबाईबरोबर जावें. ही योजना गोमतीनें हिरोजीला बाजूला घेऊन समजावून सांगितली ती हिरोजीला नापसंत पडणें शक्यच नव्हतें. कारण एकतर राजा–राणीच्या रक्षणासाठीं काय पाहिजे तें करण्याची त्याची तयारी होती, व शिवाय ही मसलत गोमतीची होती.

" गोमती !" हिरोजी गोमतीची योजना ऐकून जिजाबाई आंत संभाजीशीं बोलत बसली आहे अशी संधि साधून म्हणाला, " तुझ्यासाठीं मी आजवर मुसलमान म्हणून वागत आलों. तेवढ्यानेंही तुझें समाधान होईना म्हणून आज मला तूं लुगडें नेसवणार व बांगड्या भरायला लावणार !"

गोमती यावर मिस्किलपणें म्हणाली, " मग ? बायको फुकटची मिळते वाटतें ? "

बोलतां बोलतां आपलें संभाषण कुणीतरी चोरून ऐकत आहे असा गोमतीला व मुसलमान वेषधारी हिरोजीलाही भास झाला. त्यांनीं मागें वळून पाहिलें; पण कांहीं पत्ता लागेना. या ठिकाणीं शत्रूचा कोणी माणूस येऊन चोरून ऐकत उभा राहील हें शक्य नव्हतें. पण जिजाबाई बाहेर येऊन ऐकणें मात्र शक्य होतें. आतांपर्यंत गोमती आणि हिरोजी यांनीं आपला प्रेमसंबंध जिजाबाईच्या नजरेला न येऊं देण्याविषयीं खबरदारी घेतली होती. जिजाबाईला तें कळलें असतें तर तिनें त्या दोघांना दोषी ठरविलें असतें असें नाहीं; उलट तिला तसें झालेलें पाहाण्यांत आनंदच वाटला असता. अलीकडे अनेक वार जिजाबाईच्या मनांत तसे विचार येऊं लागले होते व ते यथाकाळीं बोलून दाखवायचे असाही तिचा मानस होता. तरी पण हिरोजी आणि गोमती आपली पायरी ओळखून वागत होतीं. गंडकीला गोमतीचा हेवा वाटत असल्यमुळें ती गोमतीच्या प्रत्येक गोष्टीकडे संशयी मुद्रेनेंच पाहात असे.. गंडकी जितकी संशयी व कुढया मनाची होती, तितकी शहाणी व चतुर नसल्यानें सहा महिने रामायण वाचूनही शेवटी रामाची सीता कोण हें विचारूं पाहाणाऱ्या मठ्ठ माणसाप्रमाणें तिला हिरोजी व सुलेमान या दोन्ही व्यक्ति एकच आहेत हें अजून कळलें नव्हतें. तिनें गोमतीला कधीं हिरोजीशीं बोलतांना पाहिलें होतें व कधीं सुलेमानाशीं बोलतांना पाहिलें होतें. सुलेमानाशीं गोमती-ची जानपछान आहे, त्यावरून गोमती खानाशीं फितूर आहे असें जिजाबाईला पटाविण्याचा प्रयत्न तिनें यापूर्वीच करून पाहिला होता पण तो तिच्या दुर्दैवानें फसला होता. तरीपण गोमती व सुलेमान यांची ज्याअर्थीं इतकी दोस्ती आहे त्याअर्थीं त्यांचा तसाच कांहीं संबंध असेल कीं काय, असा संशय गंडकीच्या मनांत ठाणें देऊन बसला होता. ह्या गोष्टीचीही यापूर्वीच तिनें जिजाबाईकडे वर्दी दिली असती. पण जिजाबाई ह्या गोष्टी मनावर घेणार नाहीं म्हणून तसाच बळकट पुरावा सांपडेपर्यंत तिनें स्वस्थ राहाण्याचें ठरविलें होतें. तो पुरावा तिला आज सांपडला. गोमती व हिरोजी यांना जी चाहूल लागली तो खोटी नव्हती, गंडकीच गोमती ह्या मुसलमानाशीं काय हितगुज करते तें चोरून ऐकत उभी होती. गोमती आणि हिरोजी यांचें संभाषण तिला

ओझरतें ऐकूं गेल्यामुळें हीं दोघें लग्नाच्या गोष्टी बोलत आहेत हें तिनें ताडलें व ती त्यांचें संभाषण आपले तीक्ष्ण कान अधिक सरसावून ऐकत उभी राहिली. गोमतीनें हिरोजीला सांगितलेलें तिला ऐकूं आलें, "आतां मीरजुम्ला-खानाची तेवढी अट पुरी केली, आणि भावी छत्रपतीला ठार मारण्याची त्याची हौस पुरवून त्याला माघारें जायला मोकळीक करून दिली कीं मग आपल्या सुखाला पारावर नाहीं. तो मूर्ख मग तुमच्या नांवानें मोठी जहागीर देणार आहे आपणांला."

गंडकीनें गोमतीचे हे शेवटचे शब्द ऐकले तेव्हां तिनें आपल्या अक्कल-हुशारीनें तर्क बांधला कीं, गोमती सुलेमानाच्या गळ्यांत पडण्यासाठीं राणी-साहेबांच्या पोटीं जो भावी छत्रपति जन्माला येणार त्याला घेऊन शत्रूच्या स्वाधीन करायला तयार झाली आहे. एवढा गोमतीच्याविरुद्ध पुरावा गंड-कीला सांपडतांच माकडाच्या हातांत कोलीत दिल्याप्रमाणें तिची अवस्था झाली. ती तशीच लगबगीनें गोमतीविरुद्ध जिजाबाईचें मन कलुषित कर-ण्यासाठीं तिच्यापाशीं गेली व म्हणाली, "राणीसाहेब ! मी आपल्याला पूर्वींच सांगितलें होतें कीं, गोमती त्या मुसलमानाला—सुलेमानाला—वश आहे. सुलेमानही शत्रूचा नोकर आहे हें आपण जाणतांच. आणि त्याच्याशीं गोम-तीची दोस्ती. दोस्ती नुसतीच नाहीं; आपणांला पाहिजे तर दाखवितें या. ती आतां सुलेमानाशीं लग्नाच्या गोष्टी बोलत उभी आहे. तसेंच राणीसाहेब ! आपण बाळंत झाल्यावर आपल्या उदरीं जन्माला येणाऱ्या छत्रपतींना मीर-जुम्लाखानाच्या स्वाधीन करण्याचा गोमतीचा बेत आहे. इतकी विश्वास-घातकी मुसलमानाच्या नादानें काय पाहिजे तें अनर्थ करायला तयार होणारी गोमती आपणांला गळ्यांतला ताईत वाटते. पण मला वाईट इतकेंच वाटतें कीं ह्या ताईताचा गळफांस होऊन तो आपल्या गळ्याला लागत असतांना देखील तो आपणांला जाणवत नाहीं. पाहिजे तर दाखवत्यें चला."

जिजाबाईला गंडकीनें काय सांगितलें तें सर्व कळलें. सुलेमान हाच हिरोजी आहे एवढेंदेखील ओळखण्याइतकी अक्कल गंडकीला नाहीं हें पाहून तिला गंडकीच्या मंदबुद्धीची कींव आली. पण एका अर्थी तिला त्यांत बरेंही वाटलें. कारण गोमतीच्या उत्कर्षाविषयीं असंतुष्ट झालेल्या गंडकीला हे सारे अंतर्भेद जर कळले असते तर शत्रूला तिच्या भोळेपणाचा फायदा घेतां

आला असता. गंडकीचा हा भोळेपणा शेवटपर्यंत कायम टिकावा म्हणून आपणांला जणु कांहीं कांहींच माहीत नाहीं असें दर्शवून ती म्हणाली, "गंडकी, चल, मला दाखव पाहूं तीं कुठें बोलत उभीं आहेत तीं !"

"चला दाखवितें." असें म्हणून गंडकी जिजाबाईला घेऊन हिरोजी व गोमती बोलत होतीं तिथवर जाऊन जरा आडोशाला उभी राहिली.

गोमती आणि हिरोजी यांचें संभाषण आतां बहुतेक संपत आलें होतें. जातां जतां एकमेकांचा अखेरचा निरोप घेतांना जेव्हां हिरोजीनें गोमतीचा हात आपल्या हातीं धरला व तिला हृदयाशीं घट्ट धरलें तेव्हां गंडकी इकडे जिजाबाईला हळूच म्हणाली, "तें पाहा, राणीसाहेब ! मी सांगितलें ना तो देखावा पाहा. तो मुसलमान आणि ही हिंदू—असल्या बाटलेल्या दासीला आपण आपल्या वाड्यांत वावरूं द्यायचें, यामुळें भ्रष्टाचार होतो."

जिजाबाई गंडकीच्या बोलण्याकडे लक्ष न देतां गोमती हिरोजीच्या बाहुपाशांतून मोकळी झाली तेव्हां पुढें सरून म्हणाली, "चोर सांपडले."

हिरोजी आणि गोमती ह्या दोघांनींही मागें वळून पाहिलें तों तेथें राणीसाहेब उभ्या ! त्यांना पाहातांच तीं दोघेंही ओशाळल्यासारखीं झालीं. हिरोजी तर तिथून चपळाईनें पळ काढण्याच्या विचारांत होता. पण जिजाबाईनें त्याला हांक मारून म्हटलें, "सुलेमान ! उभा राहा. तुला मी चोरी करतांना पकडलें आहे."

तो भीतभीत जिजाबाईसमोर येऊन हात जोडून उभा राहिला. त्याला जिजाबाईच्या बोलण्यांतील भावार्थ कळून चुकला होता. आणि गोमतीला ही आपली थट्टा चालली आहे, हें माहीत होतें. ती आपल्या शालीनतेला साजेशा डौलदार पण नम्र भाषेंत जिजाबाईपाशीं येऊन म्हणाली, "राणीसाहेब ! आपला बेत कायम झाला. आतां आपल्याला कसलीही चिंता उरली नाहीं."

जिजाबाई गोमतीच्या गालांवर हळूंच लडिवाळपणें एक चापटी मारून म्हणाली, "बेत कायम झाला हें मला कळलें; पण तुम्ही दोघें आतां इथें एकटीं उभीं राहून काय काय बोलत होतां, काय बेत करीत होतां तेंही तें माझ्या कानांनीं प्रत्यक्ष ऐकलें आहे व डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें आहे."

"मला वाटतें, राणीसाहेब !" गोमती बाजूला उभी असलेल्या गंडकी-

कडे भेदक दृष्टीनें पाहात जिजाबाईकडे वळून म्हणाली, "ह्या लुब्र्या गंडकीनें ही लावालावी केली असली पाहिजे."

"मग गंडकी माझी विश्वासांतील दासी आहेच. शिवाय मीही तुम्हांला गुन्हा करतांना व गुन्हेगारीच्या गोष्टी बोलतांना पाहिलें प्रत्यक्ष आहे. ह्याबद्दल तुम्हांला जबरदस्त शासनही मी करणार आहें. पण तें तुम्ही शिरावर घेतलेली कामगिरी तुमच्या हातून पार पडली म्हणजे." जिजाबाई सुलेमानकडे वळून म्हणाली. "सुलेमान ! तुझ्या पायांत हीच संसाराची बेडी कायमची ठोकून मी तुला लौकरच जन्मठेपेचा बंदिवान करून ठेवणार आहें." लगेच जिजाबाई गोमतीकडे वळून म्हणाली, "आणि गोमती ! तुला हा मुसलमान फार आवडलेला दिसतो याबद्दल शिक्षा म्हणून तुझें मी या मुसलमानाशींच लग्न लावून देईन. जा आतां आपल्या उद्योगाला लागा."

जिजाबाईच्या सांगण्याप्रमाणें गोमती व हिरोजी आपल्या कारस्थानाच्या पुढील उद्योगाला लागली. गंडकी मात्र जिजाबाईबरोबरच होती. जिजाबाईनें हिरोजी व गोमती यांना फर्मावलेल्या शिक्षेंतील रहस्य गंडकीच्या कांहीं गळीं उतरलें नाहीं. पण त्यांतल्या त्यांत दुःखांत सुख तिला एवढेंच वाटलें कीं, गोमती एकदां मुसलमानाची बायको होऊन निघून गेली म्हणजे तरी राणीसाहेबांच्या महालांतील महादासीपद आपणांला प्राप्त होईल !

## प्रकरण एकोणिसावें

# पिता-पुत्रीची भेट

बेगमसाहेबा आपल्या परिवारासह जात आहेत हें मीरजुम्लाखानाला व त्याच्या इतर नोकरांना आगाऊ माहीत असल्यामुळें रस्त्यांनें जाणाऱ्या पालख्या कोणीही अडविल्या नाहींत. नाहीं म्हणायला त्या खरोखरच बेगमसाहेबा जात आहेत कीं यांतही कांहीं शहाजीराजांची फंदफितुरी आहे हें

पाहण्यासाठीं खानानें आपल्या दोघां तुर्की दासींकडून पालख्यात बसून कोण कोण मंडळी चालली आहेत याचा शोध घेतला. त्या तुर्की दासींनीं बेगमेला प्रत्यक्ष असें कधींच पाहिलें नव्हतें, तरीही त्यांनीं पालख्यांतील मंडळींच्या पेहरावावरून व बुरख्यावरून आपल्या मतें ओळखलें कीं, ही अमकी बेगम आणि ह्या तिच्या दासी. एवढी खात्री पटल्यावर खान तरी जास्त चौकशी कशाला करील !

अशा रीतीनें सर्व पालख्या बरोबरच्या संरक्षकांसह मीरजुम्लाखानाच्या सैन्याची फळी ओलांडून पार झाल्या. आतां त्यांना वस्तुतः कांहीं संकट प्राप्त होण्याचा संभव नव्हता. ह्या पालख्यांतून अर्थातच जिजाबाई व तिचे हिरोजी वगैरे विश्वासांतील शरीरसंरक्षक वेषांतर करून जात होते. त्यांच्या प्रयाणाची पूर्व योजनेनुसार सर्व तजवीज करून देऊन शहाजीराजेही दुसऱ्या वाटेनें किल्ल्याच्या पार झाले होते. राजांनीं जिजाबाईला शिवनेरीच्या अलीकडे अर्ध्या कोसावर एक महादेवाचें प्राचीन देवालय होतें, तिथें येऊन भेटावें व मग सर्व मंडळींनीं शिवनेरीवर जावें असा संकेत ठरला होता. त्या संकेतानुसार जिजाबाई वगैरे मंडळी त्या देवालयांत जाऊन पोंचली. वाटेनें जाधवरावांचे सैनिक शहाजीराजे पळून जातील म्हणून पहाऱ्यावर असलेले त्या मंडळीला आढळले त्यावरून जिजाबाई वगैरे मंडळीला कल्पना करतां आली कीं, राजांच्या जिवावर आतां संकट कोसळणार ! त्यासाठीं देवालयांत जाताना तिनें आपल्या सर्व शरीररक्षकांना प्राप्त होणाऱ्या प्रसंगाशीं तोंड देण्याचा इशारा देऊन ठेवला व आपणही वेळ आली तर शत्रूशीं दोन हात करायचे अशा तयारीनें वीररमणीला शोभेल अशा सजावटीनें तयार राहिली.

तो योगायोग तसा होता म्हणून ह्या पालख्या देवालयापाशीं उतरायला व जाधवरावांच्या हेरांना त्यांच्याविषयीं संशय यायला एक गांठ पडली. त्यांनीं तावडतोब जाधवरावांपाशीं जाऊन ह्या गोष्टीची वर्दी दिली. जाधवरावांना शहाजीराजांचा कावेबाजपणा पूर्ण माहीत असल्यानें त्यांनाही संशय आला कीं, ह्या पालख्यांतून शहाजीराजे तर पळत नसतील! म्हणून ते आपल्या सैन्याची एक तुकडी बरोबर घेऊन तिथें चालून आले . तिथें येतांच त्यांनीं सक्तीनें सर्व पालख्या मोकळ्या करून पाहिल्या तेव्हां इतर

बुरखेवाल्या दासींना कांहीं ते ओळखूं शकले नाहींं, पण जिजाबाई जेव्हां आपण होऊनच आपल्या चेहऱ्यावरचा बुरखा टाकून त्यांच्यासमोर येऊन उभी राहिली त्यावेळीं ते आश्चर्यानें थक्कच होऊन गेले.

" बाबा ! मी आपली जिजी ! सांगा, तुम्हीं मला पकडून मुसलमानांच्या स्वाधीन करणार काय ? "

जाधवरावांच्यानें यावर एक शब्ददेखील बोलवेना. जाधवराव कसे झाले तरी अस्सल मराठे होते. शहाजी त्यांचा शत्रू असला तरी तो थोर मनाचा शत्रु व शिवाय त्यांचा जांवई होता. तसेंच जिजाबाई ही बायको त्यांच्या शत्रूची असली तरी त्यांची मुलगी होती. त्यांचा वाद भोसल्यांशीं होता; स्वतः-च्या मुलीशीं नव्हता. मुलगी भोसल्यांच्या कुळांत दिली त्याच दिवशीं मेली असें तोंडानें म्हणणें त्यांना आजवर सोपें वाटलें खरें; पण प्रत्यक्ष वेळ येतांच आपल्या पोटच्या गोळ्याला पाहून त्यांचें अंतःकरण कळवळलें. ते आपण शहाजीराजांचे शत्रु आहों हें विसरून अपत्यवात्सल्यानें गहिंवरून जिजाबाईला आपल्या हृदयाशीं धरून म्हणाले, " जिजी ! मुली ! तूं अशा आणीबाणीच्या वेळीं आपलें घर सोडून रानावनांतून कशाला बरें भटकते आहेस ? "

" तुमची तशी इच्छा म्हणून ! बाबा राजांना वनवासाला लावायचें व्रत तुम्हीं अंगिकारलें नसतें तर मला तरी अशा ह्या अडचणीच्या वेळीं वणवण करीत दहा दिशांना कशाला हिंडावें लागलें असतें ! राजांच्या सभोंवार तुम्हीं आणि दोन्ही खानांनीं मिळून परोपरीच्या आपत्त्यांचा वणवा पेटविला आहे. असें असतां त्यांना सोडून एकट्यानेंच घरीं राहणें मला कसें बरें रुचेल ? "

जाधवराव म्हणाले, " जिजी ! शहाजीराजांशीं माझा विरोध आहे, तो प्रश्न निराळा आहे. आजवर त्या प्रश्नाचा विचार करतांना तूं त्या भोंसल्याची बायको म्हणून मी तुझाही द्वेष करीत आलों. पण आतां तुला प्रत्यक्ष पाहातांच माझा तुझ्याविषयींचा सारा द्वेष मावळला. "

" तो मावळायचाच. " जिजाबाई जाधवरावाच्या कंबरेला मिठी मारून वत्सलतेनें त्यांच्या छातीवर डोकें टेंकून त्यांच्याकडे करुण दृष्टीनें पाहात म्हणाली, " बाबा ! पहांट झाली कीं तिच्या आगमनाची सुवार्ता जगजाहीर करण्यासाठीं सर्व पक्षी जागे होऊन किलबिलत्या भुपाळ्या गाऊं लागतात. या उगवत्या अरुणाची पूजा करण्यासाठीं फुलें फुलूं लागतात, प्रभातकालचा

शीतळ वारा जोराजोरानें वाहूं लागतो; हे सारे शुभशकून ज्याप्रमाणें पहांटेच्या आगमनाची साक्ष देतात त्याप्रमाणेंच तुमच्या थोर अंतःकरणांतून वाहूं लागलेली ही वात्सल्यप्रेमाची गंगा माझ्या उदरीं जन्माला येणाऱ्या भावी छत्रपतीच्या अवताराला शुभशकूनच करीत आहे. मी ऐकलें होतें कीं, बाबा! आपण मला व राजांना दोघांनाही पकडून शत्रूच्या स्वाधीन करणार, व त्या वशिल्याच्या जोरावर निजामशाहीची वजिरी मिळविणार. तेव्हां मला वाईट वाटलें. किती वाईट वाटलें म्हणून सांगूं? अशा आणीबाणीच्या वेळीं मी महाराजांपासून दूर राहिलें असतें तर जाधवांच्या जिजीला पतीची पर्वा नाहीं, पातिव्रताधर्माची जाणीव नाहीं, असा जाधवांच्या घराण्याचा दुर्लौकिक झाला असता. आतां तुम्ही दोघे तिकडे राजकारण खुशाल खेळा. तें खेळूं नका म्हणून सांगून तुम्ही दोघे थोडेच ऐकणार आहां! पण राजकारणासाठीं आपल्या जातीच्या, वंशांच्या, धर्माच्या, रयतेच्या मानेवर आपल्याच हातून कुऱ्हाड हाणली जाईल असलीं दुष्कृत्यें तरी आपल्या हातून होतां कामा नये."

"जिजी! त्या राजकारणाच्या भानगडींत तूं पडूं नकोस म्हणतों ना? बायकांना असल्या उठाठेवी काय करायच्या आहेत? राजकारणाच्या दृष्टीनें मी तुझ्याकडे पाहूं लागलों कीं, तूं माझी मुलगी जिजा ह्या गोष्टीचा मला विसर पडतो, व तुझ्या स्वरूपांत माझ्या प्रतिस्पर्ध्याची बायको—जिच्या उदरीं छत्रपती अवतार घेऊन आम्हां जाधवांना आपल्यासमोर भोंसल्यांच्यासमोर मान नमावयाला लावीन अशी मालोजी भोंसल्यानें प्रतिज्ञा केली होती, तो आम्हां जाधवांचा सारा स्वाभिमान रसातळाला नेण्यासाठीं टपून बसलेली आम्हां जाधवांची वैरीण माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागते."

"बाबा, माझ्या उदरीं छत्रपती अवतरणार, तुमची कन्या—तुमची जिवलग कन्या जिजी गोरगरीबांच्या कैवारी अशा छत्रपतीची माता होणार, यांत तुम्हांला अपमान वाटतो? जाधवांच्या पूर्वजांची कैक जन्मींची पुण्याई आज फळाला येऊं पाहाते आहे, जाधवांच्या कन्येनें छत्रपतीला जन्म दिला असा जाधवांचा—बाबा! तुमचा कीर्तिदुंदुभि ह्या निमित्तानें दुनियेभर दुमदुमणार आहे ह्याचा तुम्हांला विषाद वाटतो? बाबा! सांगा. तुमची जिजी म्हणून मी तुमच्याशीं बोलत नाहीं, जाधव व भोंसले ह्या उभयकुळांच्या कीर्तीला काळोखी फांसली जाऊं नये म्हणून त्यांच्या वतीनें त्यांच्या अब्रूची रक्षण-

कर्ती स्त्री म्हणून मी आपणाला विचारतें—उद्यांच्या छत्रपतीची पालनकर्ती स्त्री म्हणून विचारत्यें. तुम्हांला तुमच्या कुळाच्या, तुमच्या हिंदुत्वाच्या, तुमच्या देशाच्या, तुमच्या लाखमाप शेतकरी मावळ्या मराठ्यांच्या, त्यांच्या आया—बहिणी—बायका—मुलींच्या अब्रूची कांहीं चाड आहे कीं नाहीं ? चाड असेल तर माझ्या तोंडावर असे अनुदारपणाचे बोल बोलूं नका. परधर्मीय बादशहा-कडून क्षुल्लक मानमरातब मिळविण्यासाठीं स्वदेशद्रोह व स्वजनद्रोह करायला तयार होणारे जाधवराव हे माझे जन्मदाते आहेत असें जगाला सांगायला मग मला लाज वाटेल. ”

जिजाबाईचे हे सडेतोड व तेजस्वी बोल ऐकून जाधवरावांचें मन गोंधळ-ल्यासारखें झालें.

इतक्यांत मीरजुम्लाखानाचे चार सैनिक घोडे फेंकीत फेंकीत तिथवर आले. त्यांच्या म्होरक्यानें जाधवरावांना वर्दी दिली, “ जाधवराव ! खान-साहेबांचा आपणांला असा हुकूम आहे कीं, शहाजीराजे माहुली किल्ल्यावर फितुरी करून फत्तेखानाला दगलबाजीनें ठार करून ह्या वाटेनें पळून जाण्या-साठीं किल्ल्याच्या बाजूच्या चोरवाटेनें पसार झाले आहेत. तसेंच त्यांनीं जिजाबाईलाही आपल्याबरोबर घेतली असल्याचा खानसाहेबांना संशय आला आहे. तरी आपण त्या दोघांनाही अडवून कैद करा. तिकडे किल्ल्याच्या पायथ्याशीं शहाजीराजांच्या सैन्यानें आमच्या सैन्याशीं झुंज मांडली आहे. त्यांचा मोड करून खानसाहेब लौकरच ससैन्य आपल्या मदतीला येतील. तोंवर आपण शहाजीराजांना अडवून धरा.” त्या म्होरक्यानें जाधवरावांसमोर उभी असलेल्या बेगमेच्या वेषांतील जिजाबाईकडे पाहून चकित होऊन विचारलें. “ जाधवराव ! ही कोण ? ”

जाधवरावांना आतां मोठा पेंच येऊन पडला. आपली मुलगी म्हणून सांगावें तर तिला कैद करावी लागणार. बरें दुसरें कांहीं सांगावें तर सुचण्या-सारखें नाहीं. पण या वेळीं त्यांच्या कन्येनें प्रसंगावधानाच्या बाबतींत त्यांच्या-वरही मात केली. त्या चौघा मुसलमानांनीं आपणाला ओळखलें नाहीं असें पाहून जिजाबाई उत्तरली, “ मीच बेगम ! मला जाधवरावांनीं इथें अडकवून धरलें आहे. मी त्यांना सांगितलें कीं, मीरजुम्लाखानाच्या परवानगीनें मी

माझ्या लवाजम्यासह दौलताबादेला चाललयें आहें. पण तरीदेखील दांडगे-पणानें त्यांनीं मला अडवलें आहे."

"छे ! छे ! जाधवराव ! बेगमसाहेबांना अडवायचें नाहीं. खानसाहेबांचा तुमच्यावर घुस्सा होईल इतकेंच काय; पण खानसाहेबांचा तुम्हांला असाही सक्त हुकूम आहे कीं, बेगमसाहेबांच्या दिमतीला पाहिजे तर आणखी सैन्य द्या पण त्यांना शहाजीराजांच्या हातीं लागूं देऊं नका." त्या सैनिकांचा म्होरक्या म्हणाला.

"खानसाहेबांचा हुकूम मला मान्य आहे." जाधवराव त्या मुसलमान सैनिकाला म्हणाले, "तुम्ही आतां ताबडतोब माघारे जा व खानसाहेबांना अशी वर्दी द्या कीं, शहाजीराजांच्या वतीनें आमच्याशीं झगडण्यासाठीं जगपाळराव निंबाळकर चालून येत आहेत अशी बातमी आली आहे. त्यांच्यावर मी जगदेवरावाला पाठविलें आहे. पण त्यामुळें इथें मला मदत अपुरी आहे. यासाठीं फत्तेखान व तुम्ही मिळून शक्य तितक्या लौकर इकडे या."

"ठीक आहे." असें म्हणून तो मुसलमान सैनिक आपल्या इतर तीन सोबत्यांसह माघारा निघून गेला.

जिजाबाई ते मुसलमान दूर गेलेले पाहातांच आपल्या तोंडावरचा बुरखा दूर करून जाधवरावांना म्हणाली, "बाबा ! तुम्ही एका दिव्यांतून तर पार पडलां. एवढ्या वेळेपुरता तरी तुमचें संकट टळलें. आतां खानाचा जो निरोप तुम्हांला पोंचला त्यावरून खानाची तुमच्या घरच्या बायकांवर देखील कशी दृष्टि आहे याचा तुम्हांला अनुभव आलाच असेल."

"मुली ! तूं मुकाट्यानें शिवनेरीवर जा व सुखानें बाळंत होऊन पुत्रवती हो. असा माझा तुला आशीर्वाद आहे. मात्र शहाजीराजांविषयीं माझ्यापाशीं पुन्हां रदबदली करूं नकोस."

"मग काय ? बाबा ! मी आपली कन्या म्हणून तुम्ही मला तेवढी मोकळी सोडणार व माझ्या पतींना दगा देणार ? आणि हें माहीत असतांना मी इथून सुखानें शिवनेरीवर जाऊन 'भोंसल्यांची राणी आपल्या पतीशीं बेइमान झाली. जाधवरावांची कन्या आपल्या बापाच्या वृथा मानापमानाला बळी पडून आपल्या पतीचे प्राण धोक्यांत आहेत हें माहीत असतांनाही

आपले प्राण बचावण्यासाठीं पळून गेली ' असा माझा व माझ्याबरोबरच तुमचाही दुर्लौकिक करूं ? छेः ! मी तसें कधींही करणार नाहीं." जिजाबाई जाधवरावांचे पाय धरून म्हणाली. " तुम्हींच मला जन्म दिला, मला आतां जें मागणें मागायचें तें तुमच्याच पायांपाशीं मागायचें आहे. माझें असें मागणें आहे कीं, जाधव-भोंसले यांच्यातली बेकी आज मोडली पाहिजे, व भोंसल्यांच्या वंशांत जन्माला येणाऱ्या छत्रपतीच्या पाळण्याची दोरी जाधवांनीं आपल्या हातीं धरून ओढून त्या पाळण्याला पहिला झोका दिला पाहिजे. छत्रपति भोंसल्यांच्या कुळांत जन्माला आला तरी त्याची माता जाधवांची कन्या आहे. व-अग बाई !-" जिजाबाईनें दूरवर नजर फेंकून पाहिलें तों शहाजीराजे आपल्या निवडक लोकांनिशीं दौडत येत असलेले तिला दिसले. त्यांना पाहातांच जिजाबाईच्या तोंडचें वाक्य अपुरेंच राहिलें.

शहाजीराजे घोड्यावरून उतरले व जाधवरावांकडे येऊं लागले तरी जाधवराव आपले चित्रासारखे तटस्थ उभे ! शहाजीराजांनीं पाहिलें तों जिजाबाईदेखील तिथेंच उभी. त्यांनीं तिला विचारलें, " हें काय राणी-साहेब ! तुम्ही अजून इथेंच ? माझी कल्पना कीं तुम्ही एव्हाशीं गडावर सुखरूपपणें जाऊन पोंचला असाल. गडावर पुढें वर्दी तरी पाठविली काय ? "

" नाहीं. " जिजाबाई म्हणाली.

" हिरोजी कुठें आहे ? " राजांनीं विचारलें.

एका पालखींतून बुरखा फेंकून देत हिरोजी बाहेर आला व राजांसमोर हात जोडून उभा राहून म्हणाला, " राजेसाहेब काय आज्ञा आहे ? "

" वाः ! आतां तुला मी दास म्हणूं कीं दासी ? " राजांनीं हंसत हंसत विचारलें. जाधवरावही क्षणभर हिरोजीच्या तोंडाकडे टकटक पाहात उभे राहिले. राजे जिजाबाईकडे पाहात म्हणाले, " राणीसाहेब, तुमच्या ह्या पुरुषी दासीला आम्ही आमच्या कामगिरीवर पाठवितों. " लगेच ते हिरोजीला म्हणाले, " हिरोजी ! आतांच्या आतां असाच्या असा गडावर जा. तिथें बाळकृष्णपंत हणमंते, रघुनाथ बल्लाळ, कोरडे वगैरे कारभारी मंडळी आहेत. त्यांना राणीसाहेब गडावर येत असल्याची वर्दी देऊन सर्व व्यवस्था नीट ठेवायला सांग. तुला एकंदर परिस्थिति माहीतच आहे; तेव्हां जास्त कांहीं सांगण्याचें कारण नाहीं. जा लौकर." राजे लगेच जाधवरावांकडे वळून

म्हणाले, " मामासाहेब ! लौकिक दृष्ट्या भोंसले व जाधव एकमेकांचे शत्रु म्हणून समोरासमोर उभे आहेत पण मीं आतां माझें सारें सैन्य मागें ठेवून आपणांसमोर आलों तो शत्रु ह्या नात्यानें नसून आपण वडील माणूस, आपण मला वडिलांच्या ठायीं पूज्य आहां म्हणून आपणांला भेटून आपला आशीर्वाद घेण्यासाठीं म्हणून आलों आहें. "

असें म्हणून राजे व जिजाबाई ह्या जोडप्यानें जाधवरावाना नमस्कार केला. तरी जाधवराव मुखस्तंभासारखे तटस्थ उभे ! त्यांच्या तोंडून एकही शब्द निघेना. त्यांचा चेहरा मात्र गंभीर झाला, व डोळे जलपूर्ण काळ्या मेघासारखें अश्रूंनीं डबडबून येत आहेत कीं काय असा भास होऊं लागला.

" अखेर भोंसल्यांनीं जाधवांसमोर मान नमविली ! " जाधवराव जराशा वेळानें म्हणाले. " मालोजीराजांनीं जी प्रतिज्ञा केली होती कीं जाधवांना भोंसल्यांसमोर मान नमवावी लागेल व पुढील तीन पिढ्यांत या भाकिताची प्रचीति येईल, ती राजांची प्रतिज्ञा आज फोल झाली ! "

" हां ! मामासाहेब ! " शहाजीराजे ताडकन् उठून उभे राहिले व आपल्या कमरेच्या तरवारीला हात घालीत म्हणाले, " तसा अहंकार मात्र मीं कोणत्याही कारणास्तव आपणांला बाळगूं देणार नाहीं. बाबांच्या वेळेपासून भोंसले व जाधव यांच्यांत जी वृथा मानापमानाची चुरस लागून राहिली आहे, ती भोंसले व जाधव ह्या उभयतांना व तशीच अलम् हिंदु रयतेला घातुक आहे; त्या चुरशीला मूठमाती देऊन मीं मला पूर्वीचा कटु अनुभव असतांही आज आपणांसमोर इतक्या नम्रतेनें वागलों याचा अर्थ मी शहाजी भोंसला लखूजी जाधवरावांना शरण आलों असा आपण घ्याल असें मला वाटलें होतें, म्हणूनच मी प्रथमच आपणांस सांगितलें कीं, पिढीजात स्पर्धा उराशीं धरून मी आपणांला हें वंदन करीत नाहीं. "

" तर मग वंदन तरी कशाला केलेंत ? तुमच्या त्या कोरड्या कळकळीची मला मुळींच पर्वा नाहीं. मी या ठिकाणीं तुमच्यासमोर उभा आहें तो तुमचा सासरा म्हणून उभा नाहीं; दिल्लीच्या सार्वभौम तख्ताशीं दावेदारी करणाऱ्या गुन्हेगाराला शासन करण्यासाठीं उभा आहें. " जाधवराव क्रोधाविष्ट होऊन उद्गारले.

" मामासाहेब ! आतां आपण राजकारणाची भाषा बोलूं लागलां— खाजगी नातीं ओळखायला आपण मुळींच तयार नाहीं हें आपल्याच तोंडानें आतांच मला कळून चुकलें आहे. तर मग मीही स्पष्ट सांगतों कीं, आपण-जाधव एवढे मोठे मनसबदार ज्या निजामशाहीच्या कृपेनें झालां, ती निजामशाही परक्या मोंगलांच्या सहाय्यानें उलथून पाडायच्या फत्तेखानाच्या कटांत सामील होऊन आपण निजामशाहीशीं दगलबाजी केली आहे. ह्या गुन्ह्याबद्दल निजामशाहीचा वजीर या नात्यानें मीं आपल्याला जाब विचारतों आहें. मामासाहेब कुणी आपणांला अरे म्हटलें कीं आपण त्याला का रे म्हणायचें हें ओघानेंच प्राप्त होतें. मामासाहेब ! मीं वेळीं आपल्या मोंगलांविषयींच्या आपुलकीचें कौतुक केलें असतें, किंवा आपणांला निजामशाहींतील वजिरी मिळवायची होती तर मीं आनंदानें माझीं वजिरीचीं वस्त्रें खालीं ठेऊन तीं बेगमसाहेबांच्या मार्फत आपणांला देवविलीं असतीं. पण—"

" पण काय ? शहाजीराजे ! पण कसलें घेऊन बसलां ? निजामशाहीची वजिरी तर मीं मिळवीनच; पण ती भिक्षा म्हणून तीन दिवसांच्या तेरड्याप्रमाणें लुकलुकणाऱ्या भोंसल्यांच्या मेहेरबानगीनें मला मिळवायची नाहीं; तर दिल्लीपतीची एकनिष्ठपणें सेवा करून त्या सेवेच्या व पराक्रमाच्या जोरावर मिळवायची आहे."

" पण मामासाहेब ! आपण जितके दिल्लीपतीशीं इमानदारीनें वागतां तितका दिल्लीपति आपणाशीं वागत नाहीं. ज्या फत्तेखानाच्या वचनांवर आपला एवढा भरंवसा, त्या फत्तेखानाला कालच बेगमेच्या हातून तुरुंगवास प्राप्त झाला आहे. ही जी गत बेगमेच्या हातून फत्तेखानाची झाली, तीच गत पुढें दिल्लीपतीच्या हातून आपली व्हायची आहे."

" काय ? खानाला बेगमेनें तुरुंगांत घातलें ? "

" होय. त्याला शासन झालें तें योग्यच झालें. त्याच्या बेइमानीचा पुरावा आपणांस पाहायचा असेल तर हा पहा ! " असें म्हणून शहाजीराजांनीं आपल्या कमरपट्ट्यांतून हिरोजीमार्फत मिळविलेलें फत्तेखानानें जाधवरावांना लिहिलेलें पत्र काढून जाधवरावांच्या हातीं दिलें.

जाधवरावांनीं तें पत्र वाचून एक दीर्घ सुस्कारा सोडला. त्यांच्याच्यानें कांहीं बोलवेना.

शहाजीराजे अंमळशानें पुन्हा म्हणाले, " मामासाहेब ! जाधव व भोंसले यांच्या आपसांतील चुरशीचा फायदा घेऊन त्यांच्यांत परस्पर यादवी माजवून त्यांना एकमेकांशीं लढवून नामशेष करायचें, व मग निजामशाही अलगत घशांत लोटून ज़िकडे तिकडे मुसलमानमयच करून सोडायचें, असा फत्ते-खानाचा डाव होता. आणि फत्तेखानासह जाधवराव, शहाजीराजे वगैरे सर्वांची वाट लावून नंतर निराधार निजामशाहीला दिल्लीच्या साम्राज्यांत सामील करून घ्यायचें असा दिल्लीपतीच्या वतीनें मीरजुम्लाखानाचा डाव आहे. अशीं कितीतरी कुटिल कारस्थानें प्रस्तुतच्या झगड्याच्या मुळाशीं आहेत, याची आपणांला जाणीव आहे का ? दिल्लीच्या तख्ताविषयीं आपणांला अभिमान वाटतो. पण मामासाहेब ! ह्या तख्तावर आज कैक पिढ्या आरूढ होणाऱ्या मुसलमानांनींच तुमचीं—आमचीं हिंदुराज्यें सरोस धुळीला मिळवून तुम्हांआम्हां सर्वच हिंदूंना गुलाम करून सोडलेलें कसें आपणांला दिसत नाहीं ?"

" महाराज ! " इतक्यांत जिजाबाई शहाजीराजांपाशीं येऊन म्हणाली. " मी आतां फार वेळ अशी वाटेंतच तिष्ठत राहणें सुरक्षितपणाचें नाहीं."

जाधवरावांनीं जिजाबाईचे बोल ऐकले. त्यांच्या मनावर शहाजीराजांच्या आतांच्या बोलण्याचा व विशेषतः राजांनीं जें पत्र त्यांना आतां दिलें होतें, त्या पत्राचा बराच इष्ट परिणाम झाला होता. त्यांनीं राजांना सांगितलें, " राजे ! जिजाऊला अगोदर सुरक्षितपणें शिवनेरीला पोंचती करा. " लगेच ते जिजाबाईकडे वळून म्हणाले, " बाळ ! राजकारणाच्या भानगडी आमच्या आम्ही पाहून घेतों; तूं अगोदर पालखींत जाऊन बैस व गडावर जा. तिथें श्रीनिवासराव किल्लेदार आहे, तो आपला माणूस आहे. तो जाधव-रावांच्या लेकीला फुलाप्रमाणें वागवील. जा —"

" पण मामासाहेब ! त्या पत्रानुसार तर आपण राणीसाहेबांना मोकळ्या सोडतां उपयोगी नाहीं. तो राजद्रोह होईल ! " शहाजीराजे जाधवरावांचें अंतःकरण विवेकशील बनत चाललेलें पाहून कांहींशा विनोदानें व कांहींशा उपरोधानें म्हणाले.

" राजे ! तुम्ही टोमणेवजा भाषेंत बोलतां हें मला कळतें. पण मी बाद-शहाशीं राजनिष्ठा पाळावयाची कबूल केली म्हणजे माझ्या बायकामुलींना

पकडून बादशाही अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्याचें कबूल केलें नाहीं." जाधवराव जिजाबाईकडे वळून पुन्हा म्हणाले, "जिजी ! तूं नीघ अगोदर."

"मी जातें. पण बाबा ! मला व जाधव आणि भोंसले या दोन्ही वंशांची कीर्ति अजरामर करण्यासाठीं अवतरणारा छत्रपति माझ्या उदरीं आहे, त्याला आपला आशीर्वाद असेल तर !" जिजाबाई म्हणाली.

"जा ! मुली ! तुला माझा आशीर्वाद आहे कीं, तुझा पुत्र महा-पराक्रमी निपजेल."

"तो रयतेचा कल्याणकर्ता होऊन मराठी साम्राज्याचा संस्थापक होईल असा आपला आशीर्वाद पाहिजे आहे." जिजाबाई पुन्हा म्हणाली.

जाधवराव यावर कांहीं बोलेनात. राजेही त्यांच्याकडे पाहात स्तब्ध उभे होते. आतां तरी राजनिष्ठेचें भ्रमपटल जाधवरावांच्या नजरेवरून दूर होतें किंवा नाहीं हें राजांना व जिजाबाईलाही पाहायचें होतें. जिजाबाईला राजांनीं डोळ्यानें खूण केली तेव्हां जिजाबाईनें पुन्हां विचारलें, "बाबा ! एवढा आशीर्वादर्देखील तुमच्यानें मला देववत नाहीं ?"

"मुली ! माझ्यासारख्याच्या कोरड्या आशीर्वादांत तुझ्या मुलाला छत्रपती करण्याचें सामर्थ्य असतें तर कशाला हवें होतें !"

"आपल्या शब्दांत तें सामर्थ्य आहे." शहाजीराजे शांतपणानें म्हणाले. "मामासाहेब ! आपण जर आपसांतली स्पर्धा सोडून आपल्या भावी नात-वाला वैभवशाली बनविण्यासाठीं झटण्याचें मनांत आणलें-झालें तें होऊन गेलें. पण यापुढें तरी हिंदु-पद-पादशाहीचें ध्येय डोळयांसमोर ठेवून तुम्ही आम्ही वागूं लागलों, तर भावी छत्रपतींच्या अवतारकार्याची उत्कृष्ट भूमिका तयार व्हायला मुळींच आयास पडणार नाहींत. आजला आपण जसे मोंगलबादशहाचे ताबे-दार —आहां, तसाच मीही निजामशाहीचा ताबेदार आहें. पण ह्या मुसल-मानांच्या ताबेदारींतही आपण मनांत आणूं तर एकविचारानें भावी मराठी स्वराज्याच्या सुवर्ण मंदिराचा पाया सदिच्छापूर्वक प्रयत्नाच्या एकेक दगडानें रचून बांधून काढूं शकूं. जशी शुभ इच्छा तसें शुभ फळ !"

"ठीक आहे. मुली !" जाधवराव जिजाबाईच्या मस्तकावर वरदहस्त ठेऊन म्हणाले. "तुझ्या पोटीं जो पुत्र होईल तो अतुल पराक्रमी छत्रपति निपजेल."

" असा अर्धाच आशीर्वाद कसा देतां बाबा ? " जिजाबाई म्हणाली. " आणि तो जाधव व भोंसले ह्या उभय कुलांची कीर्ति अजरामर करील असा तो आशीर्वाद पूर्ण करायला हवा. अर्थात् जाधव व भोंसले यांची दावेदारी आज संपली, असें कबूल केल्याशिवाय मात्र त्या आशीर्वादाला सत्याचें बळ प्राप्त व्हायचें नाहीं हो ! " जिजाबाई म्हणाली.

" मुली, जाधव व भोंसले यांची कुढेपणाची दावेदारी आज संपली. आतां तरी तुझ्या मनाची चिंता दूर झाली ना ? " जाधवराव म्हणाले.

" हो ! आतां माझ्या मनाची चिंता दूर झाली. आतां मी जात्यें. आतां मला दोघांविषयींही काळजी करायला नको." जिजाबाई म्हणाली.

" आणि शहाजीराजे ! तुम्हीही इथून चपळाईनें पाय काढा. कारण आतांच मीरजुम्लाखानाचे मनुष्य येऊन ' शहाजीराजे ह्या वाटेनें पळूं लागले तर त्यांना पकडा, अशी वर्दी देऊन गेले. मींही खानाला मदतीला बोलावलें आहे. तुम्ही इथें असतांना जर त्याची व तुमची गांठ पडली, तर मला माझ्या इच्छेविरुद्ध तुमच्याशीं लढावें लागेल. तो प्रसंग टाळला तर चांगला. " जाधवराव म्हणाले.

" मी जातों. पण मामासाहेब ! खानाच्या सैन्याचें इतकें भय बाळगण्याचें कारण नाहीं. कारण एकतर माझें सैन्य खानाच्या सैन्याला खडे चारीत आहेच. शिवाय राणीसाहेब माहुली किल्ल्यावरच अजून आहेत, अशा समजुतीनें त्यांना पकडण्यासाठीं बरेंच सैन्य किल्ल्यासभोंवार तळ देऊन बसलें आहे. तें कांहीं इतक्यांत इकडे चालून येण्याची आशा नाहीं. तरी पण आपण सावधपणानें वागावें हें चांगलेंच. " शहाजीराजे जिजाबाईकडे वळून म्हणाले, " हूं! राणीसाहेब ! आतां चलायचें. "

" पण बाबा ! " जिजाबाई म्हणाली, " जाधव-भोंसल्याची एकी झाली, आतां जाधवांना आपल्याकडे येण्याविषयीं विनंति करायला भोंसल्यांना संकोच वाटायचें कांहीं कारण नाहीं—"

इतक्यांत जाधवराव आपण होऊनच म्हणाले, " पण आतां बोलावण्याचेंही कारण नाहीं. जिजी ! ह्या वेळीं तुला माहेरीं बाळंतपणाला न्यावें अशा आमच्या राणीसाहेबांची उत्कट इच्छा होती. ती जरी आता फलद्रूप होणें

शक्य नाहीं, तरीही त्या एकदोन दिवसांत शिवनेरीवर येऊन पोंचतील असें मी करतों.''

'' आणि मामासाहेब ! आपण ? '' शहाजीराजांनीं विचारलें.

'' मी ? '' जाधवराव म्हणाले. '' मी तर माझ्या नातवाच्या बारशाला अवश्य येणार व त्या वेळीं त्याच्या मस्तकावर छत्र धरून त्याला छत्रपति म्हणून हक्काचा पहिला मुजरा करून त्याच्या पाळण्याला पहिला झोका मी देणार ! ''

जिजाबाई व शहाजीराजे यांना जाधवरावांचे हे बोल ऐकून किती आनंद झाला असेल, याची कल्पना करूं लागणें म्हणजे घागरीनें समुद्राचें पाणी मोजूं पाहाण्याचा प्रयत्न करणेंच होय.

× × ×

जिजाबाईला घेऊन शहाजीराजे आपल्या सैन्यासह शिवनेरी किल्ल्यावर पोंचले असतील नसतील, तोंच फलटणकडून खबर आली कीं निंबाळकरांनीं जगदेवरावांचा पराभव करून त्यांना पळवून लावलें आणि मीरजुम्लाखान जो जाधवरावांच्या मदतीला आला तो शहाजीराजे फत्तेखानाला कैदेंत टाकून बेगमेला घेऊन अहमदनगराकडे पळून गेल्याची वार्ता घेऊन आला. असें सारेंच तिरपगडें झाल्यामुळें मीरजुम्लाखानाला खेद वाटायचा; पण त्याला खेद वाटला नाहीं. तो विजयी मुद्रेनें माघारा दिल्लीकडे जायला निघाला. त्याला पाहून याला एवढा विजय तरी कशाला संपादन करतां आला याची जाधवरावांनीं मुद्दाम चौकशी केली; तेव्हां त्यांना त्या विजयाचें रहस्य कळलें तें असें कीं, खानानें जिजाबाईच्या एका दासीला वश करून घेऊन जिजाबाई माहुली किल्ल्यावर बाळंत झाली तेव्हां तिचा पुत्र चोरून आणविला व त्याला ठार केलें. तो आतां बादशहापाशीं जाऊन फुशारकी मारणार कीं आपण छत्रपति होण्यासाठीं अवतरलेल्या शहाजी राजांच्या मुलाला मोठ्या हिकमतीनें नाहींसें केलें.

जाधवरावांना गूढ पडलें, हा काय प्रकार आहे ? जिजा तर शिवनेरीवर आहे. ती माहुलीवर कुठून बाळंत होईल ? शिवनेरीवर जाऊन शहाजीराजे व जिजाबाई यांना भेटेपावेतों त्यांना त्या रहस्याचा उलगडा होणें शक्यच नव्हतें.

# शिवजन्माचा शुभशकून

जिजाबाई शिवनेरीवर गेल्यापासून तीन दिवसांनीं म्हाळसाबाई—जिजाबाईची आई लेकीच्या बाळंतपणासाठीं तेथें येऊन पोंचल्या. सासरेजांवयांच्या हट्टामुळें म्हाळसाबाईंना जिजाबाईला डोहाळजेवणदेखील करतां आलें नव्हतें व आतां डोहाळजेवण करण्याची वेळही नव्हती. तरीही त्यांनीं तेवढ्यांतच आपली हौस पुरवून घेतली.

म्हाळसाबाईच्या नवसाला देव पावला म्हणून असो, मालोजीला मिळालेला देवीचा वर फळाला आला म्हणून असो, स्वामीच्या प्रसादाचा प्रभाव म्हणून असो, कीं महाराष्ट्राचें भाग्य उदयाला आलें म्हणून असो, पूर्ण नऊ महिने नऊ दिवसांनीं जिजाबाई बाळंत झाली. तिला पुत्र झाला त्या वेळीं गडावर थाटाचा पुत्रोत्सव झाला. किल्लेदार श्रीनिवासराव हे जाधवरावांचे स्नेही, शहाजीराजांचेही सोयरेधायरे, व शिवाय शहाजीराजांच्या मोठ्या मुलाला—संभाजीला आपली मुलगी देण्याचा त्याचा प्रयत्न सुरू होता. त्यामुळें ह्या पुत्रोत्सवांत कांहींच उणीव राहिली नाहीं.

ह्या भानगडींत जे जे विश्वासू नोकर त्याच्या कामाला आले होते, त्यांचा त्यांचा यथोचित गौरव करण्यांत आला. त्यांत गोमती व हिरोजी यांचा विवाह ही महत्त्वाची गोष्ट होय. ह्या विवाहाची विशेष मौज अशी कीं, जाधवराव जेव्हां बारशाच्या दिवशीं तिथें आले, तेव्हां त्यांनीं माहुलीला जिजाबाई बाळंत झाली ती कोण व मीरजुम्लाखानानें ठार केलें तें कोणत्या छत्रपतीला याची चौकशी केली. त्या चौकशींत त्यांना हें कारस्थान प्रारंभापासून हिरोजी व गोमती यांनीं कसकसें रगविलें होतें हें कळून आलें. सर्वांना गोमतीच्या तोंडून कळलें कीं, तिनें फत्तेखानाच्या बेगमेचा मुलगा चोरून नेऊन मीरजुम्लाखानाच्या स्वाधीन केला व खानानें तोच जिजाबाईचा पुत्र समजून त्याला ठार मारिलें ह्या अचाट कर्तबगारीबद्दल जाधवरावांनीं स्वतः गोमतीचें कन्यादान केलें, व आपल्या मनसबदारींतील एक गांव आणि त्याच्या जोडीला शहाजीराजांकडून आणखी एक गांव मागून घेऊन आंदण दिला.

बाळाचें बारसें मोठ्या राजशाही थाटानें पार पडलें. बाळाचें नांव म्हाळसाबाईच्या नवसानुसार शिवाजी असें ठेवण्यांत आलें. त्या प्रसंगीं जाधवरावांनीं शिवाजीवर छत्र धरून त्याच्या पाळण्यास पहिला झोका दिला.

---